# THE RAGHUVAMSHA

OF

# KÂLIDÂSA.

Translated into Marathi Verse

BY

GANES'A S'ÂSTRÎ LELE TRIAMBAKKAR

PRINTED AND PUBLISHED

BY

THE PROPRIETOR

OF

THE NIRNAYA-SÂGARA PRESS.

BOMBAY.

1883.

*Price 2 Rupees.*

श्री

# महाकविकालिदासविरचित

# रघुवंश.




ह्या प्रसिद्ध संस्कृत महाकाव्याचें महाराष्ट्रभाषेंत
पद्यात्मक भाषांतर

**गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर**

ह्यांनीं केलें.

तें

जावजी दादाजी ह्यांनीं आपल्या "निर्णयसागर" छाप-
खान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

मुंबई.

शालिवाहन शके १८०५.

किंमत २ रुपये.

# प्र स्ता व ना.

ह्या भरतभूमीस भूषणभूत अशा कविरत्नमालेंतील पदकस्थानापन्न जो कालिदासनामा जगद्विख्यात कवि, त्यानें अनेक उत्कृष्ट काव्यें रचिलीं, त्यांत मोठें विस्तीर्ण आणि शृंगार वीर इत्यादि नानारसांनीं परिपूर्ण असें हें रघुवंशनामक काव्य लोकप्रसिद्ध आहे. संस्कृतांत जीं पंच महाकाव्यें प्रसिद्ध आहेत, त्यांत हें काव्य अग्रगण्य असून संस्कृत व्युत्पत्ति शिकणारे विद्यार्थी प्रथम ह्याच काव्याचा अभ्यास करितात असा बहुधा संप्रदाय आहे. ह्या काव्यास रघुवंश असें नांव देण्याचें कारण असें आहे कीं, सूर्यवंशांतील दिलीपराजास नंदिनीनामक वशिष्ठधेनूच्या प्रसादानें रघु ह्या नांवाचा महापराक्रमी उदार, धर्मनिष्ठ, आणि नीतिमान् असा एक पुत्र झाला, त्यानें मोठ्या शौर्यानें सकल भूमंडल जिंकून सार्वभौम पदवी संपादिली असें वर्णन आहे. ह्या रघूच्या वंशाचें ह्मणजे तद्वंशीय राजांचें चरित्र ह्यांत वर्णिलें आहे ह्मणून ह्यास रघुवंश असें नांव दिलें आहे. ह्या काव्याचे सर्ग ह्मणजे विभाग एकंदर एकुणवीस आहेत. ते सर्व मिळून दिलीप राजापासून तों शेवटील अग्निवर्णराजापर्यंत सुमारें अठ्ठावीस राजांचें वर्णन ह्या काव्यांत आलें आहे. काव्याच्या प्रारंभीं सामान्यतः सर्व रघुवंशीय राजांचें एकंदरीनें गुणवर्णन करून पुढें अनुक्रमानें एकेक राजाचे चरित्रवर्णनास आरंभ केला आहे. त्याप्रमाणें दिलीपराजापासून उपक्रम करून प्रथम दिलीप, मग रघु, पुढें अज आणि त्यापुढें दशरथ मिळून चार राजांचें चरित्र पहिल्या नऊ सर्गांनीं वर्णिलें आहे. तेथून पुढें प्रभु रामचंद्र ह्याचें साद्यंत अवतारचरित्र सहा सर्गांनीं वर्णिलें आहे. त्यापुढें रामचंद्राचा पुत्र कुश आणि कुशाचा पुत्र अतिथि ह्या दोघांचें चरित्र अनुक्रमें दोन सर्गांत वर्णून पुढें अतिथिराजापासून तों अग्निवर्ण राजापर्यंत एकंदर सुमारानें वीस एकवीस राजांचें चरित्र एकेच ( अठरावे ) सर्गांत संक्षेपानें वर्णिलें आहे. व शेवटील ह्मणजे एकुणविसावे सर्गांत अग्निवर्ण राजाचा शृंगार वर्णून त्याचा अंतकाळ व त्याच्या गर्भिणी राणीस राज्याभिषेक करून त्याच्या मंत्रिमंडळीनें

राज्य चालविलें हें सांगून कवीनें ह्या काव्याची समाप्ति केली आहे. ह्या काव्यांत **रघुवंशीय** राजांच्या प्रतापाच्या व त्यांस संसारांत प्राप्त झालेल्या सुखदुःखानुभवाच्या संबंधानें; ह्मणजे अर्थात् ऋष्याश्रम, गर्भिणी स्थिति, पुत्रजन्म, तारुण्यादि वयोवस्था, स्वयंवर, विवाह, दिग्विजय, युद्ध, मृगया, वसंतादि ऋतु, जलक्रीडा, इष्टजनांचे संयोग वियोग, राज्याभिषेक इत्यादि गोष्टींच्या संबंधानें परोपरीचे प्रसंग आल्यामुळें **कालिदास** कवीला आपलें अद्भुत कविताचातुर्य परोपरीनें प्रकट करण्यास चांगली संधि सांपडून त्यानें त्या त्या प्रसंगीं तें फारच उत्कृष्ट रीतीनें प्रकट करून दाखविलें आहे. **श्रृंगार वीर करुण** इत्यादि सर्व रस प्रसंगा प्रसंगानें कवीनें ह्यांत आणिले आहेत. सहाव्या सर्गांतील **इंदुमतीचें** स्वयंवर, नवव्या सर्गांतील **वसंतोत्सव**, एकुणविसावे सर्गांतील **अग्निवर्ण** राजाची क्रीडा इत्यादिक **श्रृंगार**रसाचीं मुख्यस्थानें आहेत. द्वितीय सर्गांतील **दिलीपानें** सिंहास केलेलें स्वदेहार्पण, चवथ्या सर्गांतील **रघूचा** दिग्विजय, बाराव्या सर्गांतील **रावणाचा** वध, इत्यादि **वीर**रसाचीं मुख्यस्थानें आहेत. तसेंच आठव्या सर्गांतील **इंदुमतीचें** मरण, नवव्या सर्गांतील मृगयेच्या अंतीं **दशरथाच्या** हातून घडलेला तापसपुत्राचा वध, चौदाव्या सर्गांतील **रामचंद्रानें** केलेला सीतेचा परित्याग, इत्यादि **करुणरसाचीं** मुख्यस्थानें आहेत. याखेरीज युद्धादि प्रसंगानें **अद्भुत, रौद्र, भयानक, बीभत्स** इत्यादि रस त्या त्या स्थलीं उत्कृष्ट रीतीनें व्यक्त केले आहेत. प्रत्येक प्रसंगाचें वर्णन अशा घाटानें व अशा डौलानें करावें कीं, तें वाचतांनां तो तो प्रसंग दृष्टीसमोर दिसावा, असें जें **कालिदास** कवीचें अप्रतिम कविता कौशल, तें ह्या काव्यांत सर्वत्र दिसून येतें. ह्या **रघुवंश** काव्याबद्दल '**संस्कृत कवि**' या ग्रंथांत '**कालिदास**' या प्रकरणांत जो अभिप्राय लिहिला आहे, तो सारांशरूपानें वाचकाची खातरी होण्याकरितां खालीं लिहितों:—

'**रघुवंश** हें काव्य **कालिदासाच्या** सर्व काव्यांत श्रेष्ठ होय.' 'प्रौढ व मधुर वर्णरचना, वर्णन करण्याची शैली, निरनिराळ्या रसांचा आविर्भाव, वगैरे त्याच्या गुणांचा यांत कळस झाला आहे.' ग्रंथाच्या आरंभीं शालीनतापूर्वक कवीनें आपलें असामर्थ्य प्रकट केलें आहे

त्यावरून ‘ हातीं घेतलेला विषय सामान्य नव्हे, अशी पूर्ण खात्री होऊन कवीनें त्यावर आपलें बुद्धिसर्वस्व खर्चिलें असावें असें दिसतें,’ ‘ आणि वस्तुतः तसेंच आढळतें.’ ‘ या काव्याचा प्रत्येक सर्ग तर काय पण प्रत्येक श्लोक ही कवीचे अपूर्व गुण प्रकट करितो. तथापि रसानुभवांत जेथें अंतःकरण केवळ तल्लीन होऊन जातें अशीं जीं अत्युत्कृष्ट स्थलें या काव्यांत आहेत तीं सांगतोंः—सिंह व दिलीप, इंद्र व रघु, प्रियंवद व अज यांचा प्रसंग; इंदुमतीचा स्वयंवर ( अथवा सहावा सर्ग ) वैदर्भराजाच्या राजधानींत अजराजपुत्राचा . वरप्रवेश व विवाह; इतर राजांशीं झालेला युद्धप्रसंग, व तदनंतर भय पावलेल्या इंदुमतीशीं वीररसयुक्त डौलाचें भाषण; पारिजातमालेचा वृत्तांत व इंदुमत्यर्थ अजाचा शोक; वसंतोत्सवाचें व दशरथाच्या मृगयेचें वर्णन; रामाचा व भार्गवाचा प्रसंग; पुष्पक विमानांत बसल्यावर रामानें सीतेस उद्देशून केलेलें समुद्राचें व पूर्ववृत्तस्मारक अनेक स्थलांचें वर्णन; सीतेचें वनविसर्जन व वाल्मीकमुनीनें केलेलें तिचें सांत्वन; स्त्रीरूपानें आलेल्या अयोध्येचें व कुशाचें भाषण; ग्रीष्माचें व जलविहाराचें वर्णन; आणि शेवटच्या सर्गांतील अग्निवर्णशृंगारवर्णन; यांतून एखाद्याचाही रसास्वाद घेतांच सहृदय वाचकांस कालिदासाच्या कवितेचें मनोहरत्व सहज कळून येईल व तिचा त्यांस ध्यास लागल यांत अगदीं संशय नाहीं.’

ह्याप्रमाणें अत्यंत प्रशंसास्पद जें रघुवंश काव्य त्याचें हें मराठीपद्यात्मक भाषांतर केलें आहे. ह्याचेही सर्ग मुळांतल्याप्रमाणें एकुणवीसच कल्पिले आहेत. त्यांतून दोन साकीबद्ध व दोन आर्याबद्ध केले असून बाकीचे पंधराही श्लोकबद्ध केले आहेत. श्लोकांचीं वृत्तें इंद्रवज्रा उपेंद्रवज्रा शार्दूलविक्रीडित स्रग्धरा शिखरिणी इत्यादि प्रसिद्धच यथासंभव योजिलीं आहेत. अनुष्टुभ् मुळींच योजिलें नाहीं. भाषांतर प्रायः पद्यास पद्य असें केलें आहे. जेथें एक श्लोकार्थास एक पद्य पुरलें नाहीं तेथें एके पद्याचे ठिकाणीं दोन किंवा अधिकही पद्यें केलीं आहेत. श्लोकाचा एकंदर भावार्थ मनांत धरून तो मराठी भाषेच्या पद्धतीनें जसा बांधतां आला तसा बांधिला आहे; पदशः भाषांतर केलें नाहीं. क्वचित् मूळांतलि अर्थास छंदाच्या वगैरे अनुरोधामुळें कमी जास्ती करावें ला-

गलें; त्यांत जें कमी झालें, तेणेंकरून तात्पर्यार्थास वैगुण्य न यावें, व जास्ती झालें, तें तात्पर्यार्थास शोभेल असें असावें, आणि भाषांतर फार कठीण किंवा दुर्बोध न होतां ग्राम्यही होऊंनये ह्याविषयीं ठेववेल तितकें धोरण ठेविलें आहे. मूळकवितेंत अनुप्रास ह्मणजे वर्णसाम्य पुष्कळ आढळतें; भाषांतरांतही तें साधेल तेथें साधावें याविषयीं लक्ष्य पुरविलं आहे. क्वचित् पाठांतरें कल्पिलीं आहेत तीं त्या त्या स्थलीं (*) अशी फुली घालून पृष्ठाचे खालीं टीपेंत लिहिलीं आहेत. कोठेकोठें योग्य शब्द न सुचल्यामुळें कठिण शब्द घालावे लागले तेथें त्यांचा बोध होण्याकरितां व कोठें कोठें क्रियाकारकें व विशेषणविशेष्यें इत्यादिक हीं परस्परांपासून फार व्यवहित ह्मणजे दूर पडलीं आहेत तेथें त्यांचा अन्वय समजण्याकरितां प्रायः टीपा दिल्या आहेत. भाषांतर करतांनां मल्लीनाथाच्या टीकेची मदत घेतली आहे.

**संस्कृत**ासारखी अत्यंत सरस व प्रौढ भाषा, जिला तिच्या उत्तम गुणावरून **गीर्वाणभाषा** ह्मणजे **देवभाषा** असें ह्मणतात, त्या भाषेमध्यें आणि **कवितादेवते**चा विलास झटलेला, असा कविकुलगुरू जो **कालिदास** कवि, त्यानें मन लाऊन व झटून रचिलेलें जें **रघुवंशा**सारखें महाकाव्य, त्याचें प्राकृता सारख्या नीरस व अप्रौढ भाषेंत व मजसारख्या मंदमति व अडाणी मनुष्यानें पद्यात्मक भाषांतर करू पहाणें, ही गोष्ट उपहासास्पद होय ह्यांत संशय नाहीं. तथापि तें करण्यास मी प्रवृत्त झालों. ह्या माझ्या कृत्यास मेहेरबान दक्षिणा प्रैझ् कमीटीनें प्रोत्साहन देण्याची कृपा केली हेंही येथें सांगणें मला उचित वाटतें. त्या कमीटीनें सुचविल्याप्रमाणें प्राचीन देश, तीर्थें, क्षेत्रें, नगरें, राजे, ऋषि, इत्यादिकांचीं नांवें जीं या काव्यांत प्रसंगवशेंकरून निर्दिष्ट झालीं, त्यांची माहिती वाचकांस होण्याकरितां त्या त्या ठिकाणीं बऱ्याच विस्तीर्ण टीपा देऊन व दुसऱ्याही अल्पस्वल्प न्यूनता होत्या त्या पूर्ण करून याची सुधारणा केली आहे. ह्याप्रमाणें ही भाषांतराची स्थिति आहे, असो.

आतां हें भाषांतर मी यथामति केलें, व तें चांगलें व्हावें ह्मणून माझ्यानें करवला तितका मी प्रयत्न ही केला; तो कितपत तडीस गेला याचा निर्णय करणें हें काम मार्मिक व विद्वान् पंडितांचें होय! आतां यांत ज्या चुक्या व दोष असतील त्यांजकडे लक्ष्य न देतां केवळ श्रमावर दृष्टी देऊन दयाळूपणें याचा अंगीकार करावा अशी शेवटीं विद्वज्जनाची विनयपूर्वक प्रार्थना करून ही प्रस्तावना संपूर्ण करितों.

मुकाम नासिक
शालिवाहन शके १८०३
इसवी सन १८८१

गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर.
( भाषांतरकार )

## ह्या रघुवंशाच्या प्रत्येक सर्गाचें नांव आणि त्यांतील मुख्य मुख्य विषय.

सर्ग १, याचें नांव '**वशिष्ठाश्रमगमन.**' यांत मंगलाचरण, सूर्यवंशाचें महत्त्व, त्याचे चरित्रवर्णनाविषयीं स्वतां कवीची अयोग्यता, तथापि त्याविषयीं प्रवृत्तीचें कारण, रघुवंशीय राजांचें एकंदरीनें गुणवर्णन, मग एकेक राजाचे चरित्रवर्णनास उपक्रम, दिलीपराजाचेंवर्णन, पुत्रप्राप्तीचा उपाय विचारण्याकरितां सुदक्षिणाराणीसहवर्तमान दिलीपराजाचें वशिष्ठाश्रमाप्रत जाणें, इत्यादि विषय आहेत.

सर्ग २, याचें नांव '**नंदिनीवरप्रदान.**' यांत वशिष्ठाचे आज्ञेवरून दिलीपराजानें त्याच्या नंदिनी नामक धेनूची २१ दिवस सेवा केली, तिनें त्याच्या भक्तीची परिक्षा पहाण्याकरितां सिंहाचें रूप घेऊन त्याचें सत्व पाहिलें तेव्हां तो सत्वास टळला नाहीं असें पाहून ती प्रसन्न झाली व तिनें त्यास पुत्र होण्याचें वरप्रदान दिलें, इत्यादि विषय आहे.

सर्ग ३, याचें नांव '**रघुराज्याभिषेक.**' यांत सुदक्षिणाराणीचे दोहद ह्मणजे डोहळे वगैरे गर्भिणी स्थिति, रघूचा जन्मोत्सव, त्याचे जातकर्मादिसंस्कार, त्याची बाल्यस्थिति, उपनयन, विद्याभ्यास, तारुण्यावस्था, विवाह, दिलीपाच्या अश्वमेधसंबंधानें त्याचा ईंद्राशीं संग्राम व त्याचा राज्याभिषेक, इत्यादि विषय आहेत.

सर्ग ४, याचें नांव '**रघुदिग्विजय.**' यांत रघूनें चारही दिशांकडील देश अनुक्रमें जिंकून सकल पृथ्वीचें चक्रवर्तित्व संपादून शेवटीं ज्यांत सर्वस्व दक्षिणा द्यावी लागते असा विश्वजित् या नांवाचा यज्ञ केला, हा विषय आहे.

सर्ग ५, याचें नांव '**अजस्वयंवराभिगमन.**' यांत वरतंतुऋषीचा शिष्य जो कौत्स तो गुरुदक्षिणार्थ रघूकडे द्रव्य मागावयास आला, यज्ञांत सर्वस्व दान केल्यानें रघूजवळ स्वल्पही द्रव्य नव्हतें ह्मणून त्यानें तें कुबेरास जिंकून आणावयाविषयीं प्रस्थान केलें, तेव्हां कुबेरानें त्याच्या भांडारगृहावर द्रव्याची वृष्टी केली, रघूनें तें द्रव्य कौत्सास दिलें, त्यानें गुरुदक्षिणेपुरतेंच घेऊन जातानां राजास आत्मतुल्य पुत्र होईल असा आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें त्यास आपल्यासारिखाच महाप-

राक्रमी पुत्र झाला, त्याचें नांव अज, तो प्रौढ झाल्यावर इंदुमतीच्या स्वयंवरास गेला, मार्गी जाताना त्यानें माजलेला असा एक वनगज मारिला, तो मुळचा प्रियंवद नांवाचा गंधर्व असून ऋषिशापानें गजत्व पावला होता, तो त्या योनींतून मुक्त झाल्यानें अजाचा उपकारी झाला, त्यानें कृतज्ञपणें अजाला संमोहन नामक अस्त्राचा मंत्रोपदेश केला त्या प्रसंगानें उभयतांचें भाषण झालें, नंतर अज भोजाचे राजधानींत गेला. भोजानें मंत्र्यांस सामोरे पाठवून त्यास सिद्धता करून ठेवलेल्या राजवाड्यांत मोठ्या सत्कारानें उतरविलें, इत्यादि विषय आहेत.

सर्ग ६, याचें नांव '**इंदुमतीस्वयंवर.**' यांत स्वयंवरार्थ आलेल्या राजांचें वर्णन व अजाचेच गळ्यांत तिचें माळ घालणें, हा विषय आहे.

सर्ग ७, याचें नांव '**अजपाणिग्रहण.**' यांत अजाचा व इंदुमतीचा विवाह, इतर राजांबरोबर त्याचा युद्धप्रसंग, त्याचा जय, व इंदुमतीस घेऊन त्याचें स्वकीय नगरास जाणें, इत्यादि विषय आहे.

सर्ग ८, याचें नांव '**अजविलाप.**' यांत अजास राज्यपदीं स्थापून रघूचें संन्यासाश्रमग्रहण, बागामध्यें अज व इंदुमती सुखांत निमग्न असतां अकस्मात् पुष्पमाळा आकाशांतून तिचे अंगावर पडून तिचें मरण पावणें, व त्यामुळें शोकग्रस्त झालेल्या अजाचें विलाप करणें, इत्यादि विषय आहेत.

सर्ग ९, याचें नांव '**दशरथमृगया.**' यांत वसंतोत्सवाचें व दशरथाच्या मृगयेचें वर्णन, व शेवटीं दशरथाच्या हातून तापसपुत्राचा वध, इत्यादि विषय आहेत.

सर्ग १०, याचें नांव '**श्रीरामावतार.**' यांत दशरथाची पुत्रकामेष्टि, रावणापासून त्रस्त झालेल्या देवांचें क्षीरसमुद्रास जाऊन श्रीविष्णूची स्तुतिपूर्वक प्रार्थना करणें, श्रीविष्णूचें रावणवधार्थ रामरूपानें दशरथाचे पोटीं अवतार घेणें इत्यादि विषय आहेत.

सर्ग ११, याचें नांव '**सीताविवाह.**' यांत विश्वामित्राचें रामलक्ष्मणास यज्ञसंरक्षणार्थ दशरथापासून मागून नेणें, रामानें केलेला ताटिकेचा व सुबाहूचा वध, अहल्योद्धार, जनकाचे सभेंत शिवधनुष्याचा भंग, सीतेचें श्रीरामकंठांत माळ घालणें, सीतारामाचा विवाह, अयोध्येस

परत जातानां दाशरथिराम व परशुराम यांचा भाषणप्रसंग, इत्यादि विषय आहेत.

सर्ग १२, याचें नांव '**रावणवध.**' यांत श्रीरामाच्या वनवासास आरंभ करून त्याचें दंडकारण्यांत जाणें, पंचवटींत राहाणें, रावणकृत सीताहरण, जटायुचा मृत्यु, सुग्रीवसख्य, वालीचा वध, सीतेचा शोध, सेतुबंध, लंकेला वेढा घालून रावण कुंभकर्णादि राक्षसांचा वध इत्यादि विषय आहे.

सर्ग १३, याचें नांव '**दंडकाप्रत्यागमन.**' यांत श्रीरामचंद्र ह्याचें सीतेसहित पुष्पक विमानांत बसून परत दंडकारण्यांतून अयोध्येस आकाशमार्गे परत जाणें, व मार्गानें जातानां खालीं समुद्र व पूर्वी येतानां पाहिलेलीं स्थलें श्रीरामानें सीतेस दाखविलीं तो प्रकार, हा विषय आहे.

सर्ग १४, याचें नांव '**सीतापरित्याग.**' यांत सीतेचें गर्भधारण, तिचे वनांत जाण्याचे डोहळे, लोकापवादास्तव श्रीरामचंद्रानें केलेला तिचा परित्याग, व कण्वऋषीनें तिचें केलेलें सांत्वन व स्वकीय आश्रमांत नेऊन ठेवणें, इत्यादि विषय आहेत.

सर्ग १५, याचें नांव '**श्रीरामस्वर्गारोहण.**' यांत कुश व लव यांचे जन्म, श्रीरामाची व सीतेची भेट, मूर्तिमती पृथ्वी येऊन तिनें सीतेस पाताळीं घेऊन जाणें, व श्रीरामाचें निजधामास गमन, इत्यादि विषय आहेत.

सर्ग १६, याचें नांव '**कुमुद्वतीपरिणय.**' यांत स्त्रीरूपानें आलेल्या अयोध्यानगरीचें व कुशाचें संभाषण, ग्रीष्मऋतूचें वर्णन, कुशाची जलक्रीडा, व त्याचा कुमुद्वती नामक नागकन्येशीं विवाह, इत्यादि विषय आहेत.

सर्ग १७, याचें नांव '**अतिथिवर्णन.**' यांत कुशाचा पुत्र जो अतिथि त्याचें वर्णन आहे.

सर्ग १८, याचें नांव '**वंशानुक्रम.**' यांत अतिथीचा पुत्र जो निषध त्याजपासून तों शेवटील राजा जो अग्निवर्ण त्याच्या पर्यंत क्रमानें रघुवंशीय राजांचें संक्षिप्त वर्णन आहे.

सर्ग १९, याचें नांव '**अग्निवर्णशृंगार.**' यांत अग्निवर्ण राजाचा शृंगार त्याचा अंतकाळ व त्याच्या गर्भिणी राणीचा राज्याभिषेक, इत्यादि विषय आहेत.

॥ श्रीः ॥

# रघुवंश.

श्रीशं नत्वा गणेशाख्यः कालिदासकृतं महत्
रघुवंशाभिधं काव्यं प्राकृतं तनुतेऽधुना ॥

## सर्ग पहिला.

श्लोक.

[शा.वि.] वाणी[1] आणिक अर्थ जेविं नियमें लोकांमधें राहती
अन्योन्यां अवलंबुनी, सतत जीं तैशा रिती वर्तती
विश्वाचीं अवघ्या पुराणपितरें, त्या पार्वतीशंकरां,
सच्छब्दार्थ[2] मला कळोत ह्मणुनी हीं जोडितों[3] मी करां. १

[भु.प्र.] रवीचा महा कीर्तिमान् वंश कोठें! तशी ही मदीया जडा बुद्धि कोठें!
तराया महादुस्तरा सागरातें डुंबें[4] इच्छितों, केवढा मोह मातें ! २

[शा.वि.] जे काव्यें रचिती मनोज्ञ सुकवी, पावावया तद्यशा
आहें मंदमती तथापि करितों आतां प्रयत्ना अशा;
जीं कां उंच नरास लभ्य सुफळें, तीं तोडण्या ठेंगणा
बाहू ऊर्ध्व करी, तयास हंसती; तैसेंचि हेंही ह्मणा ! ३

किंवा हे जनहो, पुराणकविनीं सद्वंश हा वर्णिला,
त्यामार्गें गति माझि होइल तिथें, भासे असेंही मला;

---

१ शब्द. (एथें पार्वतीच्या दृष्टांताकरितां "वाणी" या स्त्रीलिंगी शब्दाचा प्रयोग केला आहे. वाणी आणि अर्थ यांचें मिथुन जसें परस्परें नित्यसंबद्ध असतें, तसें ज्या पार्वतीशंकरांचें जोडपें परस्परें सर्वदा संबद्ध आहे, असा अर्थ.) २ यथायोग्य जे शब्द आणि अर्थ त्यांचें ज्ञान मला होवो, म्हणून मी त्यांस करां जोडितों म्हणजे वंदितों. ३ "जोडीतसें" असें पाठांतर. ४ होडीच्या योगें.

शस्त्रें तीक्ष्णमुखें¹ मणीस करिती जें छिद्र, तेणें जसें
कष्टावांचुनि सूत्र त्या मणिचिया गर्भीं सुखानें घुसे. ४

जन्मापासुनि² जे पवित्र, अणखी आरंभिल्या उद्यमा
सोडीती न कधींहि जे, फळ मिळे तों चालवीती क्रमा,
जे राजे असती समग्र महिचे, सीमा जिला³ अंबुधी,
ज्यांचे स्यंदन धांवती घडघडां देवेंद्रलोकावधी, ५

जे शास्त्रोक्तविधानयुक्त करिती सेवा सदा अग्निची,
केली अर्पुनि वांछितार्थ सुवचें⁴ तृप्ती जिहीं अर्थिंची⁵,
ज्याचा जो अपराध तत्सदृश त्या तत्काळ जे दंडिती,
जे लोकावनसक्त होउनि यथाकाळीं सदा जागती, ६

[व.ति.] दानार्थ मात्र बहु जे धन सांचवीती,
सत्यार्थ भाषण मित स्फुट जे करीती,
कीर्त्यर्थ इच्छिति रिपूंस जिणावयातें,
जे कां प्रजार्थ वरिती कुलजांगनांतें⁶, ७

[शा.वि.] जे कां बालदशेंत सर्व शिकती विद्या, तशा सत्कला,
तारुण्यीं विषयोपभोग करिती न्यायानुसारी भला,
वानप्रस्थदशेस वृद्धपणिंही पावोनि, अंतीं स्वयें
योगें संयमना करोनि तनुला जे टाकिती निश्चयें⁷, ८

[भु.प्र.] रघूंचा अशा वंश मी वर्णितों, जी! जरी मंदता थोर मद्वाणिमाजी,
तयांच्या गुणीं कानिं येवोनि कीं या मला लाविलें संभ्रमानेंचि गाया. ९

[शा.वि.] ही माझी कविता बरीच अथवा वाईट, हा निर्णय
स्पष्टत्वें करण्यास योग्य असती साधूच, हा निश्चय;
सोनें हें सरसें तसेंच निरसें, याची परीक्षा जशी
होते अग्निवशेंचि वास्तव जनीं, अन्यें न होई तशी. १०

---

१ ज्याचें अग्र तीक्ष्ण तें. (हें शस्त्राचें विशेषण.) २ एथून चार श्लोकांनीं रघुवंशीय राजांचें सामान्यतः वर्णन करून नवव्या श्लोकांत ' रघूंचा अशा वंश मी वर्णितों ' असें म्हणून पुढें क्रमानें वंशवर्णनाचा उपक्रम केला आहे. ३ ज्या पृथ्वीला समुद्र हीच सीमा म्ह० समुद्रवलयांकित पृथ्वीचे जे राजे. ४ मधुरभाषणपूर्वक. ५ याचकांची. ६ कुलीन स्त्रियांतें. ७ असा निश्चय आहे.

[व.ति.] वैवस्वताख्य मनु आत्मज[1] जो रवीचा,
सन्मान्य लौकिकहि थोर असे जयाचा,
जो आद्यभूप सकलक्षितिपालवृंदीं[2],
लोकीं जसा प्रणव तो श्रुतिलागिं आदी, ११

[शा.वि.] त्याचा जो अतिशुद्ध वंश जगतीमध्यें, तयामाजि ये[3]
जन्माला बहुसद्गुणान्वित दिलीपाख्य क्षितीश स्वयें;
पूर्वीं क्षीरसमुद्रमंथन[4] सुरीं केलें, तयांतूनि हा
लोकानंदकर क्षितीवरि निघे इंदू जसा तापहा[5]. १२

[इं.व.] खांदे वृषाचे परि जाड हो! ते, विस्तीर्ण वक्षस्थल फार होतें,
जो सालवृक्षापरि उंच थोर, ज्याचे भुजांचें द्वय लांब फार,

[भु.प्र.] महा क्षात्रकर्मास जो योग्य जाणा, असा देह पावे तदा भूपराणा;
जणूं विक्रम स्पष्ट हा मूर्तिमंत, असें कल्पिती लोक ते बुद्धिमंत. १३

[शा.वि.] सर्वांहूनि विशेष सत्त्वयुत[6] जो, सर्वांहि तेजांप्रती
जो निस्तेज करी, तसीच अधिका ज्याची असे उन्नती,
ऐसा देह सुमेरुचा[7] विलसतो, तैसाचि ज्याचा[8] असे,
तेणें भूमिस आक्रमोनि नृपती जो मेरुऐसा[9] दिसे. १४

[स्र.] जैसा आकार त्याचा तदनुगुण असे बुद्धि त्याची विशाला,
बुद्धीच्या वैभवाला अनुगुण असली होय विद्या तयाला,

---

१ पुत्र. २ सकलराजसमुदायांत (आद्य राजा). ३ जन्माला ये असा अन्वय. ४ अमृत प्राप्त व्हावें म्हणून देव व दैत्य यांनीं मिळून क्षीरसमुद्राचें मंथन केलें; तेव्हां त्यांतून लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजात, कामधेनु, धन्वंतरि, चंद्र इत्यादि चौदा रत्नें निघालीं, अशी पुराणांत कथा आहे. ५ ताप दूर करणारा. ६ सत्त्व म्ह० दार्ढ्य किंवा बल; तेणेंकरून युत म्ह० युक्त असा. ७ मेरुपर्वताचा देह. ८ ज्या राजाचा (देह). ९ मेरुसारखा. (एथें मेरूचीं जीं विशेषणें तीं राजाकडेही श्लेषानें लागू पडतात.) मेरु या नांवेंकरून एक अत्यंत मोठा पर्वत भूमंडळाच्या मध्यभागीं आहे. त्याची उंची एकंदर एक लक्ष योजनें आहे. त्यांतून सोळा हजार योजनें भूमींत आणि चौऱ्यायशीं हजार योजनें भूमीच्या तळापासून वर आहे. हा पर्वत सुवर्णाचा असून याचीं शिखरें रत्नांचीं आहेत, आणि यावर देव रहातात. म्हणून यास हेमाद्रि (सुवर्णाचा पर्वत), रत्नसानु (रत्नाच्या शिखरांचा), सुरालय (देवांचें स्थान) हीं आणि अशा अर्थाचीं नांवें आहेत. याच्याच भोंवतीं सूर्यादिक ग्रह आणि नक्षत्रें प्रदक्षिणा करितात असें पुराणांत सांगितलें आहे.

विद्येला योग्य ऐसें करि नरपति तो कर्म लोकांत मान्य,
कर्माला योग्य पावे फळ, न कधिं असा जाहला भूप अन्य. १५

[शा.वि.] मोठे उग्र तसेचि सौम्य गुण जे त्याच्यामधें राहती,
तींहीं[1] दुर्धर आश्रितां सुगमही[2] झाला असे भूपती;
पोटीं भ्यासुर जंतु तेविं रुचिरें रत्नेंहि ज्याच्या[3] अशीं,
तींहीं[4] दुर्धरता तशी सुगमता ये अर्णवाला[5] जशी. १६

[भु.प्र.] न जाती जशीं उत्तमा सारथ्याचीं
सुमार्गास सोडोनि चाकें रथाचीं,
मनूपासुनि चालिल्या सत्पथा त्या
अणूंही त्यजीती न त्याच्या प्रजा त्या. १७

प्रजांचेंचि कल्याण व्हावें स्वहस्तें ह्मणोनी तयांपासुनी घे करातें;
हजारों पटीनें पुन्हा द्यावयाला रवी हारितो अंबुरूपी रसाला. १८

[इं.व.] साधावया इच्छित तें तयास, ह्या दोन गोष्टी असती नृपास;
शास्त्रांत अव्याहत बुद्धि एक, दूजी सदा सज्य धनुष्य देख.

[उ.जा.] या दोन गोष्टी करुनी, स्वकार्य साधीतसे सर्वहि भूपवर्य;
ह्मणोनि शोभार्थचि होय साची सेना, न युद्धार्थ असे तयाची. १९

[शा.वि.] त्याच्या त्हृद्गत योजना, मसलती, नानाविधें इंगितें,
होतीं गुप्त, ह्मणोनि त्यां न शकती जाणावया जाणते;
जेव्हां दृष्टि पडे समक्ष फळ, तें यत्नास ते तर्किती,
भोगा देखुनि ऐहिका जन जसे प्राक्कर्म तें कल्पिती. २०

[पृ.] न भी स्वहृदयीं, तरी नृपति देहरक्षा करी,
न रुग्ण, तरि भक्तिनें सतत धर्म तो आचरी,
धनार्जन करी, परी अणुहि लोभ ज्याला नसे,
करी विषयसेवना, परि विरक्त चित्तीं असे. २१

[शा.वि.] होतें ज्ञान तथापि मौन धरि तो, शक्ती असोनी क्षमीं,
श्लाघेतें न करी, जरी धरितसे तो नित्य दानक्रमा,

---

१ उग्र गुणांनीं दुर्धर. २ सौम्य गुणांनीं सुगम. ३ ज्या अर्णवाच्या पोटीं असा अन्वय. ४ त्या भ्यासुर जंतूंनीं व रुचिर रत्नांनीं दुर्धरता व सुगमता क्रमानें येते. ५ समुद्राला. ६ "धरी" हें पद अध्याहत आहे.

ज्यांचा व्यक्तपणें विरोध दिसतो लोकांत शत्रूपरी,
ते ऐसे गुण या नृपांत वसती प्रत्यक्ष बंधूपरी. २२

[व.ति.] वैराग्य थोर विषयांविषयीं नृपाला,
विद्या समस्तहि मुखोद्गत येति ज्याला,
धर्मिष्ठही म्हणुनि बोलति ज्यास लोक,
आलें जरेविणहि वार्धक[1] ज्यास देख. २३

[शा.वि.] अन्नाच्छादन देउनी जगविणें, भीतीस ही वारणें,
विद्या सांगुनि सद्गुणा शिकविणें, कष्टांतुनीं तारणें,
हें तो भूप करी, ह्मणूनि ह्मणती त्याला प्रजांचा पिता,
तेव्हां केवळ जन्मदत्व उरलें बापांकडे तत्वतां. २४

देशा स्वास्थ्य असो, ह्मणोनि करि तो दंडास दंड्या जनां,
संतत्यर्थचि जो मनांतुनि विवाहाची करी योजना,
ऐसे[2] अर्थ व काम दोन पुरुषार्थ स्पष्ट धर्मात्मक
याचे होत! असें प्रसिद्ध वदती तें धर्ममीमांसक[3]. २५

यज्ञासाठिंच भक्तिनें कारितसे भूपाळ भूदोहनें,
स्वर्गी दोहि महेंद्र, धान्य बरवें व्हावें अशा हेतुनें;
स्वर्गी यज्ञवशें महीप, मघवा तोयें महीला, भले
ते दोघे परिपोषिती विनिमयें संपत्तिच्या आपले. २६

सर्वांचे करि रक्षणा अनलस[5] क्षोणीपती हा स्वयें,
त्याची कीर्ति विशुद्ध अन्य नृपतींलागीं हरीतां नये,
तेव्हां चौर्य ह्मणोनि रूढ दिसतो जो शब्द लोकांत या,
कोठें वाच्य न आढळे, नृपतिच्या साऱ्याहि राज्यीं तया[6]. २७

---

१ वृद्धत्व; "कीं हा जरेविणहि फारचि वृद्ध देख" असें पाठांतर. या श्लोकाचें तात्पर्य असें की, तो अल्पवयी असतांही विद्येनें वृद्ध म्हणजे विद्वान् झाला. २ अशा प्रकारें अर्थ व काम हे दोनही पुरुषार्थ धर्मलक्षण जो पुरुषार्थ तद्रूप झाले असा भावार्थ. ३ धर्मशास्त्रवेत्ते.

४ अथवा (वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[व.ति.] यज्ञें करोनि करि तृप्त सुरां नरेश, वृष्टी करोनि करि तृप्त नरां सुरेश;
फेडोनि यारिति परस्पर कर्ज देख, दोघेहि ते सतत पोषिति दोन्हि लोक. २६

५ आळशी नव्हे असा (राजा). ६ तया (चोर या शब्दास.)

[उ.जा.] शत्रू जरी सद्गुणशील पाही, त्या आवडे फार नृपास तो ही;
लागे कडू ओखद जें मुखाला, गुणेंचि वाटे प्रिय आतुराला.
[भु.प्र.] जरी मित्र ही आचरे दुर्नयातें, तरी घालवी दूर तत्काळ त्यातें;
विषारी डसे साप जैं अंगक्यास, जनीं कापुनी टाकिती जेंवि त्यास. २८

[शा.वि.] सर्वां एकवटोनि पंचहि महाभूतां विधाता स्वयें
निर्मी आत्मकरें यया नृपतिला, हें तों खरें निश्चयें;
कांकीं तेंद्गुण शब्दगंधमुख ते अन्यार्थ होती बरे,
तैसे या अवघे परार्थचि दिलीपाख्यप्रभूचे खरे. २९

[उ.जा.] सभोंवती शोभति अब्धिवेला प्राकार ते जीस, चहूं दिशेला
समुद्ररूपी परिखाहि जीस, शास्ता नसे अन्य नृपाळ जीस,
अशा महीचें नरनाथ एका पुरीपरी तो करि राज्य देखा;
होऊनि साऱ्या क्षितिचा पती कीं, तो सार्वभौम स्फुट होय लोकीं. ३०

[द्रु.वि.] मगधराजसुता बहु दक्षिणा, ह्मणुनि ठेविति नाम सुदक्षिणा,
वरितसे क्रतुला जशि दक्षिणा, तशि तया वरि तीच सुदक्षिणा. ३१

[शा.वि.] मोठ्या रूपवती, तशाच युवती त्याच्या दुज्या बायका,
त्यांतें केवळ भोगिनीच गणिता झाला, तईं तो निका;
लक्ष्मी आणि सुदक्षिणा बहु तया सन्मान्य होत्या जनीं,
तींहीं मात्र सपत्निकत्व अपणां मानी महीचा धनी. ३२

[उ.व.] सुदक्षिणेला सुतरत्न व्हावें, ह्मणोनि आशा करि तो स्वभावें;
असा तईं काळ बहूत गेला, तरी तिचे पोटिं न पुत्र झाला. ३३

[भु.प्र.] सुतप्राप्तिसाठीं अनुष्ठान कांहीं करावें, अशी वासना त्यास होई;
अमात्यांचिया मस्तकीं कार्यभार तईं सोपिता जाहला तो नृवीर. ३४

---

१ पंचमहाभूतांचे गुण. २ शब्दगंधादिक ( हें तद्गुण याचें विशेषण. ३ पुरी म्हणजे शहर त्याच्या भोंवतीं प्राकार म्ह० तट व परिखा म्ह० खंदक असतात, तसें अब्धिवेला म्ह० समुद्रतटें हेच प्राकार, आणि समुद्र हेच जीला परिखा अशा पृथ्वीचें राज्य तो दिलीप एके पुरीप्रमाणें करिता झाला. दुसरा राजा नसल्यानें हाच सार्वभौम झाला असा श्लोकार्थ होय. ४ मगधदेशच्या राजाची कन्या. ५ हुशार. ६ आपणाप्रत. (लक्ष्मी आणि सुदक्षिणा या दोघींच्याच योगानें पत्नीयुक्तत्व आहे, असें तो आपणास मानी; इतर बायकांनीं नव्हे.)

मनामाजि ठेवोनियां शुद्धभावा, सपत्नीक तो पूजुनी ब्रह्मदेवा,
वसिष्ठास तेव्हां पुसाया उपाया, निघे त्याचिया आश्रमालागिं जाया. ३५

जयांचा निघे स्निग्ध गंभीर नाद, रथीं बैसती दंपती त्या अबाध;
जणूं बैसले वारिवाहीं स्वभावें जसे विद्युदैरावत प्रेमभावें. ३६

न हो आश्रमालागिं संपर्क कांहीं, ह्मणोनी सवें थोडके चार घेई,
तरी थोर सेना सवें चालताहे, असें आंगिं त्याच्या महातेज राहे. ३७

[शा.वि.] जे कां स्पर्शसुखास देति विपुला, सच्छालवृक्षांचिया
निर्यासास शिवोनि येति ह्मणुनी सौगंध्य आलें जयां,
किंचित् हालति पुष्पवृक्ष ह्मणुनी पुष्पांतुनी खालतीं
ज्या योगें गळती रजें, प्रिय असे वायू तयां सेविती. ३८

[भु.प्र.] रथाचा सुगंभीर ऐकोनि रावं, मनीं येउनी वारिदाचानि भाव,
करोनी तईं उंच मानांस थोर स्वरा काढिती पङ्क्तिरूपा मयूर,
बहू तोष पावोनियां तीं मनांत, सुखाच्या भरें नाचती तें वनांत;
तयांच्या मनोहारि ऐकोनि केकीं, तयां जाहला फार संतोष देखा. ३९

[शि.] मृगद्वंद्वें तेव्हां रथनिकट त्याच्या विचरती,
न भीती तीं चित्तीं, परि पथिं रथाला निरखिती;
तयांचीं जीं नेत्रें निजनयनतुल्येंचि असती,
ह्मणोनी तीं दोघें धरुनि मनि हर्षास बघती. ४०

[शा.वि.] कोठें सारसपक्षि मंजुल अशा शब्दा करीती बरें,
तत्पंक्ती बहुदीर्घ उंच गगनामाजी उडे जी त्वरें,
तेव्हां स्तंभविहीन तोरण जसें, तैसी दिसे ती पुढें,

---

१ ब्रह्मदेव हा सृष्टिकर्ता होय, म्हणून अपत्यप्राप्त्यर्थ याचें पूजन करावें असें पुराणांत सांगितलें आहे. २ वसिष्ठ म्हणून प्रसिद्ध सप्तर्षींपैकीं एक ऋषि होय. हा मंत्रद्रष्टा आहे. इक्ष्वाकुवंशीय राजांचा हाच कुलोपाध्याय होय. हा अथर्वणवेदोक्तमंत्रतंत्रविधानांत मोठा प्रवीण होता. विश्वामित्र ऋषि हा याची फार स्पर्धा करीत असे. याची स्त्री अरुंधती, ती मोठी प्रख्यात पतिव्रता होती. ३ मेघावर. ४ विद्युत् आणि ऐरावत. ५ उपसर्ग. ६ चाकर लोक. ७ वायु. ८ चांगल्या सालनामक वृक्षाच्या. ९ डिंकास. १० शब्द. ११ मेघाचा. १२ "पङ्क्तिरूपास मोर" असें पाठांतर. १३ मोराचे शब्द. १४ हरिणांचीं जोडपीं. १५ हरिणद्वंद्वांचीं.

आश्चर्यें वदनें करोनि वरतीं तीं पाहती तीकडे. ४१

[व.ति.] तीं चालतां उभयतां अनुकूल वारे,
जे इष्ट सिद्धिस जनीं कथिती नरा रे,
त्या हेतुनें जारि उडे रज[1] अश्वयोगें,
बैसे न केशिं परि जाय पुढेंच वेगें. ४२

[उ.जा.] सरोवरीं जीं कमलें विराजती, तीं वीचि[2] लागोनि हि फार गारती;
सुगंध त्यांचा तव थंड त्यांजला स्वश्वासतुल्य स्फुट येउं लागला. ४३

[शा.वि.] गांवें दान दिलीं स्वयें नृपतिनें ज्यां अग्निहोत्र्यांप्रती,
ते अर्घ्यादिक अर्पुनी प्रभुवरा दाल्यास सत्कारिती;
आशीर्वाद अमोघ[3] तद्वदनिंचे घेवोनियां मागुती,
सानंदें हृदयें तयां नमुनियां जाती पथें दंपती. ४४

स्वादू, लोणकढें, सुनिर्मळ, कण्या ज्याला, शुची चांगलें,
ऐसें घेउनि तूप, वृद्ध गवळी भूपाकडे पातले;
मार्गीं वन्य तरू अनेक असती दोहींकडे साजरे,
त्यांचीं[4] उत्सुक मानसें पुसति त्यां नांवें तईं आदरें. ४५

[शा.] मार्गीं जातां शुद्ध वेषें तयांचे शोभा आली, वर्णवे ती न वाचे;
चैत्रीं चित्राचंद्र यांची जशी कां भासे शोभा योग होतांच लोकां. ४६

ती ती वस्तू पत्निलागीं महीप दावी प्रेमें चालतांना दिलीप,
त्या नादानें मार्ग हा केंवि गेला, तो भूपाच्या नाहिं लक्षांत आला! ४७

सायंकाळीं भूप ऋष्याश्रमाला आनंदानें तो सपत्नीक आला,
चालोनीयां अस्तमानावधी, जी! झाले त्याचे श्रांत ते फार वाजी. ४८

[शा.वि.] आणाया यजनार्थ दर्भसमिधापुष्पें फळेंही स्वतां
गेले जे दिवसां मुनीश्वर दुज्या रानामधें तत्वतां,
ते सारे परतोनि अग्निजवळी झाले जमा भक्तिनें,
तैं दाटी बहु आश्रमांत मुनिच्या झाली अशा रीतीनें. ४९

[शा.] नीवारांचे[5] अंशभागी खरेची, दारें ज्यांनीं रोधिलीं झोंपड्यांचीं,
बाळें जेवीं तापसांच्या स्त्रियांचीं, दाटी झाली आश्रमीं त्या मृगांची. ५०

---

१ धूळ. २ लाटा. ३ सफळ. ४ त्या झाडांचीं (नांवें). ५ तृणधान्याचे.

[शा.वि.] भीती सोडुनि मानसांतिल सुखें प्यावें मुखें निर्मळ
आळ्यांतील यथा यथेष्ट बसुनी या पांखरांनीं जळ,
ऐसें आणुनियां मनीं, मुनिचिया कन्या जिथें सत्वरी
रोपां घालुनियां जळा स्वकलशीं, तत्काळ झाल्या दुरी. ५१
पर्जन्यें न भिजोत यास्तव जिथें नीवारधान्यें जुनीं
ग्रीष्मांतीं उडवीं करोनि रचिलीं तें पर्णशालांगणीं,
तेथें रम्य कुरंगसंघ बसले होते बहू, ते सुखें
रोमंथा करिती अणोनि वरती तें भक्षिलेलें मुखें. ५२
[स्र.] झाले अग्नि प्रदीप्त, प्रकट सुचविती हें[२] जनालागिं देखा,
ऐशा लागोनि वायू गगनिं सुरुचिरा चालल्या धूम्रलेखा,
ज्यातें येई सुगंध स्फुट हुत अनलामाजि जें आज्य त्याचा,
त्या देती शुद्धता त्या, अतिथि ह्मणुनि जो संघ येई जनांचा. ५३
[शा.वि.] ऐशा त्या मुनिच्या तपोवनिं तईं भूपाळ येवोनियां,
"सूता, सोडुनि शीघ्र नेइं तुरगां विश्रांतितें घ्यावया,"
ऐसें सांगुनि सारथ्या, उतरवी राणीस खालीं अर्धी,
मागोनी उतरे रथांतुनि महाराज स्वयें प्रौढधी. ५४
[भु.प्र.] सपत्नीक भूपाळका पाहतांची, सभा पातली त्याजपाशीं मुनींची;
तईं ती नयज्ञां महीपालकाची यथायुक्त पूजा करी राजयाची. ५५
[उ.जा.] संध्याविधीनंतर तो महीप ये दर्शनाला गुरुच्या दिलीप,
अरुंधतीच्या सह बैसलासे, स्वाहासवें अग्निच तेविं भासे. ५६
अरुंधतीला अणखी वसिष्ठा तीं वंदिती पादिं धरोनि निष्ठा,
सुदक्षिणा आणिक भूप यां, तीं दोघांहि आशीर्वचनास देती. ५७
[शि.] रथाच्या आघातीं श्रम बहुत झाला नृपतिला,
परी आतिथ्यानें सकलहि मुनीच्या निरसला,
"असे कीं राज्याची स्थिति कुशल वत्सा, अजवरी,"
अशी पृच्छा राजाप्रति गुरु वसिष्ठाभिध करी. ५८

---

१ या क्रियापदाचा कर्ता "धूम्रलेखा." २ "अग्नि प्रदीप्त झाले हें धूम्रलेखा सुचविती" असा अन्वय. ३ समुदाय. ४ नीति जाणणाऱ्या. ५ स्वाहा म्ह० अग्नीची स्त्री. तिच्या सवें हा अग्नीच बसला आहे काय असें भासे.

[उ.जा.] अथर्वकर्मी निपुणा गुरूचें ऐकोनि हें वाक्य दिलीप साचें,
करी यथायोग्य वदावयास आरंभ तो भूप मुनीश्वरास. ५९

[व.ति.] "राज्यांत सौख्य मम, यांत नसेचि शंका,
कां जे मला तुह्मि सदैव सहाय देखा;
दैवी मनुष्यकृत वा मज ये विपत्ती,
तुह्मीच दूर करितां सकला विपत् ती. ६०

[शा.वि.] अप्रत्यक्ष रिपू तयांसहि तुझे मंत्र त्वरें मारिती,
माझे बाण तरी समक्ष रिपु जे त्यांनाच संहारिती,
यासाठींच गुरो, तुझ्या सुविमलीं मंत्रीं मदीयां शरां
व्यर्थत्वा दिधलें! नसेचि अणुही संदेह, विप्रेश्वरा. ६१

[व.ति.] अग्नींत होम करिसी विधिनें, गुरो, तूं
तो होतसे जगतिमाजि सुवृष्टिहेतू,
तेणें अवग्रह समस्त निरस्त होती,
धान्यें समग्र पृथिवीवरि पोसताती. ६२

[उ.जा.] शतायुषी, निर्भय, ईतिहीना प्रजा मदीया असती अदीना,
यालाहि हेतू तव पुण्यकृत्य; किती वदूं त्वत्पदपद्मभृत्य! ६३

[शि.] बहू दुःखें माझ्या हृदयकुहरीं वास करिती,
तयांच्या चिंता तों सकल तुजलागींच असती,
अशा तूझ्या साह्येंकरुनि विपदा अल्पहि नुरे,
अविच्छिन्ना लक्ष्मी मम विलय पावेल कशि रे? ६४

[पृ.] परंतु तव या सुनेप्रति न पुत्र बा होतसे,
ह्मणोनि मजला जगीं अणुहि तोषकारी नसे;
जरी मम वशीं असे विमल रत्नसू मेदिनी,
तिणेंहि नुपजे तसा प्रबल हर्ष माझ्या मनीं. ६५

[शा.वि.] माझ्या पत्निस पुत्ररत्न बरवें नाहीं जरी जाहलें,

१ अथर्व म्ह० अथर्वण वेद. यामध्यें इष्टकार्यसाधनाचे मंत्र सांगितले आहेत. त्या वेदांत सांगितलेल्या कर्मांत वसिष्ठ ऋषि निपुण होता, म्हणून त्यास इष्टकार्यसाधनोपयोगी मंत्रतंत्रविधानें ठाऊक होतीं. २ अवृष्टी. ३ अवृष्टी अतिवृष्टी इत्यादि उपद्रव, तद्रहित. ४ तुझ्या पादकमलाचा चाकर (मी). ५ तव या सुनेप्रति ह्मणजे ह्या सुदक्षिणेला.

हे ताता, मग पिंडदान करण्या कोणी नसे राहिलें;
ज्यांना उत्सुकता बहूत असते, कव्याशनाची[1] खरी
तीं सारीं पितरें निराश अगदीं होतील हो! अंतरीं. ६६

[व.ति.] मी देतसें उदक जें पितरांस आतां,
तें यापुढें नचि मिळेल ह्मणोनि, ताता,
निःश्वास टाकुनि पिताति बहूत उष्ण,[2]
ते लागुनी उदक होत असे कवोष्ण.[3] ६७

[शा.वि.] देवांच्या सुटलों ऋणांतुनि बहू यागादिकीं तत्वता,
वंशच्छेद ह्मणोनि पैतृकऋणीं आहें बुडालों स्वतां,
लोकालोक[4] नग प्रकाशित, व तो हीनप्रकाशी जसा,
माझ्याही स्थितिचा प्रकार, गुरुजी, झाला असे हो तसा. ६८

[भु.प्र.] तपोदान ह्यांच्या वशें पुण्य होतें, परत्रींच तें सौख्य लोकांस देतें,
परी शुद्धसंतानयोगें सुखाप्ती इथें आणि लोकांतरीं तुल्य होती. ६९

[शा.वि.] दारीं लावुनि रोंप त्यास उदकेंही वाढवीलें स्वतां,
वाटे दुःख मनास फार जरि त्या वृक्षास ये वंध्यता,
तैसा मी तुमचा, न संतति मला, हें हो तुह्मी जाणुनी
कैसें वाइट नाहिं वाटत बरें आतां, गुरूजी, मनीं! ७०

[स्वा.] स्नानहीन मदमत्त गजाला दुःसह प्रगट बंधन त्याला,
तेंवि पैतृक मला ऋण जांची,[5] टोंचणी मम मना बहु जांची. ७१

[शा.] त्यापासोनी ज्या रितीनें सुटेन, तैसें कीजे शीघ्र वा संविधान,

१ पितरांकरितां जें अन्नादिक करितात तें कव्य. त्याच्या भक्षणाची. २ सांप्रत मी जें उदक देतों तेंही पुढें मिळणार नाहीं म्हणोन उष्ण श्वासोच्छ्वास टाकीत तें पितात. त्या उष्ण श्वासांनीं सांप्रत मी जें उदक देतों तेंही कोंमट होतें तरी ते पितात. "बहुत उष्ण असे निःश्वास टाकुनि पितात ते उष्ण निश्वास लागून उदक कोंमट होतें" असा अन्वय. ३ कोंमट. ४ लोकालोक ह्मणून भूमंडळाच्या दक्षिणकडे पर्वत आहे. त्याच्या उत्तर भागाकडे लोक म्हणजे प्रकाश आणि दक्षिण भागाकडे अलोक म्हणजे अप्रकाश (अंधकार) असतो याजकरितां यास लोकालोक असें म्हणतात असें पुराणांत सांगितलें आहे. ५ ज्या ऋणाची.

ईक्ष्वाकूंना अर्थ जे कां दुराप, ते साधाया शक्त तूझा प्रताप."७२

[सु.म.] अशी प्रार्थना ऐकुनी भूपतीची, समाधी तईं लावि विप्रेंद्र साची;
मिटोनी बसे लोचनातें घडी तो, जसा सुप्तमत्स्यहृद स्तब्ध होतो. ७३

[शा.वि.] जो होता प्रतिबंध संततिस त्या भूमीपतीच्या खरा,
तो तैं ध्यानबळें कळे सकळही शुद्धा तपस्वीश्वरा,
तेव्हां ध्यानविसर्जनास करुनी झाला मुनी बोलता,
सांगे पूर्विल सर्व तो नरपतीलागीं समूला कथा. ७४

"संपादूनि पुरा सुरेश्वरकृता आज्ञा तुवां सादर,
भूलोकाप्रति यावयास निघतां तेथूनियां सत्वर,
मार्गामाजि मनोज्ञ कल्पतरुची छाया असे चांगली,
तेथें जाण सुखेंकरोनि सुरभी होती तईं बैसली. ७५

[सु.म.] ऋतुस्नात जाणोनि भार्या स्वतांची, तुला ओढ होती तिला भेटण्याची,
उपेक्षा करीतां घडे भ्रूणहत्या, अशा हेतुनें भीशि तूं पापकृत्या.
ह्मणोनी जरी सव्य त्या धेनुकेतें असे योग्य घेणें तईं देख तूतें,
तथापी न तैसें क्षितीशा करीतां, धरीला तुवां संभ्रमें शीघ्र पंथा. ७६

[व.ति.] ऐसें अयोग्य करणें घडतां, महीपा,
ती कामधेनु चढली मनिं फार कोपा;
त्याच्या भरांत वदली बहु तीव्र वाणी,
ती मी तुला वदतसें परिसें स्वकानीं.
'मातें असें अवगणोनि निघूनि जासी,
आराधिल्याविण अतां मम संततीसी

१ इक्ष्वाकु म्हणून वैवस्वत मनूचा प्रथम पुत्र होता. हा सूर्याचा नातू होय. हा सूर्यवंशांतील पहिला राजा. याची राजधानी अयोध्या. हा राजा मोठा प्रख्यात झाला. यानें वसिष्ठऋषीपासून आत्मज्ञान संपादून परमपदप्राप्ति करून घेतली. याच्याच नांवावरून याचे पुढील वंशजांस इक्ष्वाकु किंवा ऐक्ष्वाकव हें नांव पडलें. प्रसिद्ध जो ककुत्स्थ राजा तो इक्ष्वाकूचाच पौत्र होय. "इक्ष्वाकुवंशीय जे राजे त्यांस जे अर्थ दुराप म्ह० दुर्लभ ते साधण्यास तुझाच प्रताप समर्थ होय" असा अन्वय. २ दुर्लभ. ३ ज्यांतले मासे निजले असा डोह. ४ पूर्वी इंद्राला शत्रुभय प्राप्त झालें असतां पृथ्वीवरील मोठे पराक्रमी राजे त्याच्या साहाय्यार्थ स्वर्गास जात असत. ५ इंद्रानें केलेली. ६ कामधेनू.

तूतें प्रजा कधिं न होइल हे दिलीपा !'
ऐशापरी सुरभि दे तुजलागिं शापा. ७७

[इं.व.] मंदाकिनीच्या[1] बहुखोल डोहीं क्रीडा करी दिग्गजसंघ[2] पाही,
चाले जळाचा बहु तैं खळाळा, व्यापीतसे तो ध्वनि आभाळाला.
[उ.जा.] जो चंड ऐसा बहु त्याच काळीं कीं ऐकतां बैसवि कानटाळी,
तेणें तुवां वा तव सारथ्यानें न ऐकिला शाप, नृपाळ, कानें.७८

[व.ति.] भूपा, असा सुरभिचा अपमान झाला,
तो होय संप्रति निरोधक इच्छिताला.
पूज्यापमान घडतां, नृपते, क्षणांत
होतो जनीं शुभनिरोध[3] धरी मनांत. ७९

चालू असे वरुणसत्र भुजंगलोकीं[4],
लागे तया दुध दहीं घृत ही विलोकीं,
या हेतुनें सुरभि तेथचि राहिली ती,
द्वारा भयंकर भुजंगम राखिताती. ८०

[शा.] तीच्या स्थानीं तत्सुता मानुनी, जी, शुद्ध चित्तें तूं सपत्नीक पूजीं;
भूमीपाळा, सेवनें ती सुतुष्ट होतां,आहे शक्त द्याया अभीष्ट.''८१

[व.ति.] ऐसें वदे मुनि तया, तंव तेचि काळीं,
ती नंदिनी अतिपवित्र चरोनि आली,
सूर्योदयास्तसमयीं विधियुक्त नित्य,
जीच्या वशें घडतसे मुनिहोमकृत्य. ८२

[भु.प्र.] असे पल्लवाच्या परी स्निग्ध पूर्ण, तशी शोभली रम्य आरक्तवर्ण,
कपाळीं नव्या इंदुसा चांदवाही,ह्मणोनी गमे धेनु संध्येपरी ही.८३

[शा.वि.]कुंडाचे परि कास थोर विलसे, ऐशी तदा धेनुका
वत्सा पाहुनि शीघ्र कोमट तिचा दुग्धौघ चाले निका,

१ ही स्वर्गांतील नदी आहे. २ पृथ्वी स्थिर रहावी म्हणून तिला दाबून धरण्याकरितां तिच्या प्रत्येक बाजूला एक एक मोठा हत्ती ठेविला आहे, त्यास दिग्गज असें म्हणतात. दिक् म्हणजे दिशा आणि त्यांच्या ठायीं स्थापिलेले गज म्हणजे हत्ती असा दिग्गज या शब्दाचा अर्थ आहे. हे ऐरावत पुंडरीक इत्यादिक आठ आहेत. ३कल्याणाचा प्रतिबंध. ४ पाताळलोकीं.

जो कां फार असे जनीं अवभृथापेक्षांहि शुद्ध स्वतां,
त्यायोगें धरणीविभाग भिजला तैं तेथिचा तत्वतां. ८४

[भु.प्र.]उडालीं रजें तैं खुरीं फार तीच्या, तिहीं व्यापिलें सर्व गात्रां नृपाच्या,
तिहीं घालुनी त्यास तीर्थाभिषेका करी शुद्ध ती, वाटलें सुज्ञ लोकां.८५

[शा.वि.]जीचें दर्शन पुण्यकारक अशा धेनूस त्या देखुनी,
झाला तुष्ट मनांत फार शकुनज्ञानी तईं तो मुनी,
"याचा जाइल हो, मनोरथ खरा सिद्धीस," ऐसें स्वतां
जाणोनी शकुनावरोनि गुरु त्या होई पुन्हा बोलता. ८६

[शा.] "राजा, आतां आपुली कार्यसिद्धी झाली, ऐसें मानि बापा, त्रिशुद्धी;
कांकीं हीचें नांव घेतांचि आतां कल्याणी हे पातली, भूमिनाथा.८७

[शा.वि.]रानीं कंदमुळें फळें हि मिळती तीं मात्र खाऊनि रे,
हीच्या सन्निध राहुनी सतत बा, सेवीं हिला आदरें;
अभ्यासें सततें जसी मिळविती विद्येच्छु विद्या बरी,
तैसें सेवन सुप्रसन्न तुज ही होईल तों तूं करी. ८८

[व.ति.] ती चालतां तिजसवें गमना करावें,
ठाके उभी तरि तुवांहि उभें रहावें,
स्वेच्छावशें जरि बसे तरि तूं बसावें,
ती पी जलास मग तूंहि जलास प्यावें. ८९

[पृ.] प्रभातसमयीं पुजो तव वधू हिला भक्तिनें,
वनावधिच जाउनी हिजसवें फिरावें तिनें,
पुन्हा परत येइ ही नियत सांजवेळीं घरीं,
तईं तिस सुदक्षिणा धॆरुनि जाउ बा सामुरी. ९०

[व.ति.] हीचा प्रसाद जंव होइल तोंवरी ही
सेवा हिची करि अशी, न विचारि कांहीं;
सत्पुत्रवन्नरगणीं पितृतुल्य बा, तूं
होईं सुशीघ्र; तव कार्यमविघ्नमस्तु !" ९१

---

१ यज्ञाच्या अंतीं यजमानास एक स्नान विहित आहे. तें अतिशयित पवित्र आहे. २ हें संबोधन. ३ खरोखर. ४ घराहून. ५ ज्यांना उत्तम पुत्र आहेत अशा पुरुषांच्या समूहांत. ६ बापाप्रमाणें ( तूं हो ! ). ७ तुझें कार्य निर्विघ्न घडो !

[उ.जा.] *ऐसी मुनीची परिसोनि कानें आज्ञा तई प्रीतमनें नृपानें,
"बरें," असें बोलुनि तो सभार्य स्वीकारि जोडोनि करांस आर्य. ९२

[शा.वि.] तो सत्य प्रियभाषणी मुनिगणीं श्रेष्ठ स्वयें यापरी
सांगोनी नृपनायकास विधिचा[1] सूनू[2] हि युक्ती खरी,
झाली रात्र बरीच हें हि मग तो जाणोनियां मानसें,
"वत्सा, जाय निजालयास," ह्मणुनी आज्ञा तया देतसे. ९३

राजाला उपचार योग्य असती ते तें करावे, असें
होतें त्या मुनिला तपोबल, परी त्यानें न केलें तसें;
भूपाला व्रत उक्त जें तदुचिता शास्त्रांत सांगीतली
शय्या दर्भमयी व्रतज्ञ मुनिनें पृथ्वीश्वरा योजिली. ९४

तेव्हां दावियली वसिष्ठमुनिनें त्या पर्णशाला भली,
राणी आणिक तो यथोक्तनियमें तेथें सुखें नीजलीं;
जेव्हां अध्ययनार्थ शिष्य उठले[3] तें तद्ध्वनी ऐकुनी,
आतां रात्र न फार, तर्क असला केला तयांनीं मनीं. ९५

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या
गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक
भाषांतरांतील हा वसिष्ठाश्रमगमन नामक
प्रथम सर्ग समाप्त झाला असे.

ज्याचा तात असे सदाशिव कृति, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंश नामक महाकाव्य प्रयत्नें मह
केलें प्राकृत, त्यामधील पहिला हा सर्ग आहे पहा.

---

* अथवा ( याच अर्थाचा दुसरा श्लोक. )

[शा.वि.] आशीर्वादपुरःसरा गुरुकृता आज्ञा तई ही अशी
ऐकोनी ससुदक्षिण क्षितिपती संतोषला मानसीं;
नम्रत्वें कर जोडुनी वदतसे " हां जी! अतां यापरी
हा शिष्या अपला करील विधिवत् या धेनुची चाकरी." ९२

१ ब्रह्मदेवाचा. २ पुत्र ( वसिष्ठ. ) ३ मोठ्या प्रातःकाळीं उठून विद्यार्थ्यांनीं पठत बसावें असा संप्रदाय त्या काळीं होता असें या श्लोकार्थावरून व्यक्त होतें.

# सर्ग दुसरा.

## श्लोक.

[स्र.] प्रातःकालीं सुगंधाक्षत विमल फुलें वाहिलीं धेनुकेला,
भार्येनें भूपतीच्या मुनिवरहवनासाठिं तद्दोह केला,
वत्सातें आंखडोनी नरपति तिजला सोडि रानांत जाया,
सत्कीर्ती हेंचि ज्याचें धन नृपति असा तीस लागे भजाया. १

[शि.] खुरांच्या विन्यासें सरज पथ जो शुद्ध करि ती,
तयें मार्गे राणी तदनुगमना होय करिती;
श्रुतीनें केला जो परम शुचि अर्थ प्रकट रे,
तया अर्थालागीं स्मृतिहि जशि लोकीं अनुसरे. २

[उ.जा.] वाटेंत कांटे, वनिं गार वारा, तसा कसा सोशिल ही उबारा,
अशी दया फार मनांत वागे, ह्मणोनि धाडी नृप तीस मागें;
समुद्र चार स्तन तेचि होती, गोरूपिणी हे धरणीच हो ती
कल्पोनि ऐसें जणुं भूमिपाळ, करी तिचें रक्षण तो कृपाळ. ३

[वं.] व्रतार्थ गोसेवक जाहला स्वतां, तो सेवकांदेखिल धाडि मागुता,
रक्षा परापेक्ष तया कधीं नसे; अशी प्रतापी मनुसंतती असे. ४

[उ.जा.] आस्वाद ज्यांना बहुसाल येई, असे तृणग्रास मुखांत देई,
अंगें तिचीं खाजवि तो नरेश, करीं निवारी अपकारि दंश,

१ त्या गाईचें दोहन. २ धुळीनें भरलेला. ३ त्या गाईच्या मागून जाणें. ४ श्रुति म्हणजे वेद. हा अत्यंत विस्तीर्ण व दुर्बोध असल्यानें त्यांत सांगितलेल्या धर्माचें ज्ञान मंदमतीजनास होणें अशक्य असें जाणून मन्वादिक जे मोठे ज्ञानसंपन्न झाले, त्यांनीं श्रुतीचा अर्थ मनांत धरून तदनुसार धर्मप्रतिपादक अशी व्यवस्थित व संक्षिप्त व सुलभ अशी स्मृतिरचना करून धर्मशास्त्र प्रवृत्तींत आणिलें. ही गोष्ट लक्ष्यांत आणून कवीनें स्मृतीची उपमा राणीला (सुदक्षिणेला) दिली. ती अशी कीं श्रुतीनें पूर्वी प्रतिपादित जो अर्थ त्यालाच अनुसरून तिच्या मागून जशी स्मृति प्रवृत्त झाली त्याच रीतीनें धेनूनें अगोदर जो मार्ग धरिला त्याच मार्गाचें अनुसरण तिच्या मागून राणीनें केलें. याप्रमाणें सादृश्य आल्यानें ही उपमा फार समर्पक झाली. ५ "रक्षार्थ त्याला नलगेचि दूसरा स्वयें प्रतापी मनुवंश हो खरा" असें पाठांतर. ६ बहुत. ७ हातांनीं. ८ डांस.

वाटे मनाला तिकडेच जाय, परी करीना तिस अंतराय,
तीच्या धराधीश्वर तें स्वभावें, सेवेंत तो तत्पर होय भावें. ५

[वं.] राहे उभी ती मुनिधेनु जोंवरी, ठाके उभा सादर भूप तोंवरी;
स्वेच्छावशें ती जंव होय चालती, तो चालता होय तईं धरापती;

[उ.जा.] बसे तईं तोहि बसे महीप; ती पी जला तैं जल पी दिलीप;
छायेपरी धेनुस तो नृपाळ लक्षूनि वर्ते वनिं सर्वकाळ. ६

[शा.वि.] छत्रादि[1] क्षितिपत्वसूचक[2] जरीं चिन्हें न होतीं वनीं,
त्याचें अद्भुत तेज देखुनि गमे हा भूप ऐसें मनीं;
ज्याच्या आंत मदातिरेक[3] असुनी, बाहेर गंडस्थलीं
वाहेना मद, तो गजेंद्र, उपमा साजे तईं त्या भली. ७

[भु.प्र.] लतातंतुनीं केश गुंडाळलेले, असा राजचापास घेऊनि चाले;
जणूं धेनुरक्षामिषानें अमूप, वनीं शासि तो दुष्ट[4] सत्वांस[5] भूप. ८

[शा.वि. राजासन्निध चोपदारहि नसे, तेव्हां तरू[6] बाजुनं
होते चित्रविचित्र ते मदकलें[7] शाखास्थपक्षिस्वनें[8],
'भूपालादर योग्य संप्रति,' असें आणोनि जाणों मनीं,
' स्वामिन् हो विजयी !' ह्मणोनि करिती सानंद ललकारणी. ९

अग्नीच्या परि कांतिमान् स्वनिकटीं भूमीपती हिंडतां,
'हा पूजार्ह !' असें विचारुनि मनीं वायुप्रयुक्ता लता
आनंदें विमलें फुलें उधळिती वेगें तयाच्या वरी;
जैशा नागरकन्यका उधळिती लाह्या प्रमोदें करी[9]. १०

हातीं शस्त्र तरी दयार्द्र हृदयीं हा, हें तयां[10] सांगती
निःशकें हृदयें, ह्मणोनि हरिणी विश्वासुनी वागती;
डोळे फार विशाळ जे सफलता[11] त्यांची तईं जाहली,

१ छत्री चंवऱ्या वगैरे. २ राजेपणास दाखविणारीं ( चिन्हें ). ३ मदाचा अतिशय. ४ अपकारक. ५ प्राण्यांस. ६ झाडें (" ललकारिणी करिती " याचा कर्ता). ७ मदाच्या योगानें मंजुळ. ८ खांद्यांवर बसलेले जे पक्षी त्यांच्या शब्दांच्या योगानें तरु ("ललकारणी करिती" असा अन्वय). ९ राजा नगरांत प्रवेश करूं लागला म्हणजे त्यावर तेथील कुमारिकांनीं लाह्या उधळाव्या असा आचार होता. १० हरिणीतें ( त्यांचीं स्वहृदयें सांगतो.) ११ सार्थकता (विशाळपणाची).

जेव्हां भूपतिची यथेच्छ रुचिरा त्यांनीं तनू पाहिली. ११

वंशांच्छिद्रमुखीं समीर शिरुनी जे कां ध्वनी ऊठती,
पांव्यानें घडणार कार्य बहुधा ते तेंवि संपादिती;
गाती त्यावरि देवता वनगता उच्चस्वरानें स्वतां
कुंजामाजि बसोनि कीर्ति अपुली, ती होय तो ऐकता. १२

[व.ति.] शैलस्थनिर्झरजळें बहु गार झाला,
ये पुष्पसंगमवशेंचि सुगंध ज्याला,
जो मंद, तो पवन आतपपीडितातें,
अत्यंत शुद्ध ह्मणुनीच भजे नृपातें. १३

[शा.वि.] वृष्टीवांचुनि शांत होय वणवा; पुष्पांफलांची भली
वृद्धी वृक्षसमुच्चयास बरवी होऊं बहू लागली;
दुःखा देइ न दुर्बळास बळिया प्राणी स्थिती यापरी
झाली, तो नृप सर्वरक्षक तईं येतां वनाभ्यंतरीं. १४

[उ.जा.] दिशांस शुद्ध स्वगतिक्रमांनीं फिरे करोनी दिवसावसानीं,
जाया गृहा पल्लवरक्तवर्ण रविप्रभा आणिक धेनु पूर्ण. १५

[शा.वि.] होम श्राद्ध तसेंचि दान असल्या कार्यार्थ जीची स्थिती,
ती धेनू परते वनांतुनि, तिच्या मागें फिरे भूपती;
सन्मान्यें विधिनेंचि युक्त विलसे श्रद्धा जशी कां जनीं,
तैशी भूपतिनें युता विलसती झाली तईं नंदिनी. १६

आले सूकर पल्वलामधुनियां बाहेर तेव्हां भले,
स्वस्थानीं बसण्यास मोर आपुल्या झाडावरी पातले,
तैसा शाद्वलभूमिभाग हरिणव्रातें तईं वेढिला,
[11]एणें श्यामचि जाहलें वन, तया पाहात तो चालिला. १७

---

१ वेळूच्या छिद्रांत. २ वारा. ३ जाळींत. ४ उन्हानें पिडलेल्या. ५ सायंकाळीं. ६ पल्लवाप्रमाणें रक्तवर्ण (असी रविप्रभा व धेनू या दोघीही स्वगमनानें दिशांस पवित्र करून संध्याकाळीं स्वगृहा जाया फिरत्या झाल्या.) एथें फिरे या क्रियापदाचा कर्ता रविप्रभा आणि धेनु होय. त्यांतून एकदां रविप्रभा याशीं अन्वय व दुसऱ्यानें धेनु याशीं अन्वय विवक्षित असल्यामुळें फिरे हें एकवचनांत क्रियापद घातलें आहे. ७ डुकर. ८ डोबकणांतून. ९ तृणांकुरांनीं युक्त भूमीचा भाग. १० हरिणांच्या समुदायानें. ११ डुकरें, मोर आणि हरिणें यांच्या योगानें (काळीं झालेलीं वनें).

धेनूची बहु थोर कास ह्मणुनी आयास तीतें[1] पडे,
भूपाचें हि वपू गुरू ह्मणुनियां त्याला पडे सांकडें,
दोघांची हि अशा प्रयोजनवशें मंदा गती जाहली,
येतां मागुति ते तपोवनपथा शोभा तिणें[2] पातली. १८

धेनूमागुनि ये वनांतुनि पती, तेव्हां तयाची प्रिया
पाहे त्यासचि टक लावुनि सती युग्में स्वनेत्रांचिया,
तैं डोळ्यांस उपास फार घडले होते अशा हेतुनें
प्राशोनी नृपतीस त्यांनिच गमे केलें जणूं पारणें. १९

[इं.व.] मागें तिच्या भूपति येत होता, आली पुढें जें नरनाथकांता,
दोघांमधें ती विलसे तईं, जी,[3] संध्या जशी कां दिनरात्रिमाजी. २०

[वं.] नमूनियां घालि तिला प्रदक्षिणा, गंधाक्षतांनीं मग ती सुदक्षिणा,
विशाल भालस्थल पूजि धेनुचें, प्रत्यक्ष जें द्वारचि अर्थसिद्धिचें. २१

[शा.वि.] वत्साच्या विषयीं समुत्सुक जरी, ती होऊनी सुस्थिरा
घे पूजा, अतएव हर्ष उभयां अत्यंत झाला खरा;
भक्तांचे हितकारि धेनुपरि जे त्यांचा प्रसाद स्वयें
होतां सत्वर अर्थसिद्धि घडते, हें जाणिजे निश्चयें. २२

[इं.व.] पादीं सपत्नीक गुरूस आधीं वंदोनि तो सांध्यविधीस साधी,
ती दोहनानंतर[4] धेनु बैसे, सेवी तिला सेवि वनांत जैसें. २३

[पृ.] सदार[5] नृपती तिच्या जवळि दिव्य ठेवी बळी,
तसीच उजळोनियां रुचिर मांडि दीपावली,
बसे बसलियावरी, निजलिया वरी तो निजे,
सकाळि उठतां उठे, तिस नरेश ऐसें भजे. २४

[उ.जा.] अशा प्रकारें नृपती समर्थ करी सदार व्रत तो प्रजार्थ,
त्रासे न ज्याचें मन सत्कृतीस, क्रमी असे तो दिन एकवीस. २५

[शा.वि.] राजाचें भजणें खरेंचि अथवा खोटें, यया तोलुनी
पाहावें अशि वासना दृढ मनीं येवोनियां नंदिनी

---

१ अर्थात् चालण्याविषयीं. २ त्यांच्या गतीनें. ३ हें अव्यय आहे. ४ दूध काढल्या-नंतर. ५ स्त्रीसहवर्तमान ( नृपती ).

गंगौघाजवळी सुकोमलतृणें होतीं जिथें चांगलीं
त्या शैलेश[1]गुहोदरीं भयकरीं एके दिनीं पातली. २६

[व.ति.] पीडावया हिंस न हिंस्त्र[2] मनें हि शक्त,
ऐसा मनीं धरुनि निश्चय धेनुभक्त
शोभेकडे नयन दे गिरिच्या प्रदेशीं,
तों सिंह दृष्टि चुकवोनि धरी तयेशीं. २७

[शा.वि.] आक्रोशा करि धेनु, तो ध्वनि महाशैलोदरीं दाटला,
एकाएकिच आर्तवत्सल[3] नृपें तत्काल तो ऐकिला,
होती दृष्टि निमग्न शैलपतिच्या आलोकनीं जों, तंव
तीतें[4] ओढुनि आणि दोरिपरि[5] तो तद्दीर्घहंबारव. २८

धेनू रक्त तिचे वरी मृगपती होता बळें बैसला,
तो बाणासनधारकें नृपवरें वीरें तईं देखिला,
गेरूचा बहुलाल जो गिरि तयाच्या पृष्ठभागीं असे
लोध्राचा तरु फुल्ल, त्या परि तया तैं केसरी तो दिसे. २९

[वं.] चुके नृपाचें अवधान तैं जरी, दयाब्धि[6] सिंहावरि चाल तो करी;
वधार्थ भात्यांतुनि ओढण्या शर मागें त्वरेनें नृपती करी कर. ३०

[शा.वि.] भूपें दक्षिणहस्त तूणित शरग्राहार्थ जैं घातला,
तेथें बैसुनियां बहू चिकटुनी तैसाचि तो राहिला;
मुष्टीमाजि पिसें सुरंग, विलसे कांती नखांची वरी,
शोभे भूपतिची भुजा अचल तैं भित्तिस्थचित्रापरी. ३१

बाहुस्तंभवशें बहु क्षितिपति क्षोभोनि चावी रदां[7],
ध्याया सूड करी प्रयत्न, परि तच्छक्ती न चाले तदां;
होतां क्षीणबल त्वरें अहि[8] महा मंत्रौषधांनीं जसा
क्रोधानें जळतो, मनीं तडफडी भूपाळ तेव्हां तसा. ३२

[वं.] दैवें अपूर्व स्थिति जाहली असी, देखोनि तो विस्मित होय मानसीं;
बोले तईं सिंह मनुष्यवाणिनें, नृपास आश्चर्य दिलें बहू तिनें. ३३

---

१ हिमालयाच्या दरींत. २ हिंसा करणारे (सिंहव्याघ्रादि). ३ पीडिताविषयीं दयालु. ४ त्या दृष्टीतें. ५ जशी दोरी ओढून आणिते तसा तो हंबारव दृष्टीला ओढून आणी असा अन्वय. ६ दयेचा सागर. ७ दांतांस (चावी). ८ सर्प.

[उ.जा.] "आतां, नृपा, हे श्रम सोड साच, हें शस्त्र माझ्यावरि बा वृथाच;
जरी हि वायू उपडी तरूशीं चाले कसें तद्वल पर्वताशीं. ३४

[शा.वि.] कैलासापरि शुभ्रवर्णवृषभीं बैसावयास त्वरें,
मत्पृष्ठीं पद ठेवितो शिव ह्मणोनी हें असे शुद्ध रे,
भूपा, जाण निकुंभतुल्य मजला, मी शंभुचा किंकर
बा कुंभोदरनाम, गोष्टित यया कांहीं नसे अंतर. ३५

आतां देखशि तूं समोर अपुल्या हा देवदारू तरू,
ज्याला शंकर मानितो निशिदिनीं कीं आपुलें लेंकरूं,
प्राशोनी गिरिजा[3]घटस्तनगता माधुर्ययुक्ता [4]पैया,
झाला त[5]द्रस जाणता, गु[6]हाचि बा जाणें नृपाळा [7]जैया. ३६

[उ.जा.] एकेदिनीं कंडु सुटे कपोला ह्मणोनि वन्यद्विप एक आला,
घांशी बळें तो जंव या नगांतें, गेली ययाची निघुनी त्वचा ते.
दैत्यांसवें युद्ध करी कुमार, ते त्यावरी टाकिति अस्त्रभार,
तेव्हां जसा खेद उमा करी ती, झाली तई खिन्न तयाच रीती. ३७

[शा.वि.] तेव्हांपासुनि रक्षणार्थ तरुच्या ईशें[11] मला ठेविलें,
व्हावा त्रास गजांस फार ह्मणुनी सिंहत्वही हें दिलें,
प्राणी येइल कोणि दैवगतिनें एथें तया मारुनी
खावें, ही मज [12]वृत्ति जाण, नृपते, देवें दिली नेमुनी. ३८

[भु.प्र.] नृपा, जाहलीसे क्षुधा फार दीप्त, हिच्या पारणेनेंचि होईल तृप्त,
हिला अंतरीं प्रेरिलें ईश्वरानें ह्मणोनीच झालें असे एथ येणें.
जसा अंबरीं आकळोनी विधूला पितो राहु त्याच्या सुखानें सुधेला,
तसा धेनुला मी धरोनी स्वयें या पितों रक्त हीचें सुखें देख, राया. ३९

अतां येथुनी जाय, भूपा, घराला, न संकोच वाटो तुझ्या बा मनाला;
तुवां दाविली शिष्यभक्ती गुरूला, न अन्याय वाटेल यामाजि त्यां[13]ला,

१ कैलास या नांवें एक पर्वत आहे. त्याचा वर्ण पांढरा शुभ्र आहे. २ पांढऱ्या नंदीवर. ३ पार्वतीच्या घटतुल्य स्तनांतील, पक्षीं पार्वतीच्या घटरूप स्तनांतील. ४ दुग्धा पक्षीं उदका. ५ पयाचा स्वाद. ६ षडाननच. ( या श्लोकांत तरुपक्षीं जलादि अर्थ व गुहपक्षीं दुग्धादि अर्थ श्लेषानें जाणावा ). ७ ज्या पयोरसा. ८ रानांतील हत्ती. ९ वृक्षातें. १० षडानन. ११ शिवानें. १२ उपजीविका. १३ गुरुला.

[शा.वि.] जेव्हां रक्षण वस्तुचें, नृपवरा, शस्त्रप्रयोगें घडे,
तेव्हां शस्त्रवशें अवश्य, नृपते, लोकीं करावें पडे;
शस्त्रोपाय न जेथ, वस्तु मग तें नाशास पावे, तरी
नोहे दूषण शस्त्रधारकनरा; ही गोष्ट आहे खरी." ४०

[स्र.] ऐसी वाणी प्रगल्भा परिसुनि हरिची[1], होय भूपास ठावें
कीं ही माझ्या बलाची प्रतिहति[2] घडली सर्व शंभुप्रभावें,
तेव्हां ही जी अवज्ञा[3] मम घडलि, न ती ग्राह्य होणार लोकीं[4],
ऐशी शांती मनाची करुनि नरपती खेद टाकी विवेकी. ४१

[भु.प्र.] वधी इंद्र वज्रास टाकावयास, शिवें दृष्टिनें स्तब्ध केलें तयास,
तसा बाण मारावयाचा उपाय न चाले, तईं बोलता होय राय. ४२

[वं.] "चेष्टा न कांहीं मम चालते अतां, बोलेन त्या ही हंसशील तत्वतां,
तूं जाणशी सर्व मनोगतास रे, मी सांगतों यास्तव सर्वथा खरें. ४३

[व.ति.] सृष्टिस्थितिप्रलय जो करितो जगाचे,
तच्छासन[6] स्फुट मला अविलंघ्य साचें;
हें अग्निहोत्रिधन[7] सन्निध नाश पावे,
याचेंहि रक्षण मला उचित स्वभावें. ४४

[भु.प्र.] यया एक, सिंहा, असे रे उपाय, तुवां भक्षिजे आज माझाच काय[8],
जिचा वत्स तान्हा घरीं वाट पाहे[5], तिला सोडण्याची करावी कृपा हे." ४५

[इं.व.] ऐकोनि हें भाषण सिंह हांसे; तेव्हां तयाचें मुख फार वासे,
दंष्ट्राप्रभेनें दरिच्या तमाला नाशूनि तो उत्तर दे नृपाला. ४६

[वं.] "प्रभुत्व साऱ्या क्षितिचें तुला असे, तारुण्य लावण्यहि अंगि हें वसे;
बहूत अल्पास्तव टाकुं इच्छिसी म्हणोनि[9] मूढ क्षितिपाल दीससी. ४७

[भु.प्र.] दयेनें जरी अर्पिसी हा स्वकाय, तरी एकली मात्र वांचेल गाय,
तुझ्या वांचण्यानें प्रजापालनाचें महत्कार्य साधेल साऱ्या जगाचें. ४८

[शा.वि.] 'धेनूच्या मरणामुळें गुरु बहु क्षोभेल अग्नीपरी,
त्यातें शांत कसा करूं?' भय असें वाटे जरी अंतरीं,

---

१ सिंहाची. २ पराभव. ३ पराभव. ४ शिवाच्या प्रभावानें झालेला जो पराभव तो पराभव असें लोक समजणार नाहींत असा अर्थ. ५ पाही. ६ त्या शिवाची आज्ञा. ७ धेनुरूप. ८ देह. ९ 'म्हणोनि तूं फार गव्हार दीससी' असें पाठांतर.

एकीबद्दल कोटि धेनुहि तुला द्याया नसे सांकडें,
देती वा प्रतिवेळिं दूध भरुनी ज्या मोठमोठे घडे. ४९

यासाठीं सुखभोगसाधन तनू देऊं नको ही वसी,
एतत्तुल्य बहूपयुक्त दुसरी नोहेच वस्तू असी;
भूमीचें सुसमृद्ध राज्य बरवें जें होय, राया, तया
इंद्राचें पद बोलती बुध, नसे संदेह गोष्टींत या." ५०

[व.ति.] ऐसें वदोनि मृगराज उगाच ठेला,
त्याचा प्रतिध्वनि गुहोदरिं थोर झाला,
सिंहोक्ति जी नरपतीस, गिरी हि तीतें
उच्चस्वरें कथितसे जणुं भूपतीतें. ५१

[भु.प्र.] असें बोलतां सिंह गंभीरवाणी, भयें धेनु पाहे नृपा दीनवाणी,
दयेनें द्रवे अंतरीं तो नृपाळ, पुन्हा बोलुं लागे तयाशीं कृपाळ. ५२

"क्षतापासुनी तारिती, याचि बीजें जनीं क्षत्र हा शब्द रूढीत साजे,
घडे तद्विरुद्धा कृती स्वीयहातें, जळो जीव आणीक साम्राज्य ही तें. ५३

[व.ति.] धेनू बहूत दुभत्या दिधल्या गुरूस,
होईल केंवि परितोप तिहीं तयास,
ही कामधेनुस उणी अणुमात्र नोहे,
त्वां ताडिली शिवबळेंचि, न अन्यथा हें. ५४

[वं] आतां हिचें रक्षण तूजपासुनी असे मला न्याय्य तनूहि वेंचुनी,
साधेल एणें तव पारणें, हरे, होणार नाहीं मुनिकर्म लुप्त रे. ५५

[शा.वि.] तूं ही जाणसि पारतंत्र्यजनितें दुःखें कशीं काय तीं,
रक्षाया तरु हाहि पाहिं तुजला आयास होती किती!
झाला वस्तुविनाशही, तरि करी जो आंगराखूपण
त्याला शक्य नसे धन्यास अपुलें दावावया आनन. ५६

[उ.जा.] धरोनि कांहीं हृदयांत हेतू मातें वधायास न इच्छिशी तूं,

---

१ ज्या धेनू प्रतिवेळीं मोठमोठे घडे भरून दूध देती असा अन्वय. २ हें संबोधन. ३ सिंह. ४ सिंहानें राजाप्रत केलें जें भाषण तेंच उंच स्वरानें पर्वतही राजाप्रत सांगतो काय असी प्रतिध्वनीवर ही उत्प्रेक्षा होय. ५ हे सिंहा.

तरी यशोरूप तनूहि माझी रक्षावयाची करिजे कृपा, जी,
[शा.] पांचा भूतांपासुनी देह होतो, नाशा पावे निश्चयानें, अहो, तो;
त्याच्या ठायीं आमुच्या सारिख्यांची नोहे आस्था, गोष्टि हे जाण साची.५७

[वं.] 'स्नेहास संभाषण होय कारण,' हें बोलती सर्वहि जाणते जन;
पडोनियां गांठ वनांत आपुली संभाषणें दैववशेंहि जाहली;
[शा.] तेणें झाला स्नेहसंबंध आजी, आतां जी कां प्रार्थना तूज माझी
तीचा तूतें योग्य नोहे नकार आणी याचा अंतरीं बा विचार."५८

[उ.जा.] 'तथास्तु' ऐसें वदतां मृगेंद्र[1], संतोषला फार मनीं नरेंद्र[2];
होता तयाचा चिकटोनि हात तो मोकळा होय तदा क्षणांत.

[द्रु.वि.] मग शरासन[3] ठेवि धरेवरी, नृप समाहित[4] होउनि अंतरीं,
मृगपतिप्रति आमिषपिंडसी[5] स्वतनु अर्पुनि घे सुख मानसीं. ५९

[शा.वि.] 'आतां क्रूर मृगेंद्र घालिल उडी,' ऐसें मनीं जाणुनी
खालीं तोंड करोनि भूप बसला तो धीरचूडामणी[6];
आकाशांतुनि पुष्पवृष्टि बरवी त्याच्यावरी तत्क्षणीं
केली विस्मितमानसें करुनियां विद्याधरांच्या गणीं. ६०

'वत्सा, ऊठ !' अशी सुधासुमधुरा[7] वाणी उठे तैं बरी,
ती ऐकोनि नृपाळ पाहि वरि तों त्याला दिसेना हरी[8],
धेनू मात्र उभी स्वमातृसदृशी[10] होती[9] पुढें एकली
जीच्या स्नेहवशें स्तनांतुनि पयोधारा[11] त्वरें चालिली. ६१

भूपा विस्मित देखुनी वदतसे धेनू, "नृपाळा, खरें
माया दावुनियां परीक्षण तुझें केलें असे मीच रे;
नोहे बा मज मारण्यास, नृपते, त्या अंतका[12] ही बळ
अन्याचा मग पाड काय! मुनिच्या ऐसें कृपेचें फळ. ६२

[भु.प्र.] गुरूच्या ठिकाणीं तुझी भक्ति फार, दया तेवि माझ्या ठिकाणीं अपार,
यैयां[13] पाहुनी तुष्ट झालें, नृपाळा, वरा मागुनी घेइ तूं शीघ्र, बाळा.

---

१ सिंह. २ राजा. ३ धनुष्य. ४ समाधानयुक्त. ५ मांसाच्या गोळ्याप्रमाणें. ६ धीर पुरुषांत श्रेष्ठ. ७ अमृतासारखी मधुर. ८ सिंह. ९ उभी होती असा अन्वय. १० आपल्या मातेसारिखी. ११ दुधाची धार. १२ यमालाही. १३ भक्ति व दया यांस.

जगीं अन्य धेनू दुधा मात्र देती, तशी बा मला तूं न लेखी स्वचित्तीं;
अभीष्टार्थ देणार मी जाण, भूपा, प्रसन्ना तुला जाहलें आज, बापा." ६३

[शा.वि.] ज्यानें बाहुबळें जगीं मिळविला अत्युद्धटें 'वीर' हा
शब्द, स्वीय करां जुळोनि वदला तो भूप हर्षें महा.
"माते, वंशसमुन्नती करिलसा सत्कीर्तिमान् शूर ही
व्हावा पुत्र सुदक्षिणाजठरिं या, इच्छा मला जाण ही." ६४

[व.ति.] "वत्सा, तुला तनय होइल शीघ्र तैसा,
त्याला उपाय करि आजि कथीन ऐसा;
पी काढुनी दलपुटांत पँया मँदीया,"
आज्ञा अशी करि तयाँ मुनिधेनु राया. ६५

[शा.वि.] "वत्सा पाजुनि, होम होउनि, उरे जें दुग्ध, हे धेनुके,
तें प्यावें गुरुला विचारुनि, मना हें वाटतें गे निकें;
जैसें पालन भूमिचें करुनियां षष्ठांश मी घेतसें,
चित्तीं येत असे अजी तव पयःपानीं करावें तसें." ६६

[शा.] भूपें ऐसी धेनु विज्ञापिजेली, तें ती पूर्वीहून संतुष्ट झाली;
तीं दोघेंही डोंगरांतूनि मागें आलीं सौख्यें आश्रमालागिं वेगें. ६७

[व.ति.] धेनुप्रसाद नृपतीवरि जाहलेला
सानंदवृत्तिवरुनीच कळोनि आला;
जाणों पुनश्च वचनेंहि कळावयास
विज्ञापुनी गुरुस तो कळवी प्रियेस. ६८

[शा.वि.] वत्सा पाजुनि, होम सारुनिहि, तें क्षीरांश जो राहिला,
आज्ञेनें गुरुच्या दिलीप नृपती तो प्राशिता जाहला;
तें न क्षीर परंतु मूर्त यशचि, प्रत्यक्ष जें पांढरें,
जाणों प्राशियलें नृपें सविनयें अत्यंत तृष्णातुरें. ६९

[स्र.] प्रातःकाळीं प्रयत्नें करवुनि विधिवत् पारणा गोव्रताची,
कृत्यें प्रस्थानकालीं विहित असति जीं तींहि सारूनि साचीं,

---

१ हें संबोधन. २ द्रोणांत. ३ दुग्धास. ४ माझ्या. ५ त्या राजाला मुनिधेनु असी आज्ञा करी असा अन्वय. ६ वांसराला. ७ बायकोस.

देवोनी इष्ट आशीर्वचनसमुदया प्रेमभावें अमोघा[1],
राजाला राणिलाही गुरु निजनगरा धाडिता होय दोघां. ७०

[व.ति.] अग्नी, वसिष्ठगुरु, आणि तदीयपत्नी[2],
धेनू सवत्स[3], इतुक्यांस नृपाळ यत्नीं
वंदोनि आणि करुनी कुशलार्थ सव्य[4],
वेगें निघे शकुन पाहुनि भूप भव्य. ७१

[द्रु.वि.] श्रुतिमनोहर[5] वाजति घंटिका, बसलिया नलगे तिळही धका,
स्खलनहीन[6] व सिद्ध[7], असा रथ नृपतिचा तंव जेविं मनोरथ.

[वं.] आरूढ झाला नृप त्या महारथीं पत्नी सवें घेउनि तो महारथी,
तेजें विराजे बहु तो रथांमधें, शोभे जसा सूर्य नभःपथांमधें. ७२

[शा.वि.] ज्याचें दर्शन[8] कांहिं काळ अगदीं लोकां नसे जाहलें,
तैसेंचि व्रतकष्ट भोगुनि वपू ही क्षीणता पावलें,
यासाठीं प्रतिपद्विधूस[9] बघतां सोत्कंठ चित्तें जनीं
डोळ्यांची नचि होय तृप्ति, तशि या भूपासही देखुनी. ७३

जेथें लावियल्या ध्वजा विलसती अत्युन्नता [10]अंबरीं,
ऐशा स्वीयपुरींत इंद्रसम तो राजा प्रवेशा करी;
तेव्हां पौरजन स्तुतीस करिती संतोषुनी अंतरीं,
घेई राज्यधुरेस[11] मागुति बली भूपाल खांद्यावरी. ७४

अत्रीचें नयनोत्थ तेज[12] धरिती झाली पुरा [13]द्यौ जशी,
किंवा शंकरतेज[14] जन्हुतनया[15] कुक्षींत ठेवी जशी,

---

१ सफल ( असा आशीर्वादाचा समुदाय). २ वसिष्ठस्त्री (अरुंधती ). ३ वांसरासहित. ४ कल्याणकारक. ५ कानास गोड लागणारी. ६ पतन न पावणारा. ७ रथपक्षीं तयार, मनोरथपक्षीं सफल. ८ कांहीं काळ अदर्शन व व्रतमूलक शरीरक्षीणता या गोष्टी चंद्र व राजा या दोघांकडे ही लागू आहेत. ९ शुक्लपक्षारंभीं चंद्रास पाहून जशी लोकांची तृप्ती होत नाहीं तशी या राजास पाहून ही त्यांच्या नेत्रांची तृप्ति होइना. १० आकाशांत. ११ राज्यधुरेस खांद्यावरी घे इ० राज्यकारभार पुनः पाहूं लागे. १२ चंद्ररूप. १३ आकाश. १४ षडाननरूप. १५ गंगा.

तैशी कांतकुलोन्नती करिलशा गर्भा धरी ती सैती,
त्यातें येउनि सर्वलोकँपतिचीं तेजें तदा मीळती. ७९

---

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या
गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक
भाषांतरांतील हा नंदिनीवरप्रदाननामक
द्वितीय सर्ग समाप्त झाला असे.

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, त्यामधील दुसरा हा सर्ग आहे पहा.

---

## सर्ग तिसरा.

### श्लोक.

[शा.वि.] जें[4] कां भूपतिचा मनोरथ गमे प्रत्यक्ष साचा जनां,
उल्लासप्रद उत्सवप्रकट जें भासे सखीलोचनां,
इक्ष्वाक्वन्वयसूत्र अत्रुटित हो ज्याच्या वशें जाहलें,
ऐसें दोहदचिन्ह राणिस तया होऊं तईं लागलें. १

*झाली फार कृशा तनू ह्मणुनियां घाली उणीं भूषणें,
लोध्राचे परि पांढरें मुख तिचें झालें फिकें कांतिनें

---

१ भर्त्याच्या कुलाची उन्नती करील अशा ( गर्भास ). २ पतिव्रता ( सुदक्षिणा ). ३ इंद्रादिक जे लोकपाल त्यांचीं. ४ दोहदचिन्ह. ५ इक्ष्वाकुनामक राजाचा वंश तद्रूप जें सूत्र. ( तें ज्याच्या योगानें अत्रुटित म्ह० अखंडित झालें असा अन्वय ).

* अथवा (वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[स्र.] डोहोळ्यांच्या व्यथेनें तनुस कृशपणा येउनी क्षीण झाली,
फिका झाला मुखेंदू बहु जड म्हणुनी भूषणें अल्प घाली;
पाहांटेच्या सुमारें विरल उडुगणें चंद्र निस्तेज तैसा,
त्या रात्रीचा मला हो उचित दिसतसे तीस दृष्टांत खासा. २

तें, मंद[1]प्रभचंद्रयुक्त रजनी होते पहांटे जशी,
जें[2] तारा विरला नभीं नृपतिची कांता दिसे तें तसी. २

मृद्गंधी मुख भूपती युवतिचें हुंगी रहस्यस्थलीं
वारंवार, तरी तया नृपतिची तृप्ती न तें जाहली;
ग्री[3]ष्मांतीं घन[4]बिंदुसिक्त असल्या त्या पल्वला[5] हुंगुनी
जैसा हत्ति न तृप्त होय रुचिरें गंधें महाकाननीं. ३

भावी पुत्र समस्त वैरि जिणुनी तो चक्रवर्ती महा,
स्वर्गीचा मघवा, तसा पृथिविचा होईल भोक्ता पहा,
हें आणोनि जणूं मनांत इतरां टाकोनि साऱ्यां रसां,
राणी भू[6]रस भोगण्यास्तव धरी मृद्भक्षणीं लालसा[7]. ४

"संकोचें न वदे मशीं मन तिचें इच्छी जया वस्तुला,
सांगा, आजि पदार्थ जो प्रिय तिला, तो शीघ्र तुह्मी मला."
ऐसें उत्तर कोसलेश्वर तईं उत्कंठितें मानसें
राणीच्या सखयांप्रती घडिघडी तो खोदखोदूं पुसे. ५

[शा.] ज्याचा ज्याचा डोहळा तीस होई, तें तें वस्तू भूप आणून देई,
स्वर्गीही त्या कांहिं नोहे दु[8]राप, हातीं घेतां तो स्वयें सज्ज चाप. ६

[पृ.] निरस्त मग जाहले सकल दोहदक्लेश ते,
तसेच बहु पावले अवयव क्रमें वृद्धितें;
गळून पडती जुनीं, मग नवीन येती दलें,
तया सुलतिकेपरी वपु तिचें तईं शोभलें. ७

[व.ति.] जातां अशीं बहु दिनें स्तन पुष्ट झाले,
कृष्णत्व फारचि तदीय मुखांस आलें;
भृंगे जसे रुचिर बैसति पद्मकोशीं,
दृष्टांत तोहि[11] कमि होय कुचद्वयाशीं. ८

---

१ अल्पप्रकाशी जो चंद्र त्यानें युक्त रात्र. २ ज्या रात्रीच्या ठायीं. ३ पर्जन्यारंभीं. ४ मेघापासून पडलेल्या थेंबांनीं भिजलेलें (असें पल्वल). ५ अल्प सरोवराला. ६ भूमीचा रस. ७ इच्छा. ८ दुर्लभ. ९ राजा. १० कमळांच्या कळ्यांवर. ११ भ्रमरयुक्त पद्मकोशाची ही उपमा न्यून म्हणजे त्याहूनही स्तन सुंदर दिसले.

[पृ.] निधान उदरीं जिच्या, धरणि ती विराजे जशी;
जिच्या जठरिं अग्नि, ती विलसते शेमी कां जशी;
जलौघ उदरीं जिच्या, असि सरस्वती शोभती;
नृपाशिं गमली तशी तंव निजा सगर्भा सती. ९

[शा.वि.] पत्नीप्रीति, उदारता, रिपुजयें संपादिलें वित्त जें,
पुत्रोत्पत्तिसमुत्थ सौख्यहि तया भूपास होणार जें;
गोष्टी चार अशा, तयां अनुगुण द्रव्यास वेंचूनियां,
केल्या पुंसवनादि भूमिपतिनें संस्काररूप क्रिया. १०

[स्त्र.] देवाचे अंश आले, ह्मणुनि जडपणा फार गर्भास आला,
त्या योगें क्लेश होती नरपतिदयितेलागिं उत्थापनाला
जोडोनी हात कष्टें निजपतिस वदे, "प्राणनाथा, बसावें,"
जातां गेहीं प्रियेची स्थिति असि बघुनी भूप संतोष पावे. ११

[शा.वि.] ज्ञाते बालचिकित्सक प्रकृतिला जाणोनि गर्भाचिया
देती पौष्टिक औषधें, बहु जिहीं पुष्टत्व आलें तया,
आसन्नप्रसवा निजप्रियतमा झाली स्वकालीं तिला,
द्यौ अभ्रान्वित, तेविं देखुनि नृपा संतोष तें जाहला. १२

उच्चस्थग्रहपंचक स्फुट जई होतें अनस्तंगत,
श्रेष्ठैश्वर्यगणास जें सुचवितें लोकांत अव्याहत,
मंत्रादित्रयजन्य शक्ति करिते अर्था अनंता जशी,
त्या काळीं प्रसवे सुतास विमला भूपालपत्नी तशी. १३

[पृ.] प्रसन्न दिसती दिशा, पवन वाहती सौख्यद,
प्रदक्षिणगतिक्रमा धरिति अग्नि शांतिप्रद,
सुमंगल असें तदा सकळ होय भूचक्र रे,
जगच्छुभद जन्मही भुवनि कीं अशाचें खरें. १४

---

१ निधान (धनाचा ठेवा). २ या नांवाची एक वनस्पती आहे. ३ पत्नीप्रीति, औदार्य संपत्ती, आणि भाविपुत्रविषयक आनंद या चार गोष्टींस अनुसरून. ४ लेंकरांस उपचार करणारे वैद्य. ५ बाळंत व्हायास टेंकलेली. ६ आकाश. ७ मेघांनीं युक्त. ८ मंत्रशक्ति, प्रभावशक्ति, उत्साहशक्ति अशा तीन शक्ति राज्याच्या अंगीं असतात. ९ धनादिकाला. १० असंख्य (हें अर्थाचें विशेष).

[इं.व.] खोलीत बाळंतिणिच्या शिशूचें जें तेज फांके भंवतें तयाचें,
झाले निशीथींहि[1] सुदीप तेणें, निस्तेज चित्रीं लिहिल्याप्रमाणें. १५

[भु.प्र.] स्त्रियगारांतुनी[2] वृत्त पुत्रोद्भवाचें नृपाला कथी दासि[3] येऊनि साचें,
तयेच्या मुखांतील ऐकोनि वाणी, नृपाला गमे गोड पीयूषवाणी,
तईं चामरें आणि शुभ्रातपत्र, अदेय प्रभू मानि हीं तीन मात्र,
दुजें त्यास सर्वस्व द्यावेंच वाटे, असा हर्षसिंधू हृदाकाशिं दाटे. १६

[पृ.] निवातकमलापरी स्तिमितलोचनें[4] भूपती
निजात्मजमुखांबुजा निरखितां सुकांताकृति,
विधूदयवशें उचंबळतसे महाब्धी जसा,
अनावर नृपाचिया हृदयिं हर्ष वाढे तसा. १७

[द्रु.वि.] गुरु वसिष्ठहि येउनि लौकरी, शिशुस जातकसंस्कृति जें करी,
अधिकरम्य दिसेचि हिरा भला नव जसा निकषेवरि लाविला. १८

[शा.वि.] होती मंगळवाद्यघोष बरवे, तें दुंदुभी वाजती,
गाती तालसुरावरी छुमछुमा वारांगना नाचती,
आनंदोत्सव हा महा नृपतिच्या सौधींच झाला नसे,
स्वर्गीं देखिल देवतागण करी संतोषितें मानसें. १९

[स्र.] साऱ्या राज्यांत कोणीहि मनुज न पडे बंदिमाजी कदापी,
ऐशी ठेवी व्यवस्था नरपति धरणीरक्षणीं तें प्रतापी;
यासाठीं पुत्रजन्मीं नचि नर गंवसे बंधमोक्षास[6] पात्र,
कर्जातोनी पित्याच्या नृपतिच सुटला तो स्वतां एक मात्र! २०

[इं.व.] जाईल हा बालक शास्त्रपारा, अंता रिपूच्याहि तसा[7] अपारा,
गत्यर्थ धातू समजोनि त्याचें, ठेवी 'रघू' हें नृप नाम साचें. २१

[पृ.] समृद्ध जनकाचिया बहुत यत्नयोगें भलें
शरीर शिशुचें तईं त्वरित वृद्धिला पावलें;

---

१ दोनप्रहर रात्रीं. २ जनानखान्यांतून. ३ अंतःपुरसंबंधास्तव एथें हे स्त्रीलिंगी पाठ योजिले. ४ निश्चल. ५ स्तब्ध. ६ बंदींतून सोडण्यास योग्य ( पुत्रजन्म झालें असतां आनंदानें बंदीवानास सोडावें असा जो संप्रदाय त्यास अनुलक्षून हें वर्णन आहे ). ७ त्याप्रमाणेंच रिपूंच्या अंतास पावला म्ह० शत्रू मारले.

जसे किरण भानुचे प्रविशतां लघू इंदुला
सुपुष्टि नव येतसे, क्रम तसा शिशू पावला. २२

[उ.जा.] जसे भवानीश्वर षण्मुखानें, जसे जयंतेंहि शचींद्र जाणें,
तत्संमितें तत्सम तेहि दोघे, झाले सुतें तुष्ट तयें अमोघें. २३

[उ.व.] रथांगपक्ष्यापरि दंपतीचें परस्पर प्रेम विशेष साचें
सुतामुळें वांटुनि ऊन व्हावें, परंतु झालें अधिक स्वभावें. २४

[भु.प्र.] वदे दाइ ते बोल तो बाल बोले, धरोनी तिचें बोट हाळूच चाले,
तिच्या संगती चालतांना तयास, विलोकूनि संतोष वाटे जनास.
"प्रणामा करावें" असें सांगतां ती, करी खालतीं मस्तका प्रौढरीती,
अशा बाललीलावशें बाल त्याला, महाहर्ष दे आपुल्या तो पित्याला. २५

[उ.जा.] स्पर्शेंचि जाणों अमृतास वर्षे, त्या बालका भूमिपति प्रहर्षें
डोळे मिटी घेउनियां निजांकीं, दिलीप तत्स्पर्शसुखास चाखी. २६

[शि.] "गुणोत्कर्षें युक्त स्वतनुच दुजी घेउनि अतां,
स्थिती मत्सृष्टीची करि अवतरोनी स्मरपिता"
असें ब्रह्मा जेवीं, नरपतिहि तेवीं सुतवशें
"मदीया वंशाची स्थिति तशिच झाली" ह्मणतसे. २७

[शा.वि.] केलें चौल तईं नृपें स्वशिशुचें जें तें बहू शोभलें,
मंत्र्यांचीं कृतचूड होतिं बरवीं त्याच्या वयाचीं मुलें
क्रीडेतें करिती समस्त, झुलुपें ज्यांच्या शिरीं चांगलीं,
तीं सारीं लिपि शीकण्यास्तव मुलें शाळेमधें घातलीं.

[व.ति.] मूलाक्षरें शिकुनि त्या शिशुच्या समेत
झाला प्रविष्ट रघु पुस्तकवाचनांत,
अल्पा नदींत शिरुनी मग त्याच ओघें
मासा जसा शिरतसे जलधींत वेगें. २८

[शा.वि.] मौंजीबंधन शास्त्रयुक्तविधिनें केलें, पुढें त्याजला

---

१ षण्मुख व जयंत यांशीं तुल्य जो सुत तेणें. २ भवानीश्वर व शचींद्र यांच्याशीं समान ( राजाराणी दोघे ). ३ वांटलें जाऊन (विभागलें जाऊन). ४ विष्णु. ५ ब्रह्मदेव जेवीं म्हणे तेवीं हा नृपतिही म्हणतसे असा अन्वय. ( यांत गुणोत्कर्ष व मत्सृष्टीची स्थिती हीं पदें ब्रह्मदेवाच्या व राजाच्या वाक्यांतही लावायाचीं ).

विद्यावंत गुरु प्रिया शिकविती संपूर्ण विद्या कला;
गेले नाहित यत्न राजगुरुचे थोडेहि तें व्यर्थ रे.
शिक्षेचें सफलत्व लोकिं घडतें शिष्यानुसारें खरें। २९

[इं.व.] चतुःसमुद्रापरि चार विद्या तो आक्रमी बुद्धिगुणेंच सद्या,
आदित्य जैसा निज अश्वयोगें सर्वी दिशां आक्रमितो सुवेगें. ३०

[शा.वि.] नेसोनी अतिशुद्ध शास्त्रविहिता कृष्णाजिनातें निकें,
भूपाळात्मज तो पित्याजवळि कीं अस्त्रां समंत्रां शिके,
जो होता उपमानशून्य नृपती लोकीं दिलीप स्वतां,
धानुष्कांत हि त्यासमान दुसरा तैं नाढळे धुंडितां. ३१
गोऱ्हा तो [1]वृप थोर जेविं बनतो, छावा[2] जसा वा करी,
टाकोनी शिशुता क्रमेंचि तरणा झाला रघू त्यांपरी;
गेली चंचलता लहानपणची, गांभीर्य तें पातलें,
त्यायोगें रघुचें शरीर पहिल्यापेक्षां दिसे चांगलें. ३२

[इं.वं.] गोदानसंस्कार अटोपल्यावरी, त्याचा विवाह क्षितिपाल तो करी;
मनोहरा इंदुस दक्षकन्यका वरोनियां शोभति जेंवि तारका.

[वं.] तदा महीपालसुताहि चांगल्या वरोनि त्या भूपसुतास शोभल्या,
त्या उत्सवाचे निरखूनि सोहळे, मनीं जनांच्या बहुसौख्य जाहलें. ३३

[शा.वि.] मोठाले भुजदंड शोभति भले, छाती [3]कपाटापरी,
जाडी मान, व पुष्टताहि तनुला आली असे साजरी;
ऐसा थोर पित्याहुनीहि रघु तो शोभे तनूच्या वशें,
नम्रत्वें तरि फार अल्पचि तदा लोकांमधें तो दिसे. ३४
राज्याचा गुरु कार्यभार हलका व्हाया नृपें चिंतिलें
कीं, "मत्पुत्र [4]निसर्गनम्र, वरती शिक्षावशें ये भलें
या नम्रत्व विशेप, यास्तव शिरीं याच्याच द्यावा स्वतां,"
ऐसें योजुनि यौवराज्यपदवी देई रघूला पिता. ३५
आद्यस्थान दिलीपरूप तजुनी अंशें गुणेच्छू [6]रमा,

---

१ गोऱ्याचा जसा मोठा बैल किंवा छाव्याचा जसा मोठा हत्ती होतो तसा. २ हत्तीचें पोर. ३ कपाटाप्रमाणें ( विस्तीर्ण ). ४ स्वभावानेंच नम्र. ५ हें उत्तरान्वयी. विशेष नम्रत्व भलें ये असा अन्वय. ६ लक्ष्मी.

झाला जो युवराजसंज्ञ रघु त्यामाजी करी आगमा[1];
जैसी ती[2] चे पुरातना सरसिजा टाकोनियां नूतनीं
सद्यःफुल्लसरोरुहीं प्रविशते चित्तांत उल्लासुनी. ३६

[उ.जा.] अग्नी जसा वायुसहायतेनें, भानू जसा वा शरदागमानें,
मर्दे करी, तेविं सुतें अपार असह्य जालें नृपतेज फार. ३७

[व.ति.] यज्ञाश्वरक्षणिं सशस्त्र रघूस तेणें
योजूनि भूपति तयासह थोर[3]सेने,
निर्विघ्नसिद्धिस [4]शतक्रतुसा महीप
नव्याण्णव क्रतुंस [5]ने विजयी दिलीप. ३८

आरंभि याग मग भूपति शंभरावा,
चित्तीं ह्मणे, "मज शत[6]क्रतुभाव यावा;"
तो भूमिपाळ विधिपूर्वक अश्व सोडी,
रक्षार्थ वीरसमवेत रघूस धाडी.
रक्षी हयास जरि सावध वीरचक्र,
हारी तयास तंव गुप्तपणेंचि शक्र;
जो इच्छितो जनिं शतक्रतु व्हावयास
ऐसेंचि विघ्न करितो मघवा तयास. ३९

पाहोनि हें सकल सैनिक थक्क झाले,
खेदें विचारबल तें अगदीं न चाले;
दैवें वसिष्ठगुरुची इतुक्यांत गाय
ये तेथ ती त्वरित नंदिनी [7]पुण्यकाय. ४०

तो साधुमान्य रघु घेउनि धेनुमूत्रा
लावी सुशीघ्र मनिं भाव धरोनि नेत्रा;

१ आगमन. २ लक्ष्मी. ३ थोरसेने योजून असा अन्वय. ४ शंभर क्रतु म्हणजे यज्ञ ते केले म्हणजे शतक्रतुत्व म्हणजे इंद्रपदवी प्राप्त होते. इंद्रानें शतक्रतु केले म्हणून तो स्वर्गीचा राजा झाला. कोणी शंभर क्रतु करूं लागला असतां इंद्राला भय उत्पन्न होऊन तो त्याला विघ्नें करितो, असें पुराणांत वर्णन आहे. इंद्रानें शंभर क्रतु केले म्हणून त्याचें नांव शतक्रतु पडलें. ५ नेता झाला. ६ इंद्रत्व. ७ पुण्यकारक आहे देह जीचा अशी.

तेणें समग्राहि अतींद्रिय[1] वस्तुजात[2]
योग्यांपरी[3] दिसतसे रघुला क्षणांत. ४१

[शा.वि.] जेव्हां यज्ञतुरंगमास मघवा नेई रथा बांधुनी,
तेव्हां तो उधळे बहू, तंव धरी त्या मातली दाबुनी;
ऐसा पूर्वदिशेकडे सुरपती जातां सुवेगें तदा,
त्यातें अश्वसमेत देखुनि रघू तो पावला संमदा[4]. ४२

त्याचीं तीं नयनें सहस्र[5] निमिषेंहीनें शरीरावरी,
घोडेही हिरवे विलोकुनि रघू चिंती तदा अंतरीं
कीं, "हा इंद्र खरा," वदे मग महागंभीरनादें तया,
त्यायोगें फिरवी गमे सुरपतीलागीं पुढेंजातया[6]. ४३

"हे इंद्रा, तुज मानिती बुध सर्वीं[7] मुख्यांशभागी असें,
माझा तात अतां यथोक्तविधिनें यज्ञास साधीतसे;
त्यामाजी अजि अंतराय[8] करिसी, ही गोष्ट शोभे तुला
कैसी, बा[9] सुरनाथ, यज्ञपतिला ! सांगें खरें हें मला ! ४४

[व.ति.] त्रैलोक्यनाथ सकलज्ञहि तूं बळा[10] रे,
यज्ञघ्न जे नर तयां दमिजे तुवां रे;
यज्ञास विघ्न जरि तूंचि करीसि आतां,
बा यज्ञनामहि नुरेल जगांत, ताता. ४५

यज्ञांग मुख्य हय हा ह्मणुनी ययातें,
बा, सोडणें उचित हेंचि सुरेश तूतें;
सन्मार्ग दाखविति थोर जगास जे कीं,
ते दुष्टमार्ग न कधीं धरिती विवेकी." ४६

[स्र.] ऐशी वाणी प्रगल्भा परिसुनि रघुची युक्तियुक्ता बळारी[11]

१ इंद्रियांस अगोचर. २ पदार्थसमुदाय. ३ योगीपुरुषांप्रमाणें. ४ आनंदास. ५ गौतमऋषीची स्त्री अहल्या हिच्या बरोबर इंद्रानें व्यभिचारकर्म केलें म्हणून "तुझ्या अंगास सहस्र भगें पडतील" असा त्या ऋषीनें त्यास शाप दिल्यावरून त्यानें त्याची प्रार्थना बहुतप्रकारें केली असतां, "तीं भगें नेत्रें होतील" असा उच्छाप दिला, म्हणून इंद्र सहस्रनेत्र झाला. ६ पुढें जाणाऱ्या सुरपतीप्रत असा अर्थ. ७ यज्ञांत. ८ विघ्न. ९ हें संबोधन. १० हे इंद्रा. ११ इंद्र.

आश्चर्यांभोधिमाजी बुडुनि निवतसे तो तदा वज्रधारी[1];
सांगोनी सारथ्याला निजरथ फिरवी मागुता, सच्चरित्रा[2]
देता झाला सुरेश प्रकटितमहिमा उत्तरा राजपुत्रा[3]. ४७

[उ.जा.] "जें बोलशी, राजकुमारका, हें, तें सर्वथा जाण यथार्थ आहे;
परंतु ज्यांचें यश हेंचि एक असे धन, क्षोणिपपुत्र[4], देख,
[इं.व.] त्यांनीं तयाशींच सदा जपावें; हा धर्म तूं जाण, रघो, स्वभावें;
पाळावया यासचि आज लोकीं आरंभिलें कृत्य असें विलोकीं.
माझें यशोरूप धन प्रसिद्ध, ज्या जाणती सर्व जगीं प्रबुद्ध,
त्यातें हराया तव तात पाहे[5]; सोसेल, बा, गोष्ट कशी मला हे? ४८

[द्रु.वि.] हरि[6]च एक जसा पुरुषोत्तम, शिवचि एक महेश्वर तत्सम,
नचि जगांत असे नर, बा, दुजा, वदति हें मुनि धन्य, नृपात्मजा.
[इं.व.] शतक्रतू तेविंच लोकमान्य, मी मात्र आहें जगतीं न अन्य,
हा शब्द कोणी नर अन्य लाहे, सोसेल, बा, गोष्ट कशी मला हे? ४९

[मा.] कपिल[7]मुनिपरी म्या हारिला यज्ञवाजी,
सकलहि तव यत्न व्यर्थ होतील आजी,
करिशिल जरि कांहीं यत्न यालागिं तावें,
गति सगरसुतांची पावशील स्वभावें." ५०

[व.ति.] हांसोनि निर्भयपणें रघु जिष्णुला[9], जी,
बोले, "असाचि जरि निश्चय होय आजी,

---

१ इंद्र. २ हें 'राजपुत्रा' याचें विशेषण. ३ रघूला. ४ हें संबोधन. ५ पहातो. ६ विष्णु. ७ कपिल म्हणून एक मोठा ऋषी झाला. त्यानें सांख्यशास्त्र केलें असें म्हणतात. यास कपिल महामुनि असेंही म्हणतात. सगर नामक राजा अश्वमेध करूं लागला तेव्हां त्यानें आपले साठसहस्र पुत्र बरोबर देऊन यज्ञसंबंधी अश्व सोडिला असतां इंद्रानें गुप्तरूपें त्याचें हरण करून कपिलाश्रमांत नेऊन ठेविला. तो आश्रम पाताळीं होता. पुढें सगरपुत्रांनीं पृथ्वीस मोठें बिळ पाडून पाताळीं कपिलाश्रमांत गेले, तेथें कपिलमुनि समाधि लावून बसला आहे व जवळच आपला अश्व आहे असें पाहून त्यानेंच हा अश्व चोरून आणिला असावा असें मानून त्याला ताडन करूं लागले. तेव्हां त्यानें क्रोधेंकरून डोळे उघडून त्या सगरपुत्रांकडे पहातांच ते सर्व जळून भस्म झाले. अशी कथा पुराणप्रसिद्ध आहे. कपिलानेंच सगर राजाचा अश्व हरिला असेंही पुराणांतरीं असल्याचें ऐकण्यांत आहे. ८ स्वेच्छेनें. ९ इंद्राला.

घे शस्त्र! हूं! रघुस या जिणल्या विना, बा,
साधेल केंवि तव पाहुं महेंद्र, कावा!" ५१

[उ.जा.] बोलोनि ऐसें सुरनायकास, लावी धनुष्यावरि सायकास,
जें ठाण मांडोनि वरी विलोकी रणीं जना तें गमलां पिनाकी. ५२

[व.ति.] स्तंभासमान हणि बाण रघू हरीला,
तो अद्रिभेदकरही क्षतदेह झाला!
क्षोभोनि तोहि मग दिव्य शरासनास
लावी अमोघ शर त्यास वधावयास. ५३

* तो बाणही असुरशोणितपानदक्ष
भेदी सवेगचि दिलीपतनूजवक्ष,
ठावें नसे कधिं जयास मनुष्यरक्त,
तत्स्वादनीं जणुं ह्मणूनिच होय सक्त. ५४

[स्र.] ज्याच्या बोटांस ऐरावतगजतनूच्या घर्षणें दार्ढ्य आलें
पत्नी पत्रावलीचें बहु रुचिर असे चिन्ह ज्या प्राप्त झालें
ऐशा त्या बाहुदंडीं तंव सुरपतिच्या स्वामितुल्य प्रभावें,
हाणी बाणा सुतीक्ष्णा नरपतिसुत ज्या चिन्हिलें स्वीयनावें. ५५

[शा.वि.] ज्याला मोरपिसें अशा खरतरा बाणा हणोनी बळें,
छेदोनी नृपनंदनें तंव महावज्र ध्वजे पाडिलें,
स्वःश्रीवेणि धरोनियां करिं तिला कोणी बळें छेदितां

१ कार्य. २ पिनाकनामक धनुष्य धारण करणारा (शंकर). ३ इंद्राला. ४ पर्वत फोडणारा. ५ घायाळ.

* अथवा (त्याच अर्थाचा दुसरा श्लोक)—

[उ.जा.] महेंद्रमुक्त प्रखराग्र वेगें येवोनि तो बाण रघूस लागे,
भेदोनि वक्षस्थल आंत गेला, जनें असा त्यावर तर्क केला
कीं, दैत्यरक्तास सदैव प्यावें, न मानवी रक्त अम्हांस ठावें,
आणोनि जाणों शर हें मनांत, त्वरें शिरे तो रघुचे उरांत.
घालोनि तेथें अणिदार पातें सोत्कंठ तो पी रघुशोणितातें
ऐसें कधीं हा नचि रक्त लाहे म्हणोनि तो आंत निमग्न राहे. ५४

६ दैत्यरक्त पिण्याविषयीं दक्ष. ७ स्वामी असें षडाननाचें नांव आहे. हा शिवाचा पुत्र देवांचा सेनापति आहे. त्यांशीं तुल्य म्हणजे समान. (हें 'नरपतिसुत' याचें विशेषण). ८ स्वर्गश्रीची वेणी.

याचा क्रोध, तसाचि या निरखुनी आला तया तत्वतां. ५६

[मं.क्रां.] झालें चालू समर मग तें इंद्रभूपात्मजांचें,[1]
दैवी[2] सेना गगनिंच उभी, मानवी[3] खालिं तीचे,
सर्पाकार प्रखर शर तें युक्त जे कां पिसांनीं
येती भीतिप्रद बहु तईं खालतोनी वरोनी. ५७

[शा.वि.] अस्त्रांची रघुचे वरी करी महावृष्टी सुरांचा धनी,
ज्याचें दुःसह तेज तो रघु तईं हारे न आयोधनीं,[4]
स्वोत्पन्नज्वलना[5] जलें शमविण्या शक्ती न मेघा जशी,
इंद्राची गति जाहली समरिं या भूपात्मजासीं[6] तशी. ५८

[उ.जा.] सुगंधशाली हरिचंदनाचे[7] गुंफोनि केले गजरे फुलांचे,
ते शोभती इंद्रकरांत ताजे, कोदंडहि त्याच करीं विराजे.
[इं.व.] क्षुब्धाब्धिसा नाद गभीर साचा, चाले तयाच्या सुदृढा गुणाचा,
सोडोनि चंद्रार्धसमान बाणा तोडी गुणा त्या रघुवीरराणा. ५९

[द्रु.वि.] गुण असा रघुनें जंव तोडिला, तंव सुरेश्वर फारचि कोपला,
त्यजुनियां धनुला मघवा तदा, रघुस देखुनि चावितसे रदा;
[व.ति.] जें दक्ष[8] शैलगणपक्ष[9] चुरावयास,
तें वज्र योजि हरि[10] वैरि वधावयास,
देखोनियां द्युति विशेष असह्य त्याची
नेत्रें समस्त दिपती तंव पाहत्याची. ६०

[शा.वि.] वज्राघातसमानकाल[11] रघु तो बेशुद्ध खालीं पडे,
दुःखें भूवरि सैनिकाश्रु पडती त्याच्यासवें[12] रोकडे;
राहोनी[13] क्षण, सावधान उठला तो वीरचक्राग्रणी,

---

१ इंद्र व रघु यांचें. २ देवांची सेना. ३ मनुष्याची. ४ आयोधन म्ह० युद्ध. ५ मेघांपासून विद्युद्रूप अग्नि उत्पन्न होतो त्याला मेघ विझवूं शकत नाहीं या गोष्टीकडे येथें लक्ष आहे. तसेंच रघू हा लोकपालांचा अंश होय. तेव्हां अर्थात् लोकपालांमध्यें इंद्र आहेच तेव्हां स्वकीयअंशभूत जो रघु त्याला इंद्र नाशूं शकला नाहीं असा भावार्थ होय. ६ भूपात्मज स्वांश म्हणून इंद्राची शक्ती चालेना असा अर्थ. ७ कल्पवृक्षाचें. ८ समर्थ. ९ पर्वतसमुदायाचे पंख (चूर्ण करायास). १० इंद्र. ११ वज्राघात होतांच. १२ रघूच्या सवें. रघु पडला त्याबरोबर सैनिकाश्रु पडले असा एथें सहोक्त्यलंकार जाणावा. १३ क्षणमात्र मूर्छित पडून.

हर्षा पावुनि सैनिकाननिं उठे 'शाबास' ऐसा ध्वनी. ६१

[भु.प्र.] रघूच्या उरीं बैसलें वज्र मोठें, तरी तो महावीर युद्धीं न हाटे,
पुन्हा निष्ठुरत्वेंचि घ्यायास सूड, करी वैरभावें समीकास हूड.

[व.ति.] पाहोनि अद्भुत पराक्रम हा रघूचा,
पावे मनांत अतितोष पती सुरांचा;
वैऱ्यांतही गुण वसे तरि त्यास मान
देती समस्त, नचि गोष्टहि अप्रमाण. ६२

"शैलींहि कुंठित न जें मम वज्र थोर,
त्या साहि कोण तुजवांचुनि अन्य वीर?
संतुष्ट मी अजि, हयाविण पाहिजे तें
देतों." ह्मणे सुरपती नृपनंदनातें. ६३

काढी स्वतूणितुनि तो शर हेमपुंख,
रंगे तदंगुलि विराजति त्या सुरेख,
तो ऐकतांचि मधुरा सुरनाथवाणी,
अर्धाच ठेवि शर वीरनयाभिमानी. ६४

बोले प्रियंवद रघू सुरनायकातें,
"झालास तुष्ट जरि तूं प्रियबालकातें,
अश्वा न देशि, तरि त्याविरहें हि मेध
केला समाप्त गुरुनें विधिनें अबाध,
तेणें हि यज्ञफललाभ मदीयताता
व्हावा, असें करि, अहो त्रिदशाधिनाथा,
आणीक एक मज इष्ट असे, सुरेशा,
ऐकूनि घेउनि करीं अजि, निर्जरेशा. ६५

[पृ.] सुदुर्धर शिवांश मज्जनक त्या सदोमंदिरीं,

१ युद्धास. २ इंद्रवाक्य. ३ वीरांस विहित जी नीति तिचा अभिमान बाळगणारा म्हणजे इंद्रानें युद्ध सोडून बोलणें आरंभिलें तें पाहून यानेंही बाण मारणें सोडिलें. ४ मधुरभाषी (रघु). ५ यज्ञ. ६ हे इंद्रा. ७ पराक्रमी. ८ शिवाच्या ज्या अष्टमूर्ति सांगीतल्या आहेत त्यांत यजमानही एक मूर्ति आहे म्हणून रघूच्या बापाला शिवांश असें म्हटलें. पृथिव्यादि पंचमहाभूतें सूर्य चंद्र आणि यजमान (यज्ञ करणारा) या शिवाच्या अष्टमूर्ती होत.

कळे सकळ वृत्त हें तवचि सेवकाच्या करीं
असें करिं, सुरेश्वरा, तुरग घेतल्याबांचुनी
मला स्ववदनें त्रपा कळविण्यास वाटे मनीं." ६६

[वं.] "बरें," असें बोलुनि तो दिवस्पती, आला तसा जाय निजालयाप्रती,
सदोगृहालागिं रघूहि पातला, विशेष हर्षोद्गम ज्या न जाहला. ६७

[पृ.] पित्यास रघु भेटला तंव अधीं हरीचे चरें,
तया सकळ वृत्त तें कळविलें असे सत्वरें,
तनूस जखमा महाशनिकृता तया तो हतीं
सहर्ष कुरवाळुनी वदतसे सुता भूपती. ६८

[व.ति.] "बा भोगिले बहु तुवां तुरगार्थ कष्ट,
केलें रणीं सुरपतीसहि फार तुष्ट,
नेलास सिद्धिस समस्त मदीय हेतू,
संकोच कांहिंच मनांत धरूं नको तूं!" ६९

[उ.जा.] सद्यज्ञ नव्याण्णव या रितीनें, केले दिलीपाख्य महीपतीनें,
अंतीं चढाया जणुं देवलोका, शिडीच ही निर्मियली विलोका. ७०

[स्र.] राजा वैराग्यमार्गीं निरत, मग सुव्या राज्यि नीतिज्ञ पुत्रा,
स्थापी शास्त्रोक्तरीत्या, विधुसम धवला देउनी आतपत्रा,
पत्नीला घेउनी तो गहनमुनिवनीं योगसिध्यर्थ जाई,
इक्ष्वाकूच्या कुलाचा नियत गतवयीं हाच आचार पाही. ७१

---

**ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,**
**गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,**
**त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा**
**केलें प्राकृत, त्यामधील तिसरा हा सर्ग आहे पहा. ॥ १ ॥**

**या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा रघुराज्याभिषेक नामक तृतीय सर्ग समाप्त झाला असे.**

---

१ लज्जा. २ इंद्र. ३ यज्ञांत एक स्थळ असतें (सभा). ४ इंद्राचे. ५ त्वरायुक्त. ६ महावज्रानें झालेल्या (जखमा). ७ इंद्रासही. ८ छत्रा.

# सर्ग चवथा.

**श्लोक.**

[शा.वि.] बापानें दिधलें स्वराज्य रघु तो पावोनि पूर्वींहुनी
शोभे फार तईं दिलीपतनय क्षोणीवरी सद्गुणी;
सायंकाळि हुताशन प्रतिदिनीं तेजास सूर्याचिया
पावोनी विलसे; सुयोग्य दिसतो दृष्टांत त्याचा तया. १

वीरश्रेष्ठ दिलीपनंदन रघू मागें पित्याच्या स्वतां
राज्यीं हा बसला, असें परिसतां राजे तईं तत्वतां,
संतापाग्नि दिलीपकालिं धुरपे, तो वाढुनी संप्रती
झालासे भडका हृदीं नचि तईं तो सोसवे त्यांप्रती. २

[व.ति.] इंद्रध्वजोन्नति विलोकुनि फार तोखों,
भूमीवरील जन पावति जेविं देखा,
तैसा नवोदय विलोकुनियां रघूचा
सर्वांस हर्ष तंव होय अपार साचा. ३

[उ.जा.] स्वाधीन दोन्ही गजगामि तो कीं, एकेच काळीं करि, बा, विलोकीं,
स्वपित्र्य सिंहासन त्यांत एक, दुजा प्रभावें रिपुवर्ग देख. ४

[शा.वि.] तेजोमंडल थोर देखुनि तईं वाटे जनां अंतरीं
लीलापद्मचि कीं सदैव विलसे जें इंदिरेचे करीं,
त्याचें छत्र करोनि, तीच जणुं या संतोषितें मानसें,
सेवी ते रघुला अदृश्य परि या चिन्हावरोनी दिसे. ५

[उ.जा.] बंदी जनांच्या वदनांत पाही, बैसोनियां जाण सरस्वती ही
देवांश जाणूनिच कीं रघूसीं, स्तुती यथार्था करुनी उपासी. ६
मन्वादिकांनींहि पुरातनांनीं ही भोगिली मान्य नराधिपांनीं,
तरी पती हा पहिलाच आहे, असी धरा त्या समजोनि राहे. ७

---

१ सूर्य हा प्रतिदिवसीं अस्तमानीं आपलें तेज अग्नीस देतो असें पुराणमत आहे. २ रघूला. ३ राजांप्रत. ४ 'इंद्रध्वज'=इंद्रधनुष्य. प्राचीन काळीं इंद्रधनुष्य दृष्टीस पडलें म्हणजे लोक आनंदोत्सव करीत. कारण, तद्दर्शन हें पर्जन्यवृष्टिद्वारा भावी सुभिक्षतेचें दर्शक होय. ५ तोषाप्रत. ६ गजासारिखें गमन ज्याचें व गजाच्या योगें गमन करणारा असा (रघू). ७ आपल्या बापाचें (सिंहासन). ८ शत्रुसमुदाय. ९ लक्ष्मीचे. १० सेविती झाली.

8426

[भु.प्र.] यथान्याय दंडी रघु स्वप्रजांतें, ह्मणूनी बहू आवडे तो तयांतें;
अतीतीक्ष्णही सौम्यही जो न देखा, सुखा दक्षिणेचाचि दे वायु लोकां. ८

[शा.वि.] झाला सद्गुणयुक्त तो निजपित्यापेक्षां, प्रजा यास्तव
त्याला त्याहुनि मानुनी करिति त्या सोत्साह त्याचा स्तव;
पुष्पाहूनि फलीं रसालतरुच्या सोत्कंठ होती नर,
यासाठीं न दिसे तयास बघतां दृष्टांत भूमीवर. ९

[उ.जा.] भलें बुरें हे जनिं दोन पक्ष, नीतिज्ञ त्या दाखविती समक्ष,
त्यांतोनि आद्या रघु भूप घेई, त्यजी दुजा जाणुनि तो अपायी. १०

[व.ति.] भूतस्थित प्रकट पांच गुणस्वभावें,
त्यांचेंहि वृंद तंव वृद्धिस शीघ्र पावे;
झाला नवा नृप जणूं ह्मणुनीच आतां
आलें नवीनपण सर्वहि वस्तुजाता. ११

[शा.वि.] आल्हादा करितो ह्मणोनि ह्मणती 'चंद्र' प्रजा इंदुला,
तापा दे ह्मणुनीच नांव 'तपन' प्रख्यात उष्णांशुला;
तैसें भूस्थितलोकरंजन करी हा भूपती, यास्तव
'राजा' ही पदवी तयास दिधली, अन्वर्थ जी वास्तव. १२

[उ.जा.] विशाळ त्याचे बहु नेत्र होते, नसेचि तें भूषण त्या रघूतें;
नीत्यादि शास्त्रात्मकलोचनानें, सद्दृष्टिता मेळविली तयानें. १३

[भु.प्र.] पुरें स्वास्थ्य राज्यांत केलें रघूनें, शरत्काळ तें पातला स्वक्रमानें,
जणूं ती शरत् राज्यलक्ष्मीच दूजी, तया पातली पंकेजीं भूषिता जी. १४

[उ.जा.] निरभ्र झालें नभ तें दिशांस, तीव्रप्रतापद्वय झांकि त्यांस,
त्यांतोनि तो एक असे रघूचा, दुजा प्रताप स्फुट त्या रवीचा. १५

[वं.] महेंद्र तें वार्षिक चाप आवरी, रघू तई जैत्र धनुष्य घे करीं,
दोघे असे हे जनसौख्यकारक, क्रमें धरीती स्वकरांत कार्मुक. १६

[शि.] सितांभोजच्छत्र स्फुट विकच जीं काशसुमनें,

. १ फार कडक नव्हे व फार सौम्यही नव्हे असा वायू. ( हा दृष्टांत होय ). २ पंचमहाभूतांचे. ३ प्रजा इंदुला चंद्र म्हणती ( असा अन्वय ). ४ सूर्याला. ५ कमलाच्या योगानें जी भूषित ( शरत् व लक्ष्मी ). ६ त्यांस ( दिशांस ). ७ इंद्र. ८ वर्षाकाळांतील. ९ जिंकणारें. १० पांढऱ्या कमळाला छत्र गणी.

गणी त्यांनीं देखा, विमल चवऱ्या तो ऋतु मनें;
अशा थाटातें तो जरि करि रघूच्या परि तरी
अपूर्वा तच्छोभा अणुहि ऋतुला येइ न खरी. १७

[भु.प्र.] रघूच्या प्रसन्नाननाला सुरेखा, शरत्कालिच्या चंद्रबिंबाहि देखा,
विलोकावया प्रीति दोघांहि साची, तई जाहली तुल्य हो डोळसांची. १८

[शा.] हंसश्रेणी आणि शुभ्रारविंदें, तोयें तैशीं तारकांचीं हि वृंदें,
यांना मोठी स्वच्छता प्राप्त झाली, वाटे त्याच्या ती यशानेंच आली. १९

[शि.] उसांच्या छायेला बसुनि, अठवोनी निरलसा,
कुमारावस्थेपासुनि कृति रघूच्या बहुरसा;
तई शालिक्षेत्रावननिरत नारी निजमुखें,
रघूची सत्कीर्ती गुणजनित गाती अतिसुखें. २०

[उ.जा.] तेजस्वि नक्षत्र अगस्त्य नांवें, नभस्थलीं तें उदयास पावे,
तेणें प्रसन्नत्व जलांस आलें, परी रघूचें उलटेंच झालें.

[इं.व.] होतां रघूचा उदय स्वभावें, क्षोभास तद्वैरिसमाज पावे,
आह्मा पराभूत करील हा कीं, असें तयांचें मन फार शंकी. २१

[स्र.] खांदे जाडे जयांना मद बहु चढुनी थोर औद्धत्य आलें,
मोठीं तीरें नद्यांचीं थडक हणुनि जे पाडण्या योग्य झाले,
ऐसे जे माजलेले वृष तंव रघुच्या देखुनी विक्रमातें,
जाणों लीला तयाची धरुनि मनिं शरत्कालिं त्या दाविती तें. २२

[भु.प्र.] तई सप्तपर्णाख्यवृक्षोद्भवा ही, मदासारिखा गंध पुष्पास येई;
न सोसूनि हत्तीस जाणों रघूचे, मदस्राव सप्तस्थलीं होय त्यांचे. २३

नद्या आटल्या मार्ग वाळोनि गेले, असें तें शरत्कालिं होवोनि आलें,
जणूं या स्थितीनेंचि तो काळ राया, करी प्रेरणा युद्धयात्रा कराया. २४

---

१ विकसित जीं काशपुष्पें त्यांना चवऱ्या गणी. २ हंसांच्या पंक्ती. ३ भाताचीं शेतें राखणाऱ्या ( नारी ). ४ गुणापासून झालेली. ५ अगस्ति नांवाचें नक्षत्र आहे, त्याचा उदय पर्जन्यकाळाच्या अखेरीस होतो. तो झाला म्हणजे उदकें स्वच्छ होतात अशी समजूत आहे. ६ एक जातीचा वृक्ष ( सातवण). ७ रघूचे हत्तीस असा अन्वय. ८ नाकपुड्या दोन, गंड दोन, गुह्य एक, नेत्र दोन, मिळून सात स्थळांपासून (हत्तीचा) मदस्राव होतो असें सांगितलें आहे.

[व.ति.] नीराजनाविधि[1] करी रघु तें हयांचा,
होमें सुतोष बहु होय हुताशनाचा;
ज्वालात्मकें निजकरें जणुं तो[2] तयास,
देई जयास तंव पावक राजयास[3]. २५

[शा.वि.] राज्यांतील समस्त दुर्ग, नगरें, प्रांतादि, हीं निर्भयें,
राहातील, अशी करोनि रघु तें राज्यव्यवस्था स्वयें;
सद्दैवान्वित[4] षड्विधास[5] सह तो घेवोनि सैन्यास रे,
तेव्हां दिग्विजयार्थ वीर निघता झाला, प्रतापी त्वरें. २६

वृद्धा[6] नागरिका स्त्रिया उडविती लाह्या रघूच्या वरी,
शुभ्रा मंगलकारका बहुसुखा पावोनियां अंतरीं;
दुग्धांभोधिंत[7] मंदराद्रि[8] फिरतां लाटा बहू चालती,
त्यांचे पांडुर बिंदु जेंवि हरिच्या[9] अंगावरी ऊडती. २७

[व.ति.] प्राचीनबर्हिसम[10] तो रघुवीर राणा,
आधीं करी, गमन पूर्वदिशेस जाणा;
वातें ध्वजा फडफडा उडती सुवेगें,
जाणों रिपूंस क्षिटकारि तयेंचि योगें. २८

[मा.] रज रथगतिवेगें व्योमि गेलें तयानें,
धरणिपरि[11] नभाला भासवीलें नृपानें,
घनसमगजयोगें तेविं भूमीतलास[12],
गगनसदृश भूपें भासवीलें जनास. २९

[वं.] प्रताप आधीं मग शब्द चालला, पराग त्या मागुनि चालुं लागला;
रथादि त्या मागुनि चाललें असे, सेना चतुर्व्यूह[13] जणूं तईं दिसे. ३०

---

१ नीराजना म्हणून एक शांतिकर्म आहे त्याचा विधि. २ तो पावक (अग्नि). ३ राजाप्रत जयास देई असा अन्वय. ४ सुदैवाच्या. ५ साहा प्रकारच्या (सैन्यास). ६ राजा जात असतां त्यावर नागरिक स्त्रियांनीं लाह्या उधळाव्या असा आचार होता. ७ क्षीरसमुद्रांत. ८ मंदर पर्वत. ९ विष्णूच्या. १० प्राचीनबर्हिनामक राजाप्रमाणें. प्राचीनबर्हीनें सर्व पृथ्वी जिंकिली होती. ११ धुळीनें गगन धरणीप्रमाणें भासविलें. १२ भूमीला गजांच्या योगानें गगन भासविलें. १३ चतुर्व्यूह म्हणजे चार व्यूहच जीचे जणूं झाले अशी सेना.

[शा.वि.] *केले निर्जलदेश सोदक तयें, नौतार्यें ऐशा महा
होत्या ज्या सरिता, तयांस सुतरा केल्या रघूनें पहा;
मैदानें रचिलीं बहू गहन जीं होतीं अरण्यें तशीं,
कृत्यें शक्तिवशें अचाट विभुनें केलीं तयानें अशीं. ३१
गंगा शंभुशिरीं स्थिता तिस बळें पूर्वोव्धिला घेउनी
गेला भूप भगीरथ, श्रुत असे ही गोष्ट साऱ्या जनीं;
तैसा संप्रति हा रघू निजरणीं इंद्रेंहि वाखाणिला,
शोभे घेउनियां सवें बहुचमू पूर्वेस जैं चालिला. ३२
केला तैं फललाभ दुर्लभ, कितीएकांस उत्पाटिलें,
केले भग्न कितीक शत्रुनृपती, ते नाहिंसे जाहले;
जातांना पथिं यापरी नृपतिनें केली रिपूंची स्थिती,
वृक्षांची करितो मदोत्कट करी मार्गांमधें ज्या रिती. ३३
[व.ति.] पूर्वेकडील विषयांस अशा रितीनें
जिंकोनि तो रघु पुढें विजयी त्वरेनें,
तीरा महोदधिचिया मग पावला कीं,
तालीवशें बहुत कृष्णचि जें विलोकी. ३४
[शा.वि.] जे कां ताठ तयां बळें उपटिलें तैं सिंधुवेगापरी,
पाहोनी कितिएक भूपति थैया घेती भया अंतरीं;

---

* अथवा ( याच अर्थाचा दुसरा श्लोक )—
[शा.वि.] नौकातार्यं महानद्या सुखतरा केल्या, तशीं निर्भयें
मैदानें रचिलीं वनें भयकरें तोडूनि तेणें स्वयें,
केले निर्जल देश ते जलभरें पूर्ण प्रभूनें महा,
ऐसी थोर विचित्र शक्ति रघुची होती, प्रभूता अहा ! ३१

१ नौकेनें तरण्याजोगें. २ सगर राजाचे साठ हजार पुत्र कपिलकोपानें दग्ध झाले, त्यांचा उद्धार महापवित्र जी गंगा तिच्या उदकस्पर्शावांचून व्हावयाचा नाहीं, ही गोष्ट त्यांचा वंशज भगीरथ यास कळून त्यानें मोठा प्रयत्न करून शिव प्रसन्न करून त्याचे मस्तकीं गंगा होती तिला भूलोकीं आणून हिमालयप्रदेशापासून पूर्वेकडे येऊन सगरपुत्रांनीं खणिलेल्या खांचेच्या वाटेनें पाताळीं कपिलाश्रमास गंगेला नेऊन पूर्वजांचा उद्धार केला असें पुराणांत वर्णिलें आहे. ३ देशांस. ४ तालवृक्षांच्या योगानें. ५ नदीच्या वेगाप्रमाणें. ६ ह्या ( रघूला ).

नम्रत्वें अवलंबुनी नृपतिनीं वृत्ती तिहीं वेतसी,[1]
केलें रक्षण आपुलें, रघुहि तें संतोपला मानसीं. ३५

[व.ति.] ज्याचें असे समरसाधन आरमार,[2]
तो जिंकि वंगपति[3] देउनि खूप मार;
भागीरथींतिलँ[4] तईं रणरंगधीर
बेटांमधें पुँरि[5] रघू रणखांब वीर. ३६

[शा.वि.] आधीं ज्यां उपडोनि शेतकरि तो स्थापी पुन्हा सुस्थिर,
धान्यें येउनि शालि त्या लवति तत्पादावरी सादर,
वंगक्षोणिपतीस वीरमणि त्या शालीपरी दे स्थिती,
आणोनी धनभार ते सुविनयें त्याच्या पदीं अर्पिती. ३७

[पृ.] मदोत्कटकरी परी करुनि सेतु यत्नें महा,
तरोनि कपिशा[6]नदी नृपति पार गेला पहा;
जया सुचवि उत्कलेश्वर[7] तयें पथें सत्वरी,
चढाव चतुरंगिणीसह करी कलिंगा[8]वरी. ३८

[व.ति.] गंभीरवेदि[9] करिच्या शिरिं अंकुशातें,
हाणी जसा सबल माहुत तो स्वहातें;
तैसा महेंद्र[10]गिरिच्या वरी तो प्रताप,
दावी, रघू निजकरीं चढवोनि चाप. ३९

[मा.] तंव बहु गजसेना मेळवोनी कलिंगें,
रघुवरि करि[11] वृष्टी आयुधांची निजांगें;

---

१ वेतांप्रमाणें (पाण्याचा लोट आला म्हणजे लवणें अशी वृत्ती). २ लढाऊ गलबतें. ३ वंग म्ह० बंगाल देश त्याचा पति म्ह० राजा. ४ याचा संबंध बेटामधें याशीं. ५ पुरिता झाला. ६ या नांवाची नदी. ७ उत्कल म्ह० ओरिसाप्रांत, तेथील राजे यांनीं रघूला अनुकूल होऊन कलिंगदेशचे राजावर स्वारी करितांना ते त्याबरोबर गेले. हल्लींचा नार्दर्नसरकार म्हणून जो प्रांत तोच पूर्वीचा कलिंगदेश होय असें म्हणतात. (यासच कोणी ओढिया म्हणतात). ८ कलिंगदेशाचा राजा. ९ गंभीरवेदी म्हणून एक गजविशेष असतो. १० महेंद्र म्हणून एक पर्वत आहे. प्रस्तुतचा ओरिसाप्रांत आणि नार्दर्नसरकार नांवाचा प्रांत, यांपासून तों गोंडवण प्रांतापर्यंत जी डोंगराची सांखळी आहे, तीच हा पर्वत होय असें म्हणतात. ११ करिता झाला (या क्रियेस तो या कर्त्याचा अध्याहार करावा).

सुर[1]पति निजपक्ष छेदण्या ये तयातें,
गिरि हणि दगडांनीं, हाच दृष्टांत त्यातें. ४०

[व.ति.] सोसोनि वृष्टि निजवैरि कृता शरांची,
तेव्हां महेंद्र शिखरीं घनदाट साची,
होवोनि मंगलजलें अभिषिक्त हातें;
जाणों वरी त्वरित तो विजयश्रियेतें. ४१

वि[2]ख्यात शूर सरदार मधू[3]पभोगा-
साठींच सिद्ध करुनी रमणीय जागा,
तांबूलवल्लि[4]दलिं घेउनि मद्य पीती
ते शत्रु[5]कीर्तिसह, ज्यांस नसेच भीती. ४२

[उ.जा.] कलिंगनाथास करोनि बंदी स्थापी पुन्हा त्या स्वपदीं सुबुद्धी;
धर्मज्ञ तो भूप हरी[6] श्रियेला, परी[7] न त्याच्या हरि मेदिनीला. ४३

[व ति.] तेथोनि भूमिपति अब्धि तटातटानें,
तो दक्षिणेस रघु जाय तईं सुखानें
मार्गांत ज्या निबिड पोफळि[8] वृक्ष होते,
झाले सुनम्र फळभार वशें अहो ते. ४४

सेनेमधें नृपतिच्या मदमत्त हस्ती
जे चालतां करिति माजुनी फार मस्ती,
त्यांच्या शिरीं सुरभिदानजलौघ चाले
तेणेंकरोनि नृपसैन्य सुगंधि झालें;

कावेरि[9]मांजि शिरलें जंव तेंच सारें
त्याचा सुगंध तिजलागिंहि लागला रे,
"स्वस्त्रीस अन्य तनुगंध कुठोनि आला !"
शंका अशी उपजवी रघु सागरा[10]ला. ४५

१ इंद्र. २ "विख्यात सैनिक सहर्ष मधूपभोगासाठींच सिद्ध करुनी तव भूमिभागा" असें पाठांतर. ३ मद्यपानासाठीं. ४ विड्याच्या पानांत. ५ शत्रुकीर्तिसह मद्य पीती असा एथें सहोक्ति अलंकार आहे. ६ हरिता झाला. ७ "दयाळु त्याच्या न हरी धरेला" असें पाठांतर. ८ सुपाऱ्यांचीं झाडें. ९ कावेरी नांवाच्या नदींत. १० समुद्रास.

[मा.] मग मलैयगिरीच्या सन्निधानीं जिगीषु,
रघु नृपति बलौघा घेउनी ये खरेषु,
गहनवन मिऱ्यांचें जेथ हारीत पक्षी
निरखुनि नृपसेनें ऊडती अंतरिक्षीं. ४६

दडदड बलशाली धांवती शीघ्र घोडे,
चुरडुनि पदिं झाले पीठ तैं वेलदोडे;
तिथुनि रज तयांचें वायुच्या थोर योगें,
उडुनि करिवरांच्या मस्तकांलागि लागे;

सहज गजमदा ये एलच्यांचा सुवास,
अणिक रज तयांचें साह्य झालें तयास
मग बहुतचि देखा त्या स्थळीं आसपास,
सतत अनिलयोगें चालिला तोचि वास! ४७

[शा.वि.] ककोंचे अहिवेष्टनेंचि पडले जे चंदनां, त्यांस रे,
बांधीले गज तेथ आवळुनियां कंठांतले कासरे,
तोडीती पदबंधनास असले होते बली ते करी,
ककोंचांतिल दोर तैं न सरती, ते ताणिती त्यां जरी! ४८

[उ.जा.] जातो जरी दक्षिणदिग्विभागीं, ये मंदता चंडगभस्तिलागीं
जातां रघू तेथहि तत्प्रताप, असह्य दे पांड्यें नृपास ताप. ४९

[भु.प्र.] मिळे तांम्रपर्णी समुद्रास जेथें, अती उत्तमें मौक्तिकें होतिं तेथें;
तयांतोनि उत्कृष्ट जीं पाणिदार, तया अर्पिती नम्र होवोनि फार,
न होतींच तीं मौक्तिकें शुभ्रसाचीं, स्वकीर्तीच ती पांड्यभूपालकाची,
अशा घेउनी तो कराला महीप पुढें चालता होय तेथूनि भूप. ५०

[द्रु.वि.] विमल चंदन ज्यावरि साजिरें, मलय दर्दुर नामक शैल रे,

१ मलय ह्मणून भरतखंडांत कर्नाटकाच्या दक्षिणभागीं एक पर्वत आहे तेथें उत्तम चंदनाचीं झाडें आहेत. २ जिंकण्यास इच्छिणारा. ३ तीक्ष्ण आहेत बाण ज्याचे असा (रघु). ४ सूर्य. ५ पांड्य म्हणून एक देश आहे. तो हल्लींचे दिंडिगल आणि तिनवली हे प्रांत (जिल्हे) मिळून असावा असें म्हणतात. हे दोन्ही प्रांत त्रावणकोरच्या राज्याच्या पूर्वेस आहेत. ६ ताम्रपर्णी या नांवाची नदी भरतखंडाचे दक्षिणेस आहे. ती फार लहान आहे तरी मोत्यांच्या उत्पत्तीमुळें ही विशेष प्रख्यात आहे. ७ या नांवाचे पर्वत.

युवति दिक् विलसे जणुं दक्षिणा, कुच तिचेचि[1] जयां प्रति हो गणां,

[उ.जा.] कामी निजस्त्रीकुचकुड्मलाचा जसा करी तो उपभोग साचा
यथेच्छ तैसा उपभोग त्यांचा, करोनियां[2] तो अधिप प्रजांचा

[उ.जा.] सह्याख्य जो पर्वत थोर आहे, नितंब जाणों क्षितिचाच पाहे,
समुद्ररूपी बहु भव्य वस्त्र, राहे दुरी सोडुनि ज्या विचित्र;
स्त्रीच्या नितंबाप्रति वस्त्रहीना पती जसा आक्रमितो सुजाणा,
तसा तया आक्रमुनी विशाळ, सेनेसवें जाय तईं नृपाळ.[3] ९१।९२

[स्र.] त्याची विस्तीर्ण सेना बहुत पसरली पश्चिमेलागिं जेव्हां,
आशंका थोर जाली सकलहि जगतीवासि लोकांसि तेव्हां;
कीं पूर्वी जामदग्न्यें जलधि हटविला कोंकणांतील दूर,
तो आतां सह्यशैलावधि वरि जणुं ये, येवुनी त्यास पूर.[4] ९३

[शा.वि.] ऐसा दिग्विजयी बलाढ्य नृपती सेनेस घेऊन ये,
तेव्हां केरलदेशवासि[5] युवती भूषा त्यजीती भयें;
सेना धांवति तैं बहू उडतसे धूळी तयांच्या शिरीं,
जाणों भूपति हा गुलालचि तईं भांगीं तयांच्या भरी. ९४
वारा जो मुरलानदीवरुनियां वाहे, तईं सत्वरीं,
रम्या केतकिच्या फुलांतिल रजा तो ऊडवी अंबरीं;
वीरांच्या कवच्यावरी रघुचिया येवोनि तें खालतीं,

---

१ दक्षिण दिशारूप जी स्त्री तीचे (हे मलय दर्दुर पर्वत कुचच होत). २ करोनियां जाय असा अन्वय. ३ हे दोन श्लोक मिळून युग्म आहे. त्यांतून प्रथम श्लोकांत मलयदर्दुरपर्वतरूप स्तन जीचे अशी दक्षिण दिशारूप स्त्री व दुसऱ्या श्लोकांत सह्याद्रिरूप नितंब जीचा व त्या नितंबावरून समुद्ररूप वस्त्र दूर राहिलें अशी पृथ्वीरूप स्त्री अशा रूपकांनीं संभोगशृंगार ध्वनित झाला आहे. ४ परशुरामानें क्षत्रिय राजांस मारून सकल पृथ्वी जिंकून ती ब्राह्मणाला दान दिली. आणि आपणास राहायास जागा पाहिजे म्हणून समुद्रापासून ती घेतली. तेव्हां पूर्वी सह्याद्रिपर्यंत जें समुद्राचें पाणी होतें तें मागें जाऊन जी जमीन उघडी पडली, तोच कोंकण देश होय; असें पुराणाच्या आधारावरून म्हणतात. ती उघडी पडलेली जमीन प्रस्तुत रघूच्या सैन्यानें भरून गेली म्हणून तें सैन्य दुसरा समुद्रच दिसलें असा श्लोकतात्पर्यार्थ होय. ५ केरल हा देश हल्लीचे कानडा कोचिन आणि त्रावणकोर हे प्रांत मिळून होता असें म्हणतात. (कोणी मलबार म्ह० गोवें, कालिकोट इत्यादि यांस म्हणतात ).

बैसे दाट, तया 'बुकाच जणुं हा' ऐसें जनीं मानिती. ५५
जेव्हां धांवति कान उंच करुनी घोडे रघूचे त्वरें,
गात्राघात तईं बसोनि कवचा होती ध्वनी साजिरे;
तेथें सुंदर राजतालि असती, वारे तयांना भले
लागोनी ध्वनि होय, त्यास कवचध्वानीं तिहीं जिंकिलें. ५६
[शा.] खर्जूरीला[1] बांधले हत्ति पाही, कुंभा ज्यांच्या दानसौगंध्य[2] येई,
पुन्नागाला[3] सोडुनी षट्पदाली[4] त्यांच्या कुंभीं गंधलोभेंच आली. ५७
[व.ति.] 'जो जामदग्न्यमुनिच्या[5] बहु याचनेनें
दे त्याजला स्थल,' असें वदती पुराणें,
तो पश्चिमेकडिल राजमिषें नृपास
दे आणुनी कर समुद्र नमूनि त्यास. ५८
[उ.जा.] मत्तेभदंतव्रण[6] तेचि ज्याचे सुव्यक्त वर्ण स्फुट विक्रमाचे[7],
त्रिकूट[8] ऐसा रघुराज यानें केला जयस्तंभ[9] तिथें तयानें. ५९
[शा.] जिंकायाला पर्शियानाम देश, जाता झाला पायमार्गे[10] नरेश;
जिंकूं इच्छी इंद्रियग्राम[11] वैरी, तत्त्वज्ञानें जेविं योगी विचारी. ६०
[शा.वि.] * तेथीच्या यवनी जनास नखरा अत्यंत त्या दाविती,

---

१ वृक्षविशेष. २ मदसुगंध. ३ पुन्नाग म्हणून एक सुगंधि फुलांचें झाड आहे. ४ भ्रमरपंक्ति. ५ जामदग्न्य मुनि म्ह० परशुराम. याच्या याचनेवरून समुद्रानें त्याला स्थळ दिलें. रघूला तर पाश्चात्य राजमिषानें फार नमून करभार आणून दिला म्हणून परशुरामापेक्षां रघूचा उत्कर्ष ध्वनित झाला. ६ माजलेल्या हत्तीच्या दांताचे व्रण. ७ पराक्रमाचे. ८ हा लंकेजवळील प्रसिद्ध त्रिकूट पर्वत नव्हे. तर दुसराच तीन श्रृंगांचा पर्वत होय. यावर सैन्यांतील हत्तींनीं दंतप्रहार केल्यामुळें खाचा पडल्या म्हणून तो रघूच्या जयाचा सूचक अशा जयस्तंभाप्रमाणेंच झाला. जयस्तंभावर जयसूचक शब्द खोदलेले असतात. ९ जयस्तंभावर पराक्रमलेखाचे पट असतात, ते येथें गजदंतकृत व्रण होत. १० पारसिक देशास जावयास पाण्यांतून जवळचा मार्ग असतां, रघु स्थलमार्गानेंच गेला. याचें तात्पर्य जलयान निषिद्ध हें होय, असें मल्लिनाथानें टीकेंत सुचविलें आहे. सिंधुनदीच्या अतिनिकट जो पर्शियाचा भाग त्याला प्राचीनकाळीं 'पारसिक' असें म्हणत होते असें म्हणतात. तद्वासी लोकांसही पारसीक असें म्हटलें आहे. ११ इंद्रियसमुदायरूप शत्रू. * 'लीलेतें यवनस्त्रिया मदभरें अत्यंत त्या दाविती' असें पाठांतर.

मद्योन्मत्तपणेंचि रक्तवदनें त्यांचीं सदा दीसती;
पद्मोल्लासकर प्रकाश रविचा सोसे न तो तोयदा,[1]
तेवीं तन्मुखरक्तिमा रघुनृपा तो सोसवेना तदा. ६१

पाश्चात्यक्षितिपाल[2] तैं यवन ते सेना हयांची त्वरें
घेवोनी समरांगणांत भिडले मोठ्या बलाच्या भरें;
झालें फारचि घोर युद्ध; धुरळा तेथें असा दाटला
कीं तो सन्मुख शस्त्रशब्द सुचवी, जे 'हा रिपू आपला.' ६२

श्मश्रू भेसुर[3] ज्या शिरांस[4] असती, त्यांना शरांच्या गणीं
वेगें छेदुनि तद्वशें सकल तैं आच्छादिली मेदिनी;
मोठाल्या मधुमक्षिका अविरला ज्यांच्यावरी बैसती,
तीं पोळीं पसरोनि जेंवि दिसते, तेंवी दिसे ती क्षिती. ६३

जे बाकी उरले, तिहीं अपुलिया टोप्यांस काढोनियां,
ठेवीलें चरणीं शिरांस रघुच्या, घेवोनि चित्तीं भया;
जे कां थोर उदारचित्त पुरुष क्षोणीवरी राहती,
तत्कोपोपशमार्थ एकचि पुरे लीना मनानें नती. ६४

द्राक्षींचे सुविशाल मंडप उभे होते बहू चांगले,
तेथें उत्तमचर्मनिर्मित अशा तैं आस्तरां घातलें;
मोठाले रणशूर योध रघुचे बैसोनियां त्यांवरी,
त्यांनीं युद्धसमुद्भव श्रम मधु प्राशोनि केले दुरी. ६५

[व.ति.] आदित्य आत्मकिरणीं पृथिवीरसाला[5]
हारावयास गमना करि उत्तरेला
तेवीं स्वबाणनिकरीं नृप उत्तरास्थ
जिंकावया रघु धरी तिकडील पंथ. ६६

[शा.वि.] मार्गीं चालुनि फारकाळ रघुचे घोडे बहू भागले,
एथें सिंधुनदीतटाजवळच्या वाळूवरी लोळले;
झाले तैं विगतश्रम, प्रकट ते ज्यां लाविलें केशर,
त्यायोगें बहु रंगदार दिसती त्यांचे तदा केसर.[6] ६७

---

१ मेघास. २ पश्चिमेकडील राजे. ३ भयंकर. ४ मुखांस. (एथें मुखशब्द छेदनास शोभत नाहीं म्हणून शिरशब्द योजिला). ५ भूमीच्या रसाला. ६ मानेवरील केंस.

[इं.व.] हूणस्त्रियांच्या पतिशीं तयानें, जो आचरीला क्रम राजयानें,
त्याच स्त्रियांच्या बहु ये कपोला फिक्केपणा, तोचि वदे तयोला. ६८

[शा.वि.] राजे काबुलचे न सोसुं शकती वीर्यास त्याच्या रणीं,
आले ते शरण क्षितीशरघुला, भीती धरोनी मनीं;
अक्षोटाख्य तरूंस बद्ध गज जे त्यांनीं तरूंला तयां
केलें नम्र, तसेंच नम्रपण ये काबूलच्या राजयां. ६९

त्यांची श्री बहुधा हयात्मक असे, तेव्हां असंख्यात ती
घेवोनी विनयें स्वतांच नृपती त्यालागिं ते अर्पिती;
ऐसे तें करभार थोर रघुला काबूलचे पातले,
तत्रापि क्षितिपालका न अणुही औद्धत्य आलें भलें. ७०

अश्वांचें बल घेउनी प्रबळ तो काबूलजेता पुढें,
गौरीचा गुरु जो हिमालयगिरी त्याचीं चढे टेंकडें;
तेव्हां धातुरजें नभीं उधळलीं, त्यांचीच जाणों नवी
घालोनी भरती हिमाद्रिशिखरें तो आणखी वाढवी. ७१

[पृ.] तईं पसरले हिमालयगुहोदरीं केसरी
चमूध्वनिस ऐकती, तरि न ते भिती अंतरीं;
समानबळ ही असी हरिमनोगता भावना,
सुखें वळुनि पाहणें, सुचवि तें तयांचें जनां. ७२

[शा.वि.] जींहीं मर्मरशब्द भूर्जतरूंच्या पानांत होती बरे,

---

१ हिंदुस्थानाच्या उत्तरेस पंजाबाजवळ ख्रिस्तीशकाच्या पूर्वी 'सिथिअन' नांवाचे गौरवर्ण लोक राहत असत, त्यांस 'हूण' असी संज्ञा आहे. २ त्यांच्या कपोलाला फिक्केपणा येण्याचें कारण अर्थात् त्यांच्या पतीचा नाश होय. ३ अक्षोट नामक वृक्ष. प्राकृतांत त्यास 'अक्रोड' म्हणतात. ४ रघूला औद्धत्य म्हणजे गर्व आला नाहीं. गर्व होण्याचें कारण असतांही त्यास गर्व झाला नाहीं असा भाव. ५ शिवाची स्त्री तिचा गुरु म्ह० बाप. दक्षप्रजापतीनें यज्ञ केला तेव्हां त्याची कन्या सती हिचा अपमान झाल्यावरून तिनें यज्ञकुंडांत उडी घालून पुढें हिमालयाचे पोटीं आली अशी पुराणांत कथा आहे. ६ सिंह. ७ आपल्या बरोबरीचें जिचें बळ अशी. ८ चमू. ९ सिंहाच्या मनांतील. १० अभिप्राय. ११ समबलाला समबलापासून भय वाटत नाहीं असा मल्लिनाथानें याचा भावार्थ काढिला आहे.

तैसे कीचक[1] रम्य शब्द करिती ज्यांच्या वशें साजिरे;
गंगोत्तुंगतरंगसंग घडुनी जे शीतता पावले,
ते आतां अनिल क्षितीशरघुला सेवावया लागले. ७३

[पृ.] नमेरुतरु वाढले, निबिड त्यांचि हो सावली,
सुगंधित शिलातलें हरिणनाभिनीं[3] जाहलीं;
तये स्थलिं बसोनियां रघुनृपाचिया सैनिकीं,
विराम घडि घेउनी, त्वरित ते जहाले सुखी. ७४

[वं.] स्वतां सदा रात्रिस ज्या प्रकाशती, अशा वनीं त्या असती वनस्पती,
तेजें तयांचीं गजकंठशृंखलीं, बिंबोनियां फार विचित्र शोभलीं;
तेलाविणें दीपक तेचि सुंदर, तें शोभती ते रघुच्या तळावर,
पाहोनियां अद्भुत गोष्ट ही जना, उठे मनामाजि अशीच कल्पना.७५

[शा.वि.] सेनेचा तळ जैं उठे, तंव तिथें जे भिल्ल आले तिहीं
तें वन्यस्थळ मंडळीसह सुखें तैं धुंडिलें सर्वही;
गेलीसे गैलबंधनें[4] निघुनियां जी देवदारुत्वचा,
ती त्यांना अजमास नक्कि कळवी तैं हत्तिच्या उंचिचा.७६
तेथें जे गण पार्वतीयँ[5] वसती, त्यांच्या सवें संगर
झाला वीरैशिरोललामरघुचा[6] अत्यंत घोरंदर;
जेव्हां बाण व गोफणींतिल शिळा, संघर्ष यांचा घडे,
तेव्हां त्यांतुनि तत्क्षणीं बहु रणीं तेजाळ अग्नी पडे. ७७

[चं.] उत्सँवसंकेताभिध[7] खूप, वीर्यवशें जिंकी गण भूप,
कीर्तिस गाया किन्नर त्यानें, लावियले तेव्हां नृपतीनें. ७८

[इं.व.] भेटी गणीं आणविल्या अमूप, तैं एकमेका कळलें स्वरूप,
हिमाद्रिचें सार कळे रघूला, तैसें रघूचेंहि कळे गिरीला. ७९

[व.ति.] कोणा ढळे न असला नग कीर्तिरूप
स्थापी हिमालयगिरीवरि तो महीप,

---

१ एके जातीचे पोकळ वेळू ज्यांत वारा शिरून शब्द होतो. २ एक वृक्षविशेष. ३ कस्तूरींनीं. ४ गलबंधनाच्या योगानें. ५ पर्वतवासी. (गण म्ह० समुदाय किरात वगैरेचे). ६ वीराच्या मस्तकांस भूषणभूत जो रघु. ७ उत्सवसंकेत या नांवाचे लोकांचे गण.

एणें जणूं बहुत लाजवि तो मनास
कैलासनामगिरिच्या, गमलें जनास;
कां कीं तैयास दशकंधर उंच फेंकी,
चेंडूपरी सहज, जाणतसे त्रिलोकी;
तैत्रत्य यारिति जिणोनि द्विपद्गणाला,
तो तैं हिमाद्रिवरुनी नृप खालिं आला. ८०

तो लोहिताख्यतटिनी उतरोनि आला,
प्रा॑ग्ज्योतिपाधिपति तें मनिं फार भ्याला,
कांपे जसे अगुरुचे तरु कांपती रे,
ज्यां बांधिले निजगजां रघुनें नृवीरें. ८१

[शा.वि.] जेव्हां सत्वर धांवती रथ, तईं जीं का उडालीं रजें,
झांके सूर्यहि, दुर्दिन स्फुट दिसे मेघांविना घोर जें;
तेंही ज्यास न सोसवे क्षणभरी प्राग्ज्योतिपाधीश्वरा,
तो सोशील कसा सुवेग चमुचा हा अर्थ आहे खरा. ८२

[व.ति.] ज्यांच्या बलें इतर शत्रुस जिंकि युद्धीं,
त्या मैत्तदंतिनिवहासह नम्रबुद्धी
तो कामरूपपति इंद्रविशेपवीर्या
तत्काळ त्या शरण ये रघुभूपवर्या. ८३

[वं.] सुवर्णपीठीं अधिदेवता वसे, तसी रघूची पदकांति जी दिसे,
सद्रत्नपुष्पव्रज घेउनी भला तो कामरूपाधिप पूजि तें तिला. ८४

---

१ कैलास पर्वताच्या मनास लाजवी असा अन्वय. कैलास पर्वताला रावणानें उचलून झुगारिलें आणि कीर्तिरूप पर्वत अचळ पाहून त्याला (कैलासाला) लाज झाली. कैलास शुभ्र तसी कीर्तिही शुभ्र होती. कीर्ति शुभ्रवर्ण होय असा कविसंकेत आहे. २ कैलासास. ३ रावण. ४ तेथील (हिमालयांतील). ५ शत्रुगणाला. ६ हल्लींचे भुतान आणि आसाम यांच्या पूर्वभागास 'प्राग्ज्योतिप' ही संज्ञा होती व याच नांवाचें तेथें एक नगरही होतें. पांडवांच्या वेळेस या नगराचा राजा भगदत्त म्हणून होता. त्यानें कौरवपक्षास मिळून भारतीय युद्धांत मोठा पराक्रम दाखविला आहे. ७ आसामाच्या पश्चिमभागाचें नांव कामरूप आहे. एथील हत्ती फार उत्तम जातीचे असतात असें म्हणतात. ८ कामरूप देशचा राजा. ९ इंद्राहून विशेप वीर्य ज्याचें अशा ( रघु राजाला ). १० उत्तम रत्नें हींच फुलें त्यांच्या समुदायांनीं (पुजी).

दिशा अशा सर्व जिणोनि तो स्वतां फिरे, रघू यद्रथधूळि तत्वतां
बसे उडोनी नृपमौलिंशेखरीं, कां कीं नसे छत्र तईं तयांवरी. ८५

[व.ति.] सर्वस्वदक्षिण अशा मग दानशूर
तो विश्वजित् ह्मणुनि यज्ञ करी नृवीर
दानार्थ संग्रह असे जनिं सज्जनाचा,
दृष्टांत यास बहु शोभतसे घनाचा. ८६

[प.] युद्धीं जे नृप रघुनें पराभवीले, ते सारे तंव सवदर्शनास आले;
यज्ञांतीं रघुनृपती सखा निजांचा सत्कार प्रकट महा करी तयांचा;
त्यायोगें अधि अपुल्या पराभवानें झालेला त्यजिति विपाद ते मनानें,
आज्ञा दे मग नगराप्रती तयांतें जाया तो विरहिवधूंस भेटण्यातें.८७

[स्र.] शंखच्छत्रध्वजाद्याकृतियुत असती चिन्हभूता सुरेखा
पादद्वंद्वीं रघूच्या, सुचविति जनिं ज्या सार्वभौमत्व, रेखा,
त्या पादीं आदरानें नृपतिंनिं अपुल्या ठेविलें मस्तकातें,
जें कां लोकां प्रसादाविण कधिहि न वा मानवा प्राप्त होतें;
माला फुल्ला फुलांच्या शिरिं विलसति ज्या भूमिपाळव्रजांच्या,
पुष्पांपासोनि धारा पडति रसयुता पादयुग्मीं रजांच्या,
त्यायोगें अंगुलीला बहुतचि रघुच्या गौरवर्णत्व आलें,
आज्ञा घेवोनि तेव्हां नरपति अवघे स्वस्वगेहास गेले. ८८

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, त्यामधील चवथा हा सर्ग आहे पहा. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा रघुदिग्विजयनामक चतुर्थ सर्ग समाप्त झाला असे.

---

१ राजांच्या मुकुटाग्रांवर. २ मुकुटांवर. ३ सर्वस्व आहे दक्षिणा ज्यांत असा (यज्ञ). ४ या नांवाचा यज्ञ आहे. त्यांत सर्वस्वाचें दान करावें लागतें. ५ यज्ञदर्शनास. ६ विरहयुक्त ज्या स्त्रिया त्यांस. ७ पादद्वंद्व.

# सर्ग पांचवा.

## श्लोक.

[शा.वि.] मोठा विश्वजिदाख्य याग रघुनें केला महाभक्तिनें,
सर्वस्व क्रतुसांगतार्थ दिधलें तें ब्राह्मणाकारणें;
कौत्साख्य द्विजमुख्य, योग्य हृदयीं ज्याच्या वसे वासना,
तो आला, वरतंतुशिष्य गुरुची मागावया दक्षिणा. १

[स्र.] भांडें सोन्यारुप्याचें जवळ नचि असे एकही भूपतीच्या,
यासाठीं घालुनीयां विमल जल फुलें भाजनीं मृत्तिकेच्या,
ऐशा अर्घ्या करोनी अतिथिस पुजणें, हेंचि ज्या थोर वाटे,
सामोरें आदरें तो नृपति झटकरी येउनी त्यास भेटे. २

[इं.व.] देवूनियां आसन भूपतीनें, त्या पूजिलें सत्वर सन्मतीनें,
जोडोनि त्यानंतर तो स्वपाणी, बोले तयालागिं मनोज्ञ वाणी. ३

[स्र.] "मंत्रद्रष्टयां मुनींच्या गणिं बुध गणिती ज्यास मुख्य प्रभावें,
तूझा तो श्रेष्ठ, कौत्सा, गुरु कुशल असे कीं, मला तें वदावें;
सूर्यापासोनि लोकांप्रति जगति जसें प्राप्त चैतन्य होतें,
तैसें ज्यापासुनीयां तुज विशद असें ज्ञान झालें, अहो, तें. ४

कायावाचामनांनीं श्रमनिरत सदा होउनी त्वद्गुरूनें,
हारी जें इंद्रधैर्या, त्रिविधें तप असें सांचवीलें सुधीनें,
नाना विघ्नोपसर्ग प्रकट जगति जे होति, तीहीं तयांचा
नाहीं ना नाश होत? स्फुट मजजवळी सांग वृत्तांत त्यांचा. ५

आळीं बांधोनि यत्नें, निजसुतसम जो वाढवीला श्रमानें,
ज्याची छाया प्रभूता बहुतसुख करी, दूरि लोकश्रमानें,
ऐसा तो आश्रमींचा तरुगण तुमच्या वातवन्ह्यादिकांनीं,
नाहीं ना नष्ट झाला? तरुंकुशल मला ऐकुंदे आजि कानीं. ६

---

१ विश्वजित् या नांवाचा यज्ञ आहे; त्यांत यजमानाला सर्वस्वाचें दान करावें लागतें. २ वरतंतु नांवाचा एक ऋषि होता त्याचा शिष्य म्हणजे विद्यार्थी असा (कौत्स). ३ हें संबोधन. ४ तीन प्रकारचें ( तप ). ५ तपाचा. ६ लोकांच्या श्रमातें ( दूर नेतो ) असा अन्वय. ७ वृक्षांचें कुशल.

[शा.वि.] कर्माला उपयुक्त फार असती, ते दर्भ जीं भक्षिती,
तत्रापि द्विज ज्यांस रे न कधिंही प्रेमामुळें हांकिती,
ज्यांचीं लोळति नाभिजें मुनिचिया नाळेंहि अंकांवरी,
ऐशीं बा चिमणी पिलीं हरिणिचीं आहेत, कीं तीं बरीं ? ७

[शा.] ज्यांच्या योगें प्रत्यहीं स्नान होतें, साधे जेणें तर्पणादी, अहो, तें,
ज्यांच्या कांठीं धान्य पष्ठांश राहे, तो कीं तीर्थव्रात निर्बाध आहे? ८

[शा.वि.] नीवारादिक धान्य भक्ष्य तुमचें राहे सदा आश्रमीं,
ज्याचा भाग मिळोनि तृप्त बरवे होताति मार्गश्रमी,
गांवांतील गुरें न, कौत्स, पडती येवोनि कीं त्यावरी,
कोंडा खाउनि धान्य भक्षणरुची होते जयां अंतरीं ? ९

सर्वांही उपकारकारक असा जो कां द्वितीयाश्रम,
तूझी संप्रति योग्यता दिसतसे, त्याचा धराया क्रम,
ज्यानें प्रीतमनें तुला शिकविल्या, विद्या समस्ता यया,
त्यानें सांग मला तुला दिधलि कीं आज्ञा गृहीं जावया ? १०

बापा केवळ आगमेंचि तुझिया तृप्ती न माझ्या मना,
सांगावें मज कांहिं कार्य, असि हे आहे मला वासना;
आज्ञा लद्गुरुची ह्मणोनि, अथवा, तूंचि स्वतां होउनी
आलासी ? वद रे खरें, मम समाचारास रानांतुनी." ११

[शा.वि.] ऐसें फार उदार भाषण, तरी 'निर्द्रव्य हा' हें असें
त्याचें मृन्मयपात्र देखुनि तया आलें कळों मानसें;
'आतां कोठुनि कार्यसिद्धि अपुली ?' चिंतूनियां हें मनीं,
देई उत्तर राजयाप्रति असें, तो कौत्सनामा मुनी. १२

"आहे सर्वहि आमुचें कुशळ बा ! संभाळ तूं भूमिचा
न्यायानें करितां उपद्रव जना होईल रे कोठचा ?
सूर्याचा पडतां प्रकाश पृथिवीपृष्ठावरी, भूपते,
दृष्टीला अडवी, तमिस्र असलें बाधील कोठून तें. १३

---

१ साधतें. २ हें संबोधन. ३ गृहस्थाश्रम. ४ 'गृही व्हावया' असें पाठांतर. यापक्षीं गृहस्थाश्रमी व्हावया असा अर्थ. ५ अंधकार.

पूज्यांचा बहुमान हा तव कुलाचार, क्षितीशा, असे,
भक्ती ही तव पूर्वजांहुनि तुझी मातें विशेषा दिसे,
आलों मी तुजपाशिं जाण भलत्याकाळीं करूं याचना,
या हेतुस्तव मात्र खेद, नृपते, होतो मदीया मना ! १४

[व.ति.] सत्पात्रिं अर्पुन धना तनुमात्र शेष,
तूं शोभसी नृपवरा, अजि बा विशेष;
काढून घेति कुणबी जंव धान्य सारें,
तें ठोंब[1]मात्र उरतें. दिससी तसा रे ! १५

[शा.वि.] भूपा, तूं अजि सार्वभौम असतां, निर्द्रव्यता पातली
झाली ती मखहेतुनेंचि, ह्मणुनी शोभे बहू चांगली !
वृद्धीहून विशेष योग्य ह्मणती, बा इंदुची क्षीणता,
पर्यायें अमृता पिवोनि हे[2]रिखा जैं पावती देवता. १६

भूपा स्वस्ति असो अतां तुज बरें ! जावोनि अन्यस्थलीं,
पाहातों जरि बा मिळेल, गुरुला जी दक्षिणा कल्पिली,
ज्याच्या पोटिं नसे जलांश अणुही, ऐशा शरत्कालिका
मेघा चातक याचिना, जरि बहू तृष्णार्त आहे निका !" १७

[व.ति.] बोलूनियां मुनि असें, जंव जाउं लागे,
तों त्या निषेध करि भूपति भक्तियोगें,
"सांगे, तुझ्या गुरुस कांय[3] कितीक देणें ?"
ऐसें ऋषीस पुसलें तंव भूपतीनें. १८

[उ.जा.] मोठ्या व्ययें उत्कट याग केला, तरी न ज्या अल्पहि गर्व झाला,
वर्णाश्रमा वागवि जो यथार्थ, त्याला वदे कौत्सहि प्रस्तुतार्थ. १९

"समाप्त झाल्यावर सर्व विद्या, म्या प्रार्थिला तें गुरु नम्रबुध्द्या,
कीं 'दक्षिणा कांहितरी गुरूजी, द्यावी असें वाटतसे, मला जी;'
गुरू मला यावर काय बोले, 'बाबा, तुवां सेवन फार केलें,

१ पाला वगैरे तोडून बाकी जें रहातें त्यास ठोंब ह्मणतात. २ चंद्राला सोळा कला आहेत. त्यांत कृष्णपक्षीं पहिली कला अग्नि, दुसरी सूर्य, तिसरी विश्वेदेव, अशा क्रमानें वेगळेवेगळे देव पान करितात, तेव्हां त्याचा क्षय होतो, असें पुराणांत वर्णिलें आहे. ३ काय पदार्थ पाहिजे व तो किती पाहिजे तें सांग.

भक्ती तुझी कृत्रिमशून्य[1] वत्सा, ती दक्षिणेहून विशेष कौत्सा.'२०
तथापि म्या आग्रह फार केला, तेणें गुरूला बहु कोप आला,
दारिद्र्य माझें न गणी मनांत, कोपाचिया बोलतसे भरांत,
'चौदाचि विद्या गणिती जनांत, तूतें मियां त्या दिधल्या समस्त;
रे दक्षिणेचीच घमंड मोठी आहे, तरी दे तितुक्याच कोटी!'२१

[शा.वि.] आलों एथ नृपा, परंतु तव ह्या हातांतल्या भाजनें
नांवाचाचि वसुंधरेश असशी, हें जाणिलें म्या मनें;
मातें जें धन पाहिजे नृपवरा तें तों नसे थोडकें,
तेणें भीडहि घालणें तुज, मला वाटे न आतां निकें." २२

[स्वा.] पापबुद्धि अगदीं नचि ज्याला, कांतिनें अणु उणा न विधूला,
तो असें वचन विप्रवरोक्त ऐकुनी वदतसे द्विजभक्त. २३

[शा.वि.] "सच्छील, श्रुतिपारग, द्विज असा गुर्वर्थ[2] मागावया,
आला जो रघुमंदिरीं न कवडी तेथें मिळाली तया,
तेव्हां अन्य वदान्य[3] धुंडित असे, तो संप्रती!" यापरी,
माझी नूतन ही न कौत्स पसरो, दुष्कीर्ति पृथ्वीभरी. २४
आतां द्वित्रिदिनावधी तव धनासाठीं द्विजेंद्रा, स्वतां
जातों यत्न करावया निरलस क्षोणीवरी तत्वतां,
यासाठीं मम निर्मलीं सुखकरीं त्रेतागृहाभ्यंतरीं
चौथ्या अग्निपरी[4] निवास करि बा, येईन मी जोंवरी." २५

[शि.] प्रतिज्ञा हे सत्या परिसुनि रघूची द्विजवरें,
वदे हर्षें भूपाप्रति नृपवरा तो 'बहु बरें'
नसे पृथ्वीमाजी अणुहि धन हें जाणुनि मनीं,
हराया तें इच्छी, रघुनृप कुबेरा[5]जवळुनी. २६

---

१ निष्कपट. २ गुरूला देय जो अर्थ तो. ३ दाता. ४ दक्षिणाग्नि, गार्हपत्याग्नि, आणि आहवनीयाग्नि मिळून तीन अग्नि अग्निहोत्र्याच्या घरांत असतात. त्या तीन अग्नि मिळून त्रेता अशी संज्ञा आहे. त्यांच्या स्थानाला त्रेतागार असें म्हणतात. चौथ्या अग्नीप्रमाणें तूं थोडा काळ माझ्या घरीं रहा म्हणून राजानें कौत्सास म्हटलें. एणेंकरून अग्नीप्रमाणें तो तेजस्वी पूज्य आणि कल्याणकारक होता असें सूचित झालें. ५ कुबेर हा धनाचा स्वामी आहे म्हणून त्याजपासून धन आणण्याचा राजाचा बेत होता.

[शा.वि.] मंत्रप्रोक्षणयोग सन्मुनिवसिष्ठाचा जहाला ज्या[1],
तेणें वायुवशें जसी जलधरा ये, तेंवि शक्ती तया,
या हेतुस्तव जो जलीं, स्थलि, नभीं सर्वत्र अव्याहत
चाले, यापरि भव्य सुंदर असा होता, रघूचा रथ. २७

[उ.आ.] स्थापोनि संपूर्ण निजास्त्रभार, केला रघूनें रथ सिद्ध थोर,
प्रदोषकालीं नृपती विशुद्ध आरूढला त्यांत रघू प्रबुद्ध.

[उ.व.] वसे रघूच्यामधि धैर्य खूप, गणी कुबेरासहि अल्प भूप;
"जिंकोनि त्या आणिन अर्थ थोर," रथीं निजे चिंतुनि हें नृवीर. २८

[शा.] प्रातःकालीं भूप जाया निघाला, ऐका तेव्हां जो चमत्कार झाला,
कोशागारीं[2] आसती जे नियुक्त[3], येवोनी त्या सांगती चित्रयुक्त;
"कोशागारीं जाहली स्वर्णवृष्टी, गेल्या रात्रीं पाहिली जी स्वदृष्टी,"
सांगोनी हें दाविली ते नृपाला, पाहोनीयां तोहि साश्चर्य झाला. २९

[उ.जा.] ज्याचेवरी चालुनि जावयाचा होता विचार क्षितिपालकाचा,
तया कुबेरेंचि सुवर्णराशी दिले, असे हे रघुराजयाशीं;
वज्रें जसें खंडित मेरुखंड, तसेचि हे शोभति तैं प्रचंड,
कौत्सास तें सर्वहि दान केलें, न थोडकेंही निजगेहिं नेलें. ३०

[शा.वि.] जें का देय गुरूस त्यास तिळही जास्ती न घे याचक,
मागे त्याहुनि फार देइ असला दाता धरानायक;
साऱ्या भूमितळीं विलक्षण असी त्यांची कृती देखुनी,
केली तैं स्तुति फार विस्मितपणें, साकेतवासीजनीं[4]. ३१

[स्र.] पेटारे मोठमोठे भरुनि, नरपती आंत घालोनि तोडे,
केले तेव्हां रवाना झटकरि विभुनें शेंकडो उंट घोडे,
कौत्साच्या पादपद्मीं मग बहु लवुनी, ठेविलें मस्तकातें,
त्यातें हातें ऋषीही उठवुनि, करिता होय या भाषणातें. ३२

[शा.वि.] "सद्धर्में जनपालनास करितो, भूमीपती जो तया
देते वांछित अर्थ भू, नचि असे आश्चर्य गोष्टींत या,
स्वर्गातेंहि दुहोनि अर्थ हरणें, जो धारिला मानसें

१ रथाला. २ जामदारखान्यांत. ३ नेमलेले (कामगार). ४ अयोध्यावासी.

ऐशी शक्ति अचिंतनीय, नृपते, तूझ्याच ठायीं वसे. ३३

भूपाळा, अनुकूळ सर्व तुजला आहे, ह्मणोनी स्वतां
व्हावें प्राप्त तुला, असें नचि दिसे मातें, नृपा, पाहतां;
होवो पुत्र गुणी तुझ्यासम तुला सन्मान्य लोकांमधीं,
जैसा तूं तुझिया पित्यास, नृपते, झालासि बापा सुधी." ३४

[इं.व.] * देवोनि आशीर्वचनास यापरी, तो कौत्स गेला वरतंतुच्या घरीं,
प्रकाश जीवा रविलब्ध कीं जसा, तल्लब्ध राजा सुत होय तैं तसा. ३५

[शा.वि.] सत्पुत्र प्रसवे नृपाळमहिषी[1] ब्राह्मीं[2] मुहूर्तीं तदा,
तेजःपुंज कुमार[3]तुल्य तंव त्या पाहोनि, पावे मुदा[4],
ब्रह्म्याचें अभिधान आणुनि मनीं, भूमीपती निश्चयें,
पुत्राचें अपुल्याहि तेंचि 'अज[5]' हें तैं नाम ठेवी स्वयें. ३६

[इं.व.] तें रूप, ती आकृति, तेंचि तेज, सौंदर्य तें, वीर्य तसेंचि ओज,
जे जे पित्याचे असती प्रशस्त, शिशूंत आले गुण ते समस्त;
[वं.] दीपावरी दीपक अन्य लावितां, समान दोन्ही दिसती स्वभावतां,
तैसेंचि या बापसुतांत अंतर, असेचिना पंडित हो अणूभर. ३७

[शा.वि.] विद्या तो शिकला समस्त, वरि ये कांती नवी यौवनें,
यासाठीं धरि काम[6] त्या रघुसुतीं तैं राज्यलक्ष्मी मनें;
कन्या फार भिडस्थ पित्रनुमती[7] वांछी वराया जशी,
लक्ष्मीही वरणार्थ त्यास रघुची आज्ञा अपेक्षी तशी. ३८

[उ.जा.] विदर्भराजास[8] सुरूपखाणी, स्वसा[9] असे इंदुमती ह्मणोनी,
स्वयंवराचा करि थाट मोठा, तो भोज ज्याच्या न धनास तोटा;

---

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[शा.वि.] आशीर्वाद असा सुतुष्टहृदयें, देवोनियां भूसुर
गेला तेथुनियां स्वकीय गुरुच्या तो आश्रमा सत्वर;
सूर्यापासुनियां प्रकाश मिळतो या जीवलोकां जसा,
कौत्सापासुनि पुत्रलाभ रघुला तैं शीघ्र झाला तसा. ३५

१ राणी. २ ब्रह्मदेव हा ज्या मुहूर्ताची देवता तो ब्राह्म म्हणजे अभिजित्. ३ षडाननासारखा. ४ हर्षा. ५ अज हें ब्रह्मदेवाचें नांव आहे. ६ इच्छा. राज्यलक्ष्मी इच्छा धरी. ७ पित्याची अनुमती. ८ विदर्भ म्ह० हलींचें वराड होय, त्याचा राजा. ९ बहीण.

पाहोनियां आप्त पुरूष एक, जो बुद्धिमान् कार्यपटूहि देख,
आणावयासाठिं अजास त्यानें रघूकडे पाठविला नृपानें. ३९

[स्र.] संबंध श्लाध्य आहे, निजसुतहि तसा योग्य लग्नास झाला,
या दोहींचा विचार क्षितिपति रघुनें, आणुनीयां मनाला,
हत्ती घोडे पदाती रथ अशि सह त्या थोर देऊनि सेना,
भोजाचे राजधानीप्रति निजतनुजा शीघ्र केलें रवाना. ४०

राहोल्या भव्य डेरे रघुनृपतनयासाठिं जे सिद्ध केले,
तेथें सामंतभूमीपति परिपरिच्या भेटि घेऊनि आले,
त्यांनीं नानोपचारां रचुनि, तिथतिथें सिद्धता सर्व केली,
तींही रानींहि बागापरि पटसदनें राजभोगार्ह झाली. ४१

[शा.वि.] मार्गी चालुनि फार सूनु रघुचा ये नर्मदेच्या तटीं,
जेथें शीतळ नक्तमालतरुंची छाया असे गोमटी;
वाराही बरवा असे बहुत तें विश्रांतिजोगें स्थळ,
झालें श्रांत ह्मणोनि तेथ अज दे, तैं लष्कराचा तळ. ४२

पाण्याच्या वरतीं मिलिंद उडती पाहूनि त्यां अंतरीं,
वाटे कीं, मदमत्त हत्ति शिरला आहे जलाभ्यंतरीं;
तैं वन्य द्विप ये खराच हुसळी मारूनि बाहेर कीं,
ज्याच्या मस्तकिंची धुपून असकी गेली मदाची चिकी. ४३

धातूंचा तंव वर्ण सर्व धुपुनी गेला जळें तो जरी,
दांताना दिसती उभ्या बहुनिळ्या रेखाहि नानापरी;
झाले बोंथट घांसुनी दृढ शिळा ते हो अशा हेतुनें,
खेळे टक्कर ऋक्षवद्गिरिच हा हें तर्किलें तैं जनें. ४४

फेंकी दूर पळांत आंखुड करी शुंडा, तियेनें हणी
लाटांतें, ध्वनिही भयंकर करी तीराकडे पाहुनी;
जाणों बंधन तोडण्यास्तवचि ह्या मोठ्या प्रयत्ना करी,
ऐसा संभ्रमयुक्त शोभत असे पाण्यामधें तो करी. ४५

शेवाळें ढकली, उरेंचि, गज तो पोहे, करोनी बळा,

---

१ रघुराजपुत्रासाठीं. २ दमलें (लष्कर). ३ भ्रमर. ४ हत्ती (बाहेर ये). ५ ऋक्षवान् नांवाचा पर्वत. ६ हत्ती. ७ पोहायास लागे ( बळा करोनी ).

पाणी फार खळाळुनी अधिंच तो लोंढा तटा लागला;
त्यामागोनि महागिरींद्र उपमा साजे जयाला खरी,
तो मोठा मदमत्त कुंजर जवें आला तटाच्या वरी. ४६

[उ.जा.] गेला लयाला मद एकल्याचा, जलावगाहें क्षणमात्र साचा,
पाहे जई तो गज पाळलेले, पुन्हा शिरीं थोर मदौघ चाले. ४७

[शा.वि.] येतो मादक वास सुंदर जसा, सप्तच्छदाच्या चिका,[1]
तैसा वन्यकरींद्रमस्तकगता त्या येइ दानोदेका;[2]
तो हुंगोनि असह्य भूपतिकरी[3] मागें पळूं लागले,
केले यत्न सुतीक्षण हस्तिपगणें, कांहीं न ते चालले. ४८

घोडे तोडुनि पायबंद पळती सैत्रास[4] दाही दिशा,
चाकें आंखहि भग्न होउनि रथां आली बहू दुर्दशा,
सेनानायक सर्व धांवति जवें रक्षावया स्त्रीजना,
केली यापरि धामधूम करिनें, जो कांहिं ऐकेचि ना. ४९

आलें[5] धांवुनि मोहरा करुनि, तें 'रानांतल्या हत्तिला
भूपें मारूं नये,' असा नृपसुतें शास्त्रार्थ हो ऐकिला;
मागें मात्र सरो, परंतु न मरो, हें चित्तिं आणोनियां,
दोरी फार न ओढितां हळु हणी बाणा शिरीं त्याचिया. ५०

[स्र.] बाणाचा स्पर्श होतां वनकरि अपुल्या हस्तिदेहास टाकी,
त्याकाळीं सर्वसेना स्तिमित निरखुनी होय रेवातटाकीं;
तेजाचे मंडलानें जणुं चहुंकडुनी वेढिलासे क्षणांत,
भव्या दिव्या वपूला रुचिरतर अशा पावला तो नभांत. ५१

[शा.वि.] तेव्हां तो निजशक्तिनें सुकुसुमें कल्पद्रुमाचीं बरीं
आणोनीं निमिषामधें करितसे वृष्टी अजाचे शिरीं,
बोले तें हृदयावरी सुरुचिरा तद्दंतकांती पडे,
मोत्यांचे रमणीय हारचि नवे ते भासती रोकडे. ५२

"औद्धत्यावरुनी मतंगमुनिनें[6] मातें पुरा शापिलें,

---

१ सप्तछद नांवाचे झाडाच्या चिकाला. २ मदोदकाला. ३ राजाचे हत्ती. ४ भययुक्त. ५ "ये आंगावर चालुनी सजव तें" असें पाठांतर. ६ मतंग या नांवाचा मुनि होता.

तेणें मत्तमतंगजत्व मजला तत्काळ बा पातलें,
माझें नांव अजा, 'प्रियंवद' असे, गंधर्वराजा पिता,
विख्यात प्रियदर्शनाख्य सकला ज्या मानिती देवता. ५३
तेव्हां पाय धरोनियां सविनयें म्या प्रार्थिला तो मुनी,
क्रोधा टाकुनि पावला नृपसुता, स्नेहार्द्रतेला मनीं;
पाण्याला जरि ताप येई, तरि तो अग्न्यातपानेंचि[1] ये,
आहे शीतल वस्तुतां प्रकृतिनें तें जाणती ज्ञानिये. ५४
[प्र.] 'इक्ष्वाकुक्षितिपतिच्या कुलांत देख, होईल प्रकट अजाख्य भूप एक,
तो कुंभस्थल करिल प्रभिन्न जेव्हां, बाणानें, निजवपु पावशील तेव्हां,
ऐसा तो करुणमनें निधी तपाचा, उच्छापा मुनि मज दे अमोघ वाचा,
ऐसा मी मुनिवचनें गजत्व लाहें, आणी या, मनुजपते, वनांत राहें. ५५
[शा.वि.] तेव्हांपासुनि वाट पाहत असें, राजा, तुझी सर्वदा,
शापोन्मुक्त करोनियां मज तुवां बा पाववीलें मुदां,
आतां प्रत्युपकार मी न वहिला केला तरी सांग रे,
झाली जे स्वपदोपलब्धि मजला ती व्यर्थ नोहे बरें! ५६
[व.ति.] संमोहनाख्य मम अस्त्र विचित्र आहे,
गंधर्वदैवतकमंत्रसमेत घे हें,
हत्या घडे न रिपुची, विजयाप्ति होते
बा प्रेरित्यास, अशि शक्ति सख्या धरी तें. ५७
[शा.वि.] संकोचा न धरी मनांत, सखया, जें ताडिलें ती दया
त्वां केली, अणुमात्रही नचि अरे संदेह गोष्टींत या;
आतां मी कर जोडुनी करितसें त्वत्प्रार्थना आदरें,
मातें निष्ठुर होउनी ह्मणुंनको, 'नाहीं' असें आज रे. ५८
[व.ति.] 'घेतों बरें,' ह्मणुनि यापरि राजपुत्रें,
रेवोदकें करुनि आचमना पवित्रें,
गंधर्वराजतनयाजवळूनि चित्र,

---

१ अग्नी व उष्ण यांच्या योगानें. २ येतो. ३ हर्षाप्रत. ४ स्वकीय पदाची प्राप्ती. ५ संमोहन या नांवाचें अस्त्र. तें ज्यावर टाकावें त्याचा प्राण न घेतां तें त्याला मोहित करून मूर्छित पाडितें. ६ हें उदकाचें विशेषण.

घे [1]तो उदग्[2]वदन बैसुनि अस्त्रमंत्र. ५९

[शा.वि. दोघांची घडली पथांत वहिली ऐशा रिति मित्रता,
तीतें कारण दैवयोग, न दुजा हेतू दिसे पाहतां,
गेला [3]चैत्ररथास तेथुनि तई गंधर्वराजात्मज,[4]
भोजाच्या नगरीस जाय रघुचा पुत्र प्रतापी अज. ६०

आला तें नगरासमीप अज हा वृत्तांत ऐकोनियां,
ह[5]र्षापूरितचित्त भोज नृपती त्या जाय भेटावया;
लोकानंदकर प्रकाश असल्या चंद्रोदयीं येतसे,
वृद्धी अब्धिस, या [6]अजागमवशें भोजास झालें तसें. ६१

आणोनी निजराजधानिस अजा तें भोजराजा स्वयें,
शुश्रूषा करि थोर सेवकपणें त्याची बहूतें व्ययें,
ऐशी कीं यजमान तोचि गमला, तेथें मिळाल्या जनां,
होता वास्तव भूप भोज, परि तो भासे जसा पाहुणा. ६२

जाणों टेंकण हें नभास असला [7]प्रासाद शोभे नवा,
य[8]द्वातायनिं बैसल्या श्रमहरा लागे सुखाची हवा,
ज्याच्या दारिं सुवर्णकुंभ भरुनी ओव्यावरी ठेविले,
तैसे अन्यहि मंगलप्रद पदार्थ श्रेष्ठ संस्थापिले.

[स्र.] भोजाचे मुख्यमंत्री नमुनि बहु ‘ महाराज ऐसें चलावें, ’
दावोनी यारितीनें पथ रघुतनया, नेति तेथें स्वभावें,
बाल्यावस्था त्यजोनी मदन विलसतो यौवनारूढ जैसा,
प्रासादारूढ भासे नृपसुत अज तो रम्य लोकांस तैसा. ६३

[प्र.] तेथें तो शयन करी प्रतापशाली, चित्तीं ये अति [9]कमनीय राजबाळी,
जी एक क्षितितलि रम्यरूपखाणी, तत्प्राप्ती घडु मज हें मनांत आणी,

[शा.वि.] तेव्हां इंदुमतीस्वरूप निरुतें त्याला दिसे अंतरीं,
त्या अभ्यासवशेंचि रात्रिस अजा निद्रा न ये लौकरी,
अन्[10]यांसक्तमना विलोकुनि पती त्याची प्रिया हो जसी,

---

१ तो अज (घे ह्म० घेई). २ उदङ्मुख. ३ कुबेराचें उद्यान. ४ प्रियंवद. ५ हर्षानें पूर्ण झालें चित्त ज्याचें असा. ६ अजाचे येण्यानें. ७ राजवाडा. ८ ज्याच्या खिडकींत. ९ अति सुंदर. १० अन्य स्त्रीविषयीं ज्याचें मन आसक्त झालें.

नाहीं येत तयासमीप कलुषा होऊनियां मानसीं, ६४

[स्र.] लोळे निद्राभरें जों अज सुखशयनीं, चौकडा स्कंधदेशीं
तेव्हां घांसे, तनूची उटिहि घुसडुनी माखली चादरीशीं;
प्रातःकाळीं उठावें ह्मणुनि समवयी तैं अजाचेचि भाट,
तत्काळा योग्य ऐसा श्रुतिमधुररवें[1] गाति तत्स्तोत्रपाठ. ६५

[शा.वि.] "गेली रात्र पहा विचारचतुरा, ऊठ प्रभो, लौकरी
क्षोणीरक्षणभार हा सकलही ध्यायास खांद्यावरी;
दोघे पूरुष योजिले कमलजें[2], दोहीं कडोनी तिहीं[3]
खांदे देउनियां वरी उचलिजे, ऐसी असे गोष्ट ही.

[व.ति.] त्यांतोनि एक तव तात असे, कुमारा,
एकेकडोनि धरितो उचलोनि भारा,
बाजू दुजी उचलण्या तुजलाचि तेणें
बा, योजिलें, ह्मणुनि ऊठ अतां त्वरेनें. ६६

[शा.वि.] निद्राधीनमनें तुवां क्षणभरी लक्ष्मी तिरस्कारिली,
तेव्हां खंडितनायिकेपरि मनस्तापास बा पावली;
चंद्र त्वन्मुखकांतियुक्त ह्मणुनी त्याच्याकडे जाय ती
विश्रांत्यर्थ, परंतु तोहि बघ रे झाला फिका संप्रती. ६७

[व.ति.] आतां मनोज्ञनयनांस व पंकजांस,
बा एकदाचि अजि येउ नवा विकास,
नेत्रांत गर्गर तुझ्या फिरताति तारा,
पद्मांत भृंगततिका करि येरझारा;
ऐसी विकासि कमलें अणि नेत्र यांचें,
अन्योन्यसाम्य घडुं दे नरवीर, साचें,
कां कीं सहस्रदलबंधु नभःप्रदेशीं,
येवोनि सूर्य कमलांप्रति हा विकाशी. ६८

[शि.] प्रभातीं फुल्लांभोरुहसमुदयालागिं[4] भजतो,
तसा वृक्षांच्याही शिथिल कुसुमांलागिं हरितो,[5]

---

१ कर्णप्रिय शब्दानें. २ ब्रह्मदेवानें. ३ त्या दोन पुरुषांनीं. ४ विकसित झालेल्या कमलसमुदायास. ५ या क्रियापदाचा कर्ता पवन.

तुझ्या श्वासामध्यें परिमल निसर्गेंचि वसतो,
जणूं तत्प्राप्त्यर्थ स्फुट पैवन हा यत्न करितो. ६९

[शा.वि.] वृक्षाचीं नव कोमलारुण अशीं स्नेहांशशाली दलें,
त्यांमाजी दंव शुभ्र मौक्तिकसरावाणी दिसे चांगलें,
हास्याची रुचि दंतकांतिसहिता आतां बहू पांढरी
जेवीं शोभतसे, तुझ्या नृपसुता, रक्ताधरोष्ठावरी. ७०

[पृ.] प्रतापनिधि सूर्य हा जरि नये वरी अंबरीं,
तरी अरुण सत्वरी अधिंच त्या तमा संहरी,
रणीं अतुलविक्रमी असुनि वीर तूं तत्वतां,
न कारण रिपूंवरी रघुस जावयाला स्वतां. ७१

[वं.] कुशीवरी दोहिं निजूनि जे क्रमें, रात्रीस निद्रासुख घेति अश्रमें,
जागेवरोनी उठताति कुंजर, तैं शृंखळांचे रैव होति दुर्धर.
न त्यांचिया दंतयुगास लागला, तैं रक्तिमा पर्वतधातुचा भला,
तथापि बालार्करुची तयांवरी, तैं गैरिकाचा भ्रम पाहत्यां करी. ७२

[शि.] इराणी घोडे जे पटघटितविस्तीर्णसदनीं
निबद्ध स्वच्छंदें उठति बघ निद्रेस तजुनी;
तयांतें चाटाया पुढति धरिती सैंधव नवें,
मुखोष्म्यानें होतें मलिन जरि तें स्वच्छ बरवें. ७३

[स्र.] पुष्पें गेलीं सुकोनी ह्मणुनि विरलता फार हारांस आली,
निस्तेजस्क प्रदीपावलि नृपतनया देख ही सर्व झाली;
जीं जीं बा त्वां उठावें ह्मणुनि वदतसों रम्यवाक्यें सुखानें,
तीं तीं हा पंजरस्थ प्रकट वदतसे, देख रांवा मुखानें." ७४

[शा.वि.] ऐसी बंदिसुतोक्त वाणि मधुरा ऐकोनियां, जागृत
होवोनी शयना त्यजी झटकरी तो भूपतीचा सुत;
जागा होउनि राजहंसविरुतें गंगेचिया सैकता

१ त्वच्छ्वासपरिमलप्राप्त्यर्थ. २ वायू. ३ सूर्याचा सारथी. ४ अक्लेशें (सुखानें). ५ शब्द. ६ तरुण सूर्याची कांती. ७ गेरूचा (भ्रम). ८ पाहाणारांस. ९ सैंधवाचे तुकडे (घोड्यांस घालण्याची रीत वर्णिली आहे). १० राजहंस पक्ष्याच्या शब्दानें. ११ वाळवंटाला.

जेवीं सोडुनि [1]सुप्रतीक उठतो, तैसा दिसे [2]हा स्वतां. ७५

प्रातःकालिं उठोनि यापरि, मग श्रद्धालु भूपात्मज,
श्रुत्युक्तें विधिनें करी क्रमवशें तो स्नानसंध्या अज;
केला त्यास [3]यथार्ह वेष [4]चतुरीं तेव्हां नृपाळाचिये,
वर्गीं जाइ, तदा स्वयंवरविधीसाठीं मिळे [5]जो स्वयें. ७६

---

**ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,**
**गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,**
**त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा**
**केलें प्राकृत, पांचवा बुधवरा हा सर्ग त्याचा पहा. ॥ १ ॥**

**या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा अजस्वयंवराभिगमननामक पंचम सर्ग समाप्त झाला असे.**

---

## सर्ग सहावा.

श्लोक.

[व.ति.] राजोपचारयुतमंचक थोर देख,
सिंहासनें तदुपरी असती सुरेख,
आरूढ त्यांवरि नृपाळसमाज झाला,
तो तेथ तैं रघुसुतें अवलोकिजेला.

नाना अलंकृति तसाचि सुवेष साजे,
तेणेंकरोनिहि विराजति फार राजे;
तेव्हां [6]विमानचर हे जमले [7]सुपर्व,
ऐसे अजास गमले नृप तेथ सर्व. १

[भु.प्र.] [8]रतिप्रार्थनेनें सुसंतुष्टचित्तें, दिला देह त्या शंकरें मन्मथातें,

---

१ सुप्रतीक नांवाचा एक दिग्गज आहे. २ अज. ३ यथायोग्य (वेष). ४ चतुर पुरुषांनीं. ५ जो नृपाळांचा वर्ग. ६ विमानांत बसणारे. ७ देव. ८ शिवानें मदन जाळिला तेव्हां त्याची स्त्री जी रति तिनें शिवाची प्रार्थना केली ती ऐकून अजाचे रूपानें मदनच तिला देण्याकरितां केला काय अशी उत्प्रेक्षा. मदनासारिखा तो सुस्वरूप होता असें तात्पर्य.

जणूं तोचि हा पुत्र आहे रघूचा, असा भाव झाला तईं त्या नृपांचा;
[उ.जा.] देखोनि त्याचें अतिदिव्य रूप, निराश झाले मनिं सर्व भूप,
ते बोलती टाकुनियां न यातें, वरील ही इंदुमती अह्मातें. २
[स्र.] भोजानें दाविलेल्या रघुसुत चढला मंचकीं शोभमानीं,
सोप्या सोपानमार्गें[1] मणिगणघटितें[2] वीर्यसौंदर्यखाणी[3];
सिंहाचा बाल मोठ्या त्रुटितगिरिशिलामार्गयोगेंचि[4] जैसा
उंचुंगीं[5] पर्वताग्रीं सहज चढतसे, हा दिसे तेथ तैसा. ३
[शा.वि.] नानावर्ण विचित्र रत्नघटितीं सिंहासनीं तेधवां,
शोभाशालि नृपाळबाळ अज तो आरूढ झाला युवा;
मोरांच्या[6] बहुरंगपृष्टि बसुनी षड्वक्र[7] कीं शोभला,
भासे आसनिं त्या तनूज रघुचा रूपें गुणें आगळा. ४
[स्र.] पंक्तीनें बैसलेले विलसति सुरुची ते हजारोंहि राजे,
राजश्री एक ती तों बहुविध बनुनी वेगळाली विराजे;
त्यांची ती दीप्ति दिव्य प्रकट निरखुनी, दीपती लोकनेत्र,
मेघौघामाजि वीज स्फुट चमकुनियां दीपवी जेविं चित्रें[8]. ५
[शा.वि.] राजव्रात[9] सुवेषधारक महासिंहासनीं बैसला,
त्या सर्वांतहि तेथ पुत्र रघुचा तो फार तैं शोभला;
लोकाभीष्टपदार्थदानपटु[10] जे विख्यात देवद्रुम[11],
त्या सर्वांमधि पारिजात[12] दिसतो, जैसा बहू उत्तम. ६
पुष्पांचे तरु सर्वही त्यजुनियां, भृंगी जशा कां वनीं
हत्तीच्या मदयुक्तमस्तकिं जवें त्या बैसती जाउनी;
तैशा दृष्टि समस्तही पुरगता लोकांचिया सत्वरी,
टाकोनी सकलां नृपांस, पडत्या झाल्या अजाच्या वरी. ७
वंशाचे चरितास जाणति बरें, ऐशा तिथें बंदिनीं,
चंद्रादित्यसमुद्भवां[13] नृपकुलां[13] तैं वर्णिलें सुस्वनीं,

---

१ जिन्यानें. २ हें सोपानमार्गाचें विशेषण. ३ हें रघुसुताचें विशेषण. ४ फुटलेल्या पर्वतशिलांच्या मार्गानें. ५ उंच. ६ मयूर हें षडाननाचें वाहन आहे. ७ षडानन. ८ आश्चर्यकारक रीतीनें. ९ राजसमूह. १० लोकांस इष्ट अशा पदार्थांचें दान करण्यांत कुशळ. ११ कल्पवृक्ष. १२ कल्पवृक्षांपैकीं एक. १३ चंद्रसूर्यवंशीय राजकुलांस.

तैसा सुंदर धूरही अगुरुचा सौगंध्यशाली भला,
मागें टाकुनियां ध्वजांस गगनीं जो कां त्वरें चालिला. ८

मोठीं मंगलसूचकें बहुविधें शंखादिकें सुंदरें,
वाद्यें वाजुनियां गभीर रव ते गेले दिगंतीं त्वरें,
त्यातें ऐकुनियां पुरोभवतिच्या मोरें हि बागांतलीं,
पिच्छां उंच करोनि, हृष्टहृदयें नृत्या करूं लागलीं. ९

तें वैवाहिक वेष घेउनि तई ती राजकन्या भली,
दिव्या सुंदर पालखींत बसली, जी सेवकीं शोभली,
दोहींबाजुस राजमंच असती, मार्गींत त्या सुंदरी
ठेपे घेउनि, इंदुची सुविमला जेवीं कला अंबरीं. १०

ती अत्यद्भुत रम्य सृष्टि विधिची कन्यास्वरूपी नवा,
जी कां योग्य समस्तलोकनयना पाहावया तेधवां;
राजांचीं हृदयें उडूनि पडलीं सारींहि तीच्या वरी,
तें सिंहासनिं देहमात्र उरले! झाली स्थिती यापरी! ११

[भु.प्र.] "मिळो आपणा सुंदरी राजबाळा," असी लालसा होय साऱ्यां नृपाळां
मनांतील शृंगार तेव्हां तयांचा, दिसे हावभावांवरोनीच साचा;

[इं.व.] शृंगारचेष्टा तंव भूपतींच्या दूती जणूं चित्तगता रतीच्या;
वृक्षांचिया नूतन पल्लवांची, शोभा दिसे तेंवि तई तयांची. १२

[शा.वि.] कोणी एक नृपाळ घेउनि करीं नाळा बहू कोमळा,
तो लीलाकमळा बळें फिरवुनी, दावी जनां सोहळा,
ज्याचीं रम्यदळें सवेग फिरती, तीं भोंवऱ्या ताडिती,
तेव्हां आंतिल ही पराग हलुनी झाला सुवृत्ताकृती. १३

---

१ शब्द. २ हें बागांतलीं याचें विशेषण. ३ इंदुमतीला पाहून त्या तरुण राजांस तिजविषयीं उत्कट अभिलाष उत्पन्न झाला. तेव्हां त्यांच्या हृद्गत इच्छेच्या सूचक म्हणून दूतीसारिख्याच ज्या शृंगारचेष्टा म्हणजे शृंगारव्यंजक हावभाव प्रकट झाले. ४ एक राजा लीलाकमल हातांत धरून गरगर फिरवूं लागला, एणेंकरून 'हस्तगत लीलाकमलाप्रमाणें त्वां मला फिरवावें' असा राजाचा अभिप्राय व्यंजित झाला. परंतु, हा हात फिरविणारा (हातवारे करणारा) ह्मणून कुलक्षण होय, असा त्याविषयीं इंदुमतीचा ग्रह झाला.

[स्र.] शेला एके नृपाचा त्वरित सरकुनी स्कंध देशावरोनी,
खालीं येवोनि बैसे भुजगत विमला अंगदा आटकोनी,
लीलेनें रम्यवक्त्रांबुज फिरवुनियां बाजुला त्या नृपानें,
स्वस्थानीं स्थापिजेला, पुनरपि धरुनि, आपुल्या तो करानें. १४

[शा.वि.] कोणी एक विलासशालि नृपती पादांगुलीच्या नखें,
लीलामंथरमानसें खरवडी तो पादपीठां सुखें,
तेव्हां संकुचिता विराजति बहू त्या अंगुली कांतिनें,
ईषद्वक्रविलोकनें रुचिकरें झालीं तई लोचनें. १५

[वं.] टेंकोनि डावा भुज आसनीं बळें, मित्रासवें एक नृपाळ चावळे,
झालें तई तिर्कस कीं तदानन, खांदाहि तो उंच दिसे सुशोभन,
[उ.जा.] वळोनि झालें त्रिकें वक्र फार, लोळे तदा त्यावरि रत्नहार,
सभेमधें तो नरनाथ ऐसा, दावीतसे त्यासमयीं विलासा. १६

विलासिनी तें प्रिय फार साचें, सुश्वेत ऐसें दल केतकीचें,
कोणी धराधीश नखाग्रभागें, चिरीतसे त्यास विलासयोगें,

---

१ एका राजानें आंगावर शेला आवरून घेतला. एणेंकरून ' असें मी तुला ( इंदुमतीला) आलिंगन करीन ' असा त्या राजाचा मनोभाव प्रकट झाला. परंतु याचें कांहीं तरी अंग (अवयव) झांकण्याजोगें म्हणजे वाईट असल्यामुळें हा अंगावर पांघरूण घेतो, असा इंदुमतीचा ग्रह झाला. २ सिंहासनावर बसलें असतां खालीं पाय लोंबकळतात म्हणून त्यांना टेंकण्याकरितां पीठें मांडिलीं असतात, तशीं एथें सुवर्णाचीं पादपीठें मांडिलीं होतीं. एके राजानें त्या सुवर्णाच्या पादपीठास पायांच्या अंगुलीनीं खरवडिलें. तेव्हां त्या पादांगुली आकुंचित झाल्या. एणेंकरून ' तूं मजजवळ ये ' असें त्या राजानें इंदुमतीला सुचविलें. परंतु हा तर भुईखरवड्या म्हणून कुलक्षण असा इंदुमतीचा ग्रह झाला. ३ किंचित् वक्र. ४ कोणी एक राजा डावेबाजूस वळून मित्राशीं गोष्टी करूं लागला. एणेंकरून 'अशा रीतीनें मी तुला डावीकडे बसवून तुझ्याशीं गोष्टी करीन ' असें त्या राजानें इंदुमतीला सुचविलें. परंतु दुसऱ्यास पाहून हा तोंड फिरविणारा होय, कार्यकर्ता नव्हे, असा त्याविषयीं इंदुमतीचा ग्रह झाला. ५ पाठीच्या कण्याचा खालचा भाग. ६ कोणी एक राजा केवडीच्या पानाला नखांनीं टोंचून फाडूं लागला. एणेंकरून ' याप्रमाणें मी तुझ्या नितंबस्थलावर नखव्रणादिक करीन ' असें त्यानें इंदुमतीला सुचविलें. परंतु तृणच्छेदक (गवतकाप्या) जसा कुलक्षण, तसाच पत्रच्छेदक ( पानफाड्या ) ही कुलक्षणच होय असा त्याविषयीं इंदुमतीचा ग्रह झाला.

प्रिया नितंबावरि हो स्वभावें, जयां नखाग्रांप्रति वापरावें,
तिहींच तो केतकपत्र देखा, फाडूनि पात्रे नरपाळ तोखा. १७

[शा.वि.] होते जे तळवे सुरक्त उपमा ज्या योग्य रातोत्पलें,
रेखांचें ध्वजरूप चिन्ह विलसे ज्यांचे वरी चांगलें,
त्याहातीं क्षितिपाल कोणि धरुनी फांसे बहू निर्भयें,
चित्तें उल्लसितें करीत बराला क्रीडेस तेव्हां स्वयें. १८

होता नीट किरीट मस्तकिं जरी स्थानावरी सुस्थित,
बाजूला सरला असें मिष मनीं कल्पूनियां निश्चित,
सद्रत्नान्वित मुद्रिका चमकती बोटामधें त्या करें,
लीलेनें मुकुटा जपून धरिलें एकें धराधीश्वरें. १९

[भु.प्र.] तंई एकदासी प्रसिद्धा सुनंदा, जिचा द्वार पाळावयाचाच धंदा,
बहू धीट जी पूरुषावाणि होती, उभी कन्यकासन्निधानीं अहो ती.

[शा.] होते जीला ठाउके सर्व भूप, तैसे त्यांचें वंशवृत्त, प्रताप,
तीनें आधीं मागधापाशिं कन्या, आणोनी ती बोलती होय धन्या. २०

[द्रु.वि.] "मगधदेशपती बघ हा सये, शरण कोणि जरी नर यास ये,
परमकारुणिक क्षितिपाल हा, तद्वना करि हारुनि भी महा.

[व.ति.] आहे करीत जनरंजन थोरभावें,
गंभीर फारचि असे नृप हा स्वभावें,

१ हर्षां. २ रक्तकमलें. ३ कोणी एक राजा फांशांनीं खेळूं लागला. एणेंकरून 'मी तुजबरोबर अशीच क्रीडा करीन (खेळेन)' असें त्यानें इंदुमतीला सुचविलें. परंतु, फांशांनी खेळण्यांत चतुर असला तरी तो सोंगटीकुट्याच. याशिवाय, फांशांनीं खेळणें हें श्रुतिनिषिद्ध ही आहे; यास्तव हा कुलक्षणच होय असा त्याविषयीं इंदुमतीचा ग्रह झाला. ४ एका राजानें आपल्या हातानें मस्तकावरील मुकुट सरसावून नीट बसविण्याचा भाव केला. एणेंकरून, 'या मुकुटाप्रमाणें तूं मस्तकावर बसलीस तरी मला भार वाटणार नाहीं,' असें त्यानें इंदुमतीला सुचविलें. परंतु हा डोक्याला हात लावणारा ह्मणून कुलक्षण होय असा त्याविषयीं इंदुमतीचा अभिप्राय झाला. ५ मगधदेश हा प्रस्तुतचा बाहार प्रांत होय. त्याची राजधानी पुष्पपुर ज्यास पाटलिपुत्र असें ही नांव आहे तें होय. त्यासच सांप्रत पाटना असें म्हणतात. ६ त्याच्या रक्षणा. ७ भीती (हारुनि). ८ हें भीचें विशेषण.

जिंकोनियां रिपुगणास रणांत अर्थ
संपादि, यास्तव परंतप हा यथार्थ. २१

[वं.] असोत लक्षावधि अन्य भूपती, राजन्वती यान्चि नरेश्वरें क्षिती,
तेजस्वि तारे दिसती जसे हिरे, ज्योतिष्मती होय निशा निशाकरें. २२

[पृ.] करी सतत भूवरी सवनकर्म हा सादर,
वसे ह्मणुनि याचिया घरिं सदैव देवेश्वर,
शची विरहपांडुरा तंव करी न वेणीफणी,
न कल्पतरुचीं फुलें शिरिं भरी सखेदा मनीं. २३

[शा.वि.] हा आहे वरण्यास योग्य ह्मणुनी आतां जरी तूं सये,
स्वेच्छेनें वरिशी, तरी वरि सुखें या भूपतीला स्वयें,
जासी पुष्पपुरास यासह तदा वातायनीं संस्थिता,
पाहातील तुला महोत्सवभरें त्या नागरी योषिता." २४

[इं.व.] ऐशा तिच्या ऐकुनि भाषणास, कन्या कटाक्षें निरखी तयास,
तीच्या करांतील मधूकमाळ, ती थोडकी तत्क्षणि होय ढील.

[उ.जा.] न बोलतां एकहि अक्षराला, प्रणाम तीनें नृपतीस केला,
कृतीवरोनीच अशा निषेध केला, असा होय जनास बोध. २५

[इं.व.] चित्तीं सुनंदा समजोनि साचा, भूपात्मजेच्या कल मानसाचा,
तेथोनि अन्या नृपतीकडे ती, झाली तईं इंदुमतीस नेती,

[उ.जा.] सरोवरीं मानससंज्ञि जैसी, वसे सरोजावरि राजहंसी,
वातें जलीं लाट उठोनि तीतें, दुज्या सरोजाप्रति जेविं नेते. २६

वदे तिला, "अंगपती असे हा, विलोकि याच्या सुमनोज्ञ देहा,
तारुण्य लावण्य बघूनि याचें, भुले पुरा चित्त सुरस्त्रियांचें.

---

१ वास्तविक (परंतप म्ह० शत्रूस जिंकणारा). २ सुराजयुक्त. ३ यज्ञकर्म. ४ इंद्र. ५ प्रोषितभर्तृका म्ह० ज्यांचे पती प्रवासास गेले त्या स्त्रियांनीं वेणीफणी वगैरे करूं नये अशी रीति आहे. इंद्र घरीं नसल्यामुळें शची वेणीफणी करीत नव्हती. व कल्पवृक्षाचीं फुलें मस्तकावर धारण करीत नव्हती. ६ पुष्पपुरनामक नगरास. ७ खिडक्यांत. ८ इंद्राचे साह्यार्थ हा स्वर्गास जात असतां सुरस्त्रिया म्ह० अप्सरा यांनीं याचें उत्तम स्वरूप पाहून त्या याजविषयीं कामुक झाल्या अशी प्रसिद्धि आहे.

[शा.वि.] याचे दिग्गजतुल्य मत्तगज जे त्यांना कराया वश
केलें शास्त्र महर्षिंनीं, श्रुत असे ज्याचें जगीं सद्यश,
ऐसा थोर पराक्रमी नरपती या बाधिना आपदा,
भोगी भूमितलींहि वास करुनी हा भूप ऐंद्री पदा; २७
येणें जिंकुनि वैरि, हार हरिले त्यांच्या स्त्रियांचे खरे,
तैं त्यांचे कुचिं अश्रुबिंदु पडले शोकाचिया निर्भरें,
दोरा काढुनि मौक्तिकेंचि जणुं तीं त्यानें पुन्हा अर्पिलीं
तत्कंठीं सुभगें, मनास बहु उत्प्रेक्षा गमे ही भली. २८
वाणी आणि रमा कधीं न वसती एकेचि ठायीं जरी,
त्या दोघीहि यया नृपांत वसती, ही गोष्ट आहे खरी;
त्वत्कांती रुचिरा व वाणि मधुरा युक्ता गुणांनीं असी,
त्या दोघींसहि योग्य जाण तिसरी तूं मात्र गे दीससी." २९
दृष्टी काढुनियां नृपावरुनि ह्या तेव्हां समर्याद ती,
"आतां चाल पुढें" ह्मणोनि नृपजा बोले सुनंदेप्रती;
होता सुंदर तो परीक्षकहि ही तत्रापि तो नावडे,
प्रत्येकीं रुचि भिन्न, यास्तव नसे हा दोष कोणाकडे. ३०
शत्रूला अतिदुःसह क्षितिपती तेथें दुजा बैसला,
जो कां फारचि दर्शनीय, उदिता चंद्रापरी शोभला;
त्याच्या सन्निध आणुनी नृपसुते तेव्हां सुनंदा सुखें
बोटा भूमिपतीकडे करुनि ती ऐशा रितीनें वदे. ३१
"देखे सुंदरि हा अवंतिपति गे विस्तीर्ण वक्षस्थल
याचें, बाहु सुदीर्घ, मध्य कृशही याचा असे वर्तुल;

१ अंगदेश हा सांप्रतच्या भागलपुराजवळचा प्रांत होय, असें म्हणतात. त्या देशाच्या राजाचें हें (या श्लोकांतलें) वर्णन आहे. कोणाएकाच्या शापामुळें दिग्गज हे पृथ्वीवर उत्पन्न झाले असतां त्यांस आवरण्याकरितां कोणे ऋषीच्या हातें गज वश करण्याचें शास्त्र करवून तें याच राजानें चालू केलें अशी लोकांत कथा आहे. या शास्त्राला गजशास्त्र असें म्हणतात. २ पालकादिक महर्षि यांनीं. ३ इंद्राचे ऐश्वर्यास भूमीवर राहून ही भोगी असा अन्वय. ४ मौक्तिकांची उत्प्रेक्षा. ५ सरस्वती. ६ लक्ष्मी. ७ तो (राजा). ८ इंदुमती.

त्वष्ट्र्यानें चरकीं धरोनि नेव कीं चंडांशु जो संभ्रमें
केला स्त्रीस सुसह्य, तोच नृप हा, ऐसें मनाला गमे. ३२
हा शक्तित्रययुक्त भूप निघतो युद्धार्थ मोठा बळी,
वाजी धांवति जैं पुढें तंव उडे त्यांच्या खुरीं जी धुळी.
सामंतक्षितिपालमौलिमणिची कांती हरी ती स्वयें,
तेव्हां ते बहु गुद्मरोनि पळती, घेऊनि चित्तीं भयें. ३३

[व.ति.] श्रीचंद्रमौलि भगवान् शिव तत्समीप,
हा उज्जनींत वसतो सुकृती महीप,
कांतांसमेत सुख घे नृप चांदण्याचें,
हा कृष्णपक्षिहि अवंतिपतीच साचें. ३४

[स्र.] येतो क्षिप्रानदीला झगटुनि ह्मणुनी वायु जो शीत वाहे,
तेणें उद्यानवृक्षावलि तटगत ती सर्वदा हालताहे;
तेथें या भूमिनाथासह सुरतसुखास्वाद घ्यायास तूतें,
इच्छा आहे मनीं कीं क्षितिपतितनये! सांग आतां मला तें." ३५

[स्वा.] मित्ररूप कमलांस विकाशी, शत्रुरूप बहु पंकहि शोषी,
तो रुचे न नृप इंदुमतीला, जेविं चंडरुचि [१०]कैरविणीला. ३६

[उ.जा.] नाहीं नृपालास यया वरीत, विचार आणोनि असा मनांत,

---

१ हल्लींच्या उज्जनी प्रांताला अवंतिदेश असें म्हटलें आहे. त्याच देशाचा हा राजा. देवांचा शिल्पकार (सुतार) जो त्वष्टा, त्याची कन्या संज्ञादेवी ही सूर्याला दिली होती. त्याचें तेज तिला सोसेना म्हणून त्यानें सूर्याला चाकावर लावून सुसह्य केलें, तोच हा राजा होय कीं काय, अशी ही उत्प्रेक्षा केली. सारांश हा राजा फार तेजस्वी होता असा या श्लोकाचा भावार्थ होय. २ नूतन. ३ सूर्य. ४ प्रभाव उत्साह व मंत्र यांपासून उत्पन्न तीन शक्ती राजांत रहातात. ५ मांडलिक राज्यांच्या मुकुटरत्नांची. ६ आघाडीचे लोकच शत्रुपराभव करितात असा भाव. ७ उज्जनीस महाकाल म्हणून शिवाचें स्थान आहे. त्या शिवमस्तकावर चंद्र असल्यानें उज्जनींत रात्रीचें सर्वदा चांदणें असतें, कधीं अंधार असत नाहीं, या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. ८ उज्जनीजवळ या नांवाची नदी आहे. तिला शिप्राही म्हणतात. ९ सूर्य. १० चंद्रविकासी कमलास ( रुचत नाहीं ). कमलविकास व चिखलाचा शोष हे धर्म सूर्याचे तसे या राजाचे होत पण (इंदुमतीला तो न रुचे ).

अनूपदेशाधिपतीपुढें ती, झाली सुनंदा मग तीस नेती;
पद्मांतरंगापरि कांति जीची, लालित्यसृष्टीच नवीं विधीची,
गुणाधिका जिंकि रदेंचि कुंदा, बोले तदा तीस पुन्हा सुनंदा.३७

[स्वा.] "कार्तवीर्य ह्मणुनी श्रुतवृत्त, योगशास्त्रनियमीं रतचित्त,
राज हें पद विशेष जयाला योग्य, एक नृप यापरि झाला.
[वं.] सहस्र बाहू रणिं ज्यास शोभले, अष्टादशद्वीपिंहि यूप रोंविले,
एकाकि जो वैरिगणास आक्रमी, न जाहला अन्य असा पराक्रमी.३८

[शा.वि.] दुष्कर्मीं रत होय चित्त जरि तें सोडूनि कर्मा शुभा,
हातीं चाप असा समक्षचि पुढें तत्काळ ठाके उभा;
जी अंतःकरणीं कुबुद्धि निपजे तीतें हि दंडीतसे,
ऐसा शिक्षक भूपती क्षितिवरी कोठें नसे राजसे. ३९

जो इंद्राहि रणांत आणि जितुनी, त्याच्या भुजा मोविनें
बांधी जो अवळोनि, बंद पडलें त्यांचें तईं हालणें;
धांपा टाकितसे दशींहि वदनीं तो बंदिशाळेमधीं,
भोगी कष्ट बलिष्ठ रावणहि गे ज्याच्या प्रसादावधि. ४०

[शा.] त्याचे वंशीं जन्मला हा महीप, आहे याचें नांव लोकीं प्रतीप,
सद्वृत्तानें ज्ञानयोगेंहि वृद्ध, त्यांतें भावें सेवितो हा प्रबुद्ध;
[शा.वि.] लक्ष्मी चंचल फार, वास न करी एकेचि ठायीं असें,
लोकीं दुर्यश हें प्रसिद्धचि तिचें तूतेंहि ठावें असे;
एणें तें हरिलें सखे सकळही ! याचे घरीं ती स्थिरा !
एणें स्पष्टचि होय दोष अवघा तो आश्रयाचा खरा ! ४१

१ माळव्यांतील महेश्वर प्रांतास प्राचीनकाळीं अनूपदेश म्हणत होते. याची राजधानी माहिष्मती नगरी तीच सांप्रतचें महेश्वर शहर होय. तें नर्मदेच्या कांठीं आहे. २ सौंदर्य. ३ माहिष्मती नगरीचा कार्तवीर्यनामें राजा झाला. त्याला सहस्र बाहू होते. म्हणून त्याला सहस्रार्जुन असें ही म्हणतात. तो श्री दत्तात्रेयोपासक असून मोठा पराक्रमी होता. यानें रावणाला धरून बंदीस ठेविलें होतें. यानेंच जमदग्नि ऋषीची धेनु बलात्कारानें नेली. त्यावरून जमदग्नीचा पुत्र जो परशुराम त्यानें यास ठार मारिलें. ४ प्रख्यातवृत्त. ५ जिंकी. ६ रावण. ७ त्या रावणाच्या. ८ रावणाचें. ९ प्रसाद होईपर्यंत. १० या राजानें (दुर्यश हरिलें). ११ अचल (आहे हें पद अध्याहृत आहे). १२ यावरून.

लोकीं केवळ काळरात्रि[1] गणिली जी क्षत्रियांच्या कुळा,
ऐसा थोर कठोर रामपरशू[2] पृथ्वीवरी गाजला;
त्यालाही अतितुच्छ पद्मदलसें ज्याणें रणीं लेखिलें,
अग्नीचें[3] बहु साह्य याच नृपतीलागीं मिळालें भलें. ४२

जी माहिष्मति[4]नाम दिव्यनगरी जीची जणूं मेखला,
ती रेवा, उदकौघ सुंदर जिचा वेणीपरी चालला;
प्रासादाग्रगतीं[5] गवाक्षिं[6] बसुनी तो[7] देखण्याची जरी
इच्छा होय, तरी वया नृपतिच्या अंकीं बसें सुंदरी." ४३

होता सुंदर तो तथापि रुचला नाहीं तिला भूपती,
मेघांचा प्रतिबंध जाउनि शरत्कालीन शीतद्युति[8]
आला सर्वकलासमेत उदया तो पूर्णिमेचे दिनीं
लोकां आवडतो, तरी न रुचतो तो पद्मिनीला[9] मनीं. ४४

[व.ति.] जो शूरसेन[10]पति, नाम सुषेण ज्याचें,
लोकांतरींहि यश गीत असे जयाचें,
जो कां असे अमितविक्रम जाण साचा,
तैसाचि फार नृप जो ऋजुमानसाचा;
आचारशुद्ध असल्या स्वकुलद्वयाशी,
जो दीपसा विमलकीर्तिवशें प्रकाशी,
आणोनि तन्निकट ती प्रतिहार[11]रक्षी,
तीतें वदे, "निरखि याजकडे मृगाक्षि ! ४५

[शा.वि.] नीपांच्या[12] कुलिं जन्मुनी, सविधि[13] गे यज्ञास केले ययें,

---

१ कालरात्र ह्मणून एक महाभयंकर व संहारकारक अशी पार्वतीची मूर्ती होय, तिजवरून कोणी महाभयंकर व प्राणिसंहारकारक असेल त्याला कालरात्रि म्हणतात. २ परशुरामाचा परशू. ३ या नगरास जिंकण्याकरितां शत्रु आले तर त्यांस मीच स्वतः जाळून भस्म करीन असा अग्नीनें या राजास वर दिला होता ह्मणून तेथें आलेले शत्रु जळून भस्म होतात अशी भारतांत कथा आहे. या गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे. ४ सांप्रतचें महेश्वर शहर. ५ प्रासादावरील. ६ खिडक्यांत. ७ रेवेचा जलौघ. ८ चंद्र. ९ सूर्यविकासी कमलिनीला. १० हल्लींच्या मथुरा प्रांतास पूर्वी शूरसेन हें नांव होतें, असें म्हणतात. त्याची राजधानी मथुरा होय. ११ द्वारपालिका. १२ नीप म्हणून या सुषेणाचा एक पूर्वज होता. १३ यथाशास्त्र.

याचे ठायिं विरुद्धही गुण सये, वासा करीती स्वयें;
गोव्याघ्रादि [1]निसर्गवैरिहि जसे प्राणी [2]प्रशांतीं महा
सिद्धांच्या वसती तपोवनिं सदा, तैसा चमत्कार हा! ४६
इंदूचे परि रम्य शीतल असी कांती ययाची घरीं,
याचें तेज सुतीक्ष्ण [3]उष्णकिरणा ऐसें रिपूंच्या पुरीं!
वाडे तेथिलचे उजाड पडुनी गच्चांवरोनी तृणें,
झालीं फारचि दाट वाढुनि बहू जाणें मृगांकाननें. ४७
क्रीडेला मथुरेसमीप यमुनातोयीं ययाच्या स्त्रिया
आनंदें करिती, तईं स्तनतटीं जो चंदनाचा तया
शोभे लेप, धुपून जाइ तंव तो, तोयौघ गे तेथला
[4]गंगासंगवशें प्रयागिंच तसा, एथें दिसे चांगला. ४८
[5]कालिंदीगत कालियाख्य [6]अहिनें [7]तार्क्ष्या भिवोनी मनीं,
ज्याची अद्भुतकांति वक्षि पसरे, ऐसा दिला [8]या मणी;
तो याचे हृदयावरी विलसतो शोभाळ मोठा पहा,
[9]विष्णूला सहकौस्तुभाहि हिणवी [10]तेणें गमे भूप हा. ४९
रम्या [11]चैत्ररथा उणें न अणुही उद्यान [12]वृंदावन,
जेथें कोमलपुष्पवृंदरचिता शय्या असे शोभन;
आरोढूनि तिचेवरी [13]शशिमुखी या भूपतीच्या सवें,
नाना भोगुनियां विलास वय हें त्वां घालवावें [14]नवें. ५०

[व.ति.] [15]गोवर्धनाख्य गिरिच्या दरिमाजि नित्य
पर्जन्यकालिं करिताति मयूर नृत्य,

---

१ स्वभावानेंच शत्रु (हें गोव्याघ्रांचें विशेषण). २ हें तपोवनाचें विशेषण. ३ सूर्य. ४ गंगेच्या योगें प्रयागी दिसतो तसा एथें चंदनाचा लेप मिश्रित झाल्यानें चांगला दिसे. ५ कालिंदी म्ह० यमुना. या नदीच्या डोहांत कालिया नामें सर्प रहात होता. त्याचें रक्षण या राजानें केलें म्हणून त्यानें यास एक मणी दिला अशी कथा आहे. ६ सर्पानें (मणी दिला). ७ गरुडाला. ८ या राजाला. ९ हें विष्णूचें विशेषण. १० त्या मणीनें. ११ चैत्ररथनामक (कुबेराचे) उद्यानास. १२ हें वृंदावन नांवें वन मथुरेजवळ आहे १३ हें संबोधन. १४ नवें वय म्हणजे तारुण्य. १५ हा गोवर्धन पर्वत मथुराप्रांतीं गोकुळ-नामक गांवाजवळ आहे. हाच श्रीकृष्णानें करांगुलीवर उचलिला अशी कथा आहे.

पाषाण [1]ज्यां दगडफूलसुवास ये गे,
ज्यांचीं तळेंहि भिजती जलबिंदुयोगें;
त्यांचे वरी बसुनि कामिनि हर्षहेतु
तें [2]बर्हिनृत्य अवलोकि सुलोचने, तूं,
मायूर नृत्य जरि इच्छिसि पाहण्याला,
हे सुंदरी, लवकरी वरि या नृपाला." ९१

[शा.] सोडोनी त्या भूपतीलागिं कन्या, जाई भूपा ती वरायास अन्या,
मार्गीं आल्या टाकुनी पर्वताला, जाते जैसी [3]आपगा सागराला. ९२

[वं.] शोभे जयाच्या भुजदंडिं अंगद, हेमांगदाख्य क्षितिनाथ [4]दानद,
पराक्रमी आणि अजिक्य शत्रुतें, ह्मणोनि ज्याचें यश फार गाजतें;
जेणें स्वशौर्यें रिपुपक्ष जिंकिला, असा कलिंगाधिप तेथ बैसला,
त्याचे पुढें आणुनि राजबाळिसीं, तईं सुनंदा करि भाषणा तिशीं. ९३

[पृ.] "[5]महेंद्र व सरित्पती नृपति हा, [6]यांचा धनी,
महेंद्रसमसत्व हा जिणि रिपूंस [7]आयोधनीं;
यदीय मदमत्त गे गज विशाल [8]त्यांचे मिसें,
[9]महेंद्र गमना करी रणिं, [10]गमे जनाला असें. ९४

[शा.वि.] मौर्वीचे वण यद्भुजांस पडले, दोहींसही साजरे,
ते पाहून अशी जनीं विबुध उत्प्रेक्षा करीती खरे;
कीं ज्या बंदिस घातल्या नृपतिनें एणें रिपूंच्या [11]श्रिया,
पंक्ती सांजन अश्रुच्याचि असती ह्या निश्चयें [12]त्यांचियो. ९५

[शा.] सौधें याचीं अब्धिचे रम्यकांठीं, गच्चा, माड्या, दालनें ज्यांस मोठीं,
तेथें बाई बैसलेल्या नराला, तोयाच्या गे दीसती [13]ऊर्मिमाला.

[इं.व.] गंभीर चाले ध्वनि सागराचा, तेणेंचि हा जागृत होय साचा,
तैं [14]यामघोषादिक वाद्यजातें, झालीं यया त्याज्य महीभुजातें. ९६

---

१ ज्या पाषाणास दगडफुलांचा सुवास येतो. २ मयूरांचें नाचणें. ३ नदी. ४ दाता. ५ महेंद्र पर्वत हाच ज्यांचा गिरिदुर्ग म्हणजे किल्लाकोट; आणि सरित्पति ( समुद्र ) हाच ज्याचा जलदुर्ग म्ह० खंदक होय असा भावार्थ. ६ महेंद्र पर्वत आणि सरित्पति ( समुद्र ) यांचा धनी. ७ रणांत. ८ गजांचे ( मिषें ). ९ महेंद्रनामा पर्वत. १० पर्वततुल्य त्याचे गज होते असा भाव. ११ लक्ष्म्या. १२ त्या लक्ष्म्यांच्या ( सांजन अश्रूंच्या पंक्ति असा अन्वय ). १३ लाटा. १४ घड्याळें वगैरे.

[शा.वि.] मुग्धे[1], तोयधिचे तटीं सुगहनें आहेत तालीवनें[2],
त्यांचा ऐकुनि मर्मरध्वनि सुखी होताति नारीमनें;
तेथें क्रीड ययासवें, तंव मरुत्[3] हारील घर्मा स्वयें,
जो कां घेउनियां लवंगसुमनें द्वीपांतराहूनि ये[4]." ५७

[व.ति.] ऐसा प्रलोभ जरि भूपतिचे सुतेला,
त्या दासिनें सुवचनें बहु दाविजेला,
*तत्रापि सोडुनि तया नृपतीस अंतीं,
गेली पुढें झडकरी नृपबालिका[5] ती;

[शा.] कोणा येतां संपदा नीतियोगें, दुर्दैवें त्या देखुनी जाय मागें;
तैसी झाली भूपतीची गती या, दुर्दैव्याचीं वांछितें जाति वांयां. ५८

[मा.] मग उरगपुराचा[6] नाथ दिव्यस्वरूप,
निरखुनी बसलेला एक तेथें महीप,
तिस निकट तयाच्या नेउनीयां प्रशस्ता,
करि अति चतुरा ती भाषणा वेत्रहस्ता[7]. ५९

[शा.वि.] "गे पांड्यक्षितिपाल शालभुज[8] हा असीं ययाच्या महा
लोंबे हार, तनूस[9] लेप विलसे गोरोचनाचा पहा;
ज्याचीं रव्युदयीं सुरक्तशिखरें आणी वैरी वाहती
मोठे निर्झर, त्या नगापरि यया शोभा नृपा दीसती. ६०

---

१ हें संबोधन. २ ताडाचीं झाडें. ३ वायू. ४ येतो. * 'तत्रापि ती त्यजुनि भूमिपतीप्रती या, गेली पुढें त्वरित आकृतिलोभनीया असें पाठांतर. ५ रुचिर आहे अंगकांती जिची अशी ती इंदुमती. (पाठांतरांत आकृतिलोभनीया असें पद आहे त्याचा अर्थ आकृतीनें म्ह० वास्तविक रूपानेंच वश होणारी, केवळ स्तुतिमात्रेंकरून वश होणारी नव्हे असा जाणावा). ६ उरगपूर ही पांड्यदेशाची राजधानी होय. दक्षिणहिंदुस्थानाच्या दक्षिणभागास जो हल्लीं त्रावणकोर प्रांत आहे त्याच्या पूर्वेस समुद्रकिनाऱ्यापर्यंतचा जो भाग तोच पांड्यदेश होय असें म्हणतात. त्याच भागांत हल्लींचे डिंडिगल आणि तिनिवल्ली हे प्रांत आहेत. (सर्ग ४ श्लोक० ४९ यांत ही पांड्याविषयींचा उल्लेख आला आहे) "अथोरगाख्यस्य पुरस्य नाथं" इत्यादिक हा या श्लोकाचा मूळ संस्कृत श्लोक आहे. त्यावर "उरगाख्यस्य पुरस्य पांड्यदेशे कान्यकुब्जतीरवर्तिनागपुरस्य नाथम्" अशी मल्लिनाथानें टीका केली आहे. ७ दासी. ८ शालवृक्षापरी दीर्घबाहू. ९ ज्याच्या आंगावर.

विंध्याद्रीप्रति थांबवी, निजबळें प्राशोनियां सागरा,
टाकी त्यास[1] पुन्हा ह्मणूनि विदित क्षोणीवरी जो खरा;
'यज्ञांतीं अवगाहनास करितां सुस्नात झालास, बा!'
ऐसें यास ह्मणे अगस्ति[2] मुनि तो, हें ऐकिलेंना तुवां. ६१
रुद्रापासुनि दुर्लभास्त्र नृपती हा पावलासे महा,
'याचे पासुनियां असे भय जनस्थानास माझ्या पहा,'
ऐसें रावण शंकुनी ऋजुपणीं साधी अधीं मित्रता
यांशीं[3], नंतर होय तो निजबळें इंद्रादिकां जिंकिता. ६२
जी रत्नाकरमेखला[4] सुविदिता आहे दिशा दक्षिणा,
तीचा हाच पती मदीयवचना आणूनियां तूं मना,
या भूमीपतिनें करग्रह तुझा केला जरी साजणी,
गुर्वी पृथ्विपरी सपत्नि सुमुखी होशील तीची जनीं. ६३
विस्तीर्णें मलयाद्रिच्या निकट जीं आहेत रम्यें स्थलें,
तांबूलीततिनें[5] जिथें सुरुचिरें पूगव्रजा[6] वेढिलें;
एलावल्लिगणें सुगंधसुमनें आलिंगिलें चंदना,
पानें आंथरलीं तमालतरुचीं तेथें करी क्रीडना. ६४
हा इंदीवरतुल्यकांति नृपती श्याम स्वयें शोभला,
हा गोरोचनतुल्य गौरहि तुझा वर्ण प्रकाशे भला,
आकाशांत तडिल्लता जलद[8] ही, संयोग यांचा[9] जसा,
अन्योन्याप्रति शोभवी बघ तुझा याचाहि होवो तसा." ६५

---

१ सागराला ( पुन्हा ओकून टाकी ). २ विंध्याद्री उंच वाढून आकाशांत गेला तेव्हां अगस्ती ऋषि त्याजपाशीं आला, त्याला नमन करण्याकरितां विंध्याद्री ओणवला, तेव्हां अगस्तीनें त्यास तसेंच रहायास सांगितलें यावरून तो अद्यापि तसाच आहे. अशी कथा आहे. याच ऋषीनें एकेच चुळानें समुद्राचें प्राशन केलें असा जो महापराक्रमी व तेजस्वी अगस्त्य ऋषि तो या राजाचा स्नानकालीं सौस्नातिक म्हणजे सुस्नात असें म्हणणारा होता. असा हा राजा थोर होय असा भावार्थ. ३ या राजाशीं. ४ समुद्रमेखला. ५ नागवेलीच्या पंक्तीनें. ६ सुपारीच्या वृक्षसमूहास. ७ तांबूलीनें पूगवृक्षास, एलावल्लीनें चंदनवृक्षास वेढिलें, या वाक्यानें स्त्रीनें पुरुषास आलिंगिल्याचा भाव, तांबूली व एला एतद्गत स्त्रीलिंगानें पूग व चंदन एतद्गत पुल्लिंगानें बोधित होतो. व याप्रमाणें तूंही या राजाला आलिंगून शोभशील असा सुनंदावाक्याचा गर्भित अर्थ दिसतो. ८ मेघ. ९ विद्युल्लता व मेघ यांचा.

ऐसें आपण ओंलिचें परिशिलें भोजस्वसेनें, तरी
आह्यत्वें नचि तें प्रवेश करितें झालें तिचे अंतरीं;
सूर्यादर्शनहेतुनें मुकुलितीं पद्मोदरीं कीं जसे
इंदूचे किरण प्रवेशति नें, हा दृष्टांत एथें असे. ६६

[स्र.] ज्याज्या राजास गेली क्षितिपतितनया डावलोनी पुढारीं,
तो तो झाला विवर्ण, श्रम हृदयपुटीं होउनी त्यास भारी;
रात्रीं भूपालमार्गस्थित रुचिरगृहा लंघुनीयां मशाल
जातां त्यालों जसा कां अतितिमिरवशें कालिमा ये विशाल. ६७

[शा.वि. येतां राजसुता समीप तंव त्या चित्तीं अजा वाटलें,
कीं "मातें हि वरील, वा न!" ह्मणुनी व्यग्रत्व त्या पातलें;
तेव्हां दक्षिणबाहु जो फुरफुरी वेगें पहा सत्वरी,
तेणें सर्वहि संशयास मनिच्या तत्काळ केलें दुरी. ६८

अंगें शोभन सर्वही विलसती ज्याचीं अशा त्या अजा-
पाशीं येउनि राहि तेथचि उभी, पाहे न राजा दुजा,
ज्या मोहोर भला असे सुरुचिर प्रेष्ठा रसाला तया,
टाकोनि भ्रमरी न इच्छि दुसऱ्या वृक्षाकडे जावया. ६९

[इं.व.] "पुत्रीं रघूच्या अनुरक्त भावें, झाली असे इंदुमती स्वभावें,"
* ऐसें सुनंदा उमजे मनांत, तद्वंश वर्णी मग ती नितांत. ७०

[उ.जा.] "इक्ष्वाकुवंशांत उदार एक, झाला असे भूपललाम देख,
ककुत्स्थ ऐसें अभिधान त्याला, राशी गुणांचा ह्मणती जयाला;

---

१ सुनंदेचें. २ सूर्याच्या अदर्शनामुळें. ३ मिटलेल्या. ४ न प्रवेशती असा अन्वय. ५ त्या सुंदर गृहाला. ६ दक्षिणबाहु स्फुरण झाल्यास पुरुषाची इष्ट कार्यसिद्धि होते असें ग्रंथांत उक्त आहे. त्याला लक्षून हें वर्णन आहे. ७ फार आवडता. ८ आम्रवृक्षास (टाकुनी). * 'ऐसें सुनंदा समजोनियां ते, आरंभि तद्वित्स्ततवर्णनातें' असें पाठांतर. ९ (श्लोक. ७१,७२,७३,) इक्ष्वाकुवंशांत ककुत्स्थ नामक राजा झाला. तो महापराक्रमी होता. इंद्राचे शत्रू मारण्यास यानें इंद्राला साहाय्य केलें. तेव्हां इंद्रानें वृषभाचें रूप घेतलें आणि हा राजा त्यावर आरूढ होऊन त्यानें इंद्राचे शत्रू मारिले. तेणेंकरून इंद्रानें संतुष्ट होऊन त्यानें यास आपल्या अर्धासनावर बसविलें अशी कथा आहे तिजकडे या तीन श्लोकांत मिळून लक्ष्य आहे.

[इं.व.] त्याचेच नांवावरुनी पुढें कीं, तद्वंशजांचें अभिधान लोकीं,
काकुत्स्थ ऐसें पडलें सुजाणे, ज्याच्या यशातें जन सर्व जाणे. ७१

[उ.जा.] महोक्षरूपास धरी सुरेश, बैसे तयाचे वरि हा नरेश,
आरोढुनी नंदिवरी पिनाकी, आला जणूं कीं जन सर्व तर्की;

[इं.व.] दैत्यस्त्रियातें विधवात्वदान तेणें दिलें, मारुनि तीक्ष्ण बाण,
ऐशापरी दावुनि थोर शौर्या, साधी रणीं हा नृप देवकार्या. ७२

[उ.जा.] महेंद्र तेव्हां निजरूप घेई, तोपून अर्धासन यास देई,
बैसे तयाचे वरि हा नरेश, शेजारिं ज्याच्या विलसे सुरेश;
ऐरावता ताडितसे करानें, झालें असे अंगद ढील तेणें,
त्या अंगदा अंगद या नृपाचें, तई बहू घर्षित होय साचें. ७३

[स्र.] त्याच्या वंशांत मुक्ताफलविमलरुची होय राजा दिलीप,
ज्याची कीर्ती दिगंतीं गमन करितसे भूप जे त्या प्रतीप;
इंद्रा ईर्ष्या न वाटो, म्हणुनिच करि जो शंभरां एकऊन
यज्ञां, प्रज्ञावतांतें बहुमत उपमा देइ त्यालागिं कोण? ७४

[शा.वि.] वेश्या प्राशुनि मद्य रात्रि निघती क्रीडागृहीं जावया,
अर्ध्यामार्गिंच त्या विशंक निजती जैं येइ निद्रा तयां;
त्यांचें वस्त्र न वायुलाहि हलवे! चोरी घडे कोठुनी?
ज्याची या रितिची समस्त महती भीती धरीती मनीं. ७५

त्याचे स्थानिं रघू म्हणोनि करितो राज्यास, त्याचा सुत
लोकीं विश्वजिदाख्य याग करुनी झाला असे विश्रुत;
शौर्यें दिग्विजया करोनि रचिले जे कां धनाचे गिरी,
सारे दान दिले, म्हणोनि उरलीं मृद्भाजनें ज्यां घरीं. ७६

गेलें अद्रिवरी, तसेंचि तरलें जें सागरालागुनी,
नागांचे सदनीं शिरोनि तिथले निस्तेज केले मणी;
स्वर्गीं जाय असें दिसे पसरलें ब्रह्मांडगोलावरी,
ऐसें यद्यश मोजितांहि नकळे ज्याची इयत्ता खरी. ७७

---

१ वृषभाच्या रूपास. २ इंद्र. ३ शिव. ४ बाहुभूषण. ५ कीर्तीप्रमाणें. ६ विरुद्ध भूप तेही दिगंतीं गेले ). ७ बुद्धिमंतांस ( बहुमत ). ८ सर्व लोक. ९ ज्याच्या घरीं. १० पाताळीं.

इंद्रालागिं जयंत तेविं रघुला हा जाहलासे अज,
राज्याची गुरु धू धरी उचलुनी बापासवें हा अज;
एके बाजुस थोर बैल दुसऱ्या बाजूस गोऱ्हा नवा,
आल्म्या तुल्य धरी धुरे उचलुनी, दृष्टांत हा योग्य बा. ७८

[उ.जा.] कुलें स्वरूपें नवयौवनानें, गुणेंहि त्या त्या विनयप्रधानें,
'हा योग्य तूतें, वर यास तूं गे, संयुक्त हो कांचन रत्नयोगें!'' ७९

[शा.वि.] ऐसें भाषण संपल्यावरि सुनंदा राहिलीसे उगी,
संकोचास कमी करोनि वरणस्रक् सांवरोनी बघी;
फुल्लेंदीवरसुप्रसन्ननयनें, पावोनि हर्षास ती,
प्रेमें इंदुमतीसुतास रघुच्या तैं जाहली पाहती. ८०

झाला तैं अभिलाष थोर रघुच्या पुत्रार्थ तीचे मनीं,
होती फार भिडस्त यास्तव तिला तो बोलवेना जनीं;
कांटा दाट उभा तनूवरि तिचे झाला, तयाच्या मिसें
अंगा भेदुनि तोच बाहिर निघे, वाटे मनाला असें. ८१

[स्र.] झालीसे सानुरागा, समजुनि मनिं हें, शाहणी तीस दासी
थट्टेनें बोलली कीं "चल मम सखये, पाहुं अन्या नृपाशीं,"
या तीच्या भाषणाला परिसुनि नृपजा तापली थोर रोगें,
आवेशें भोंवयांतें चढउनि कुटिलें तीस पाहे अपांगें. ८२

[शा.वि.] माला कुंकुमसंयुता करगता होती, बहू रक्त ते,
घाली ती अजकंठिं राजतनया तेव्हां सुनंदाहतें;
होता जो अनुराग हृद्गत तिच्या, तो मूर्तिमान् तत्वतां
जाणों अर्पियला अजास वहिला भूपात्मजेनें स्वतां. ८३

[व.ति.] माळा सुमंगल सुमव्रजयुक्त होती,
लोंबे विशाल हृदयावरि पाहुनी ती,
हा होय इंदुमतिचा मृदु बाहुपाश,

---

१ आज. २ विकसित कमलासारिख्या प्रसन्न नेत्राच्या योगें ती रघुसुतास पहाती झाली असा अन्वय. ३ रोमांच. ४ तोच अभिलाप रोमांचाच्या मिषानें शरीर भेदून बाहेर आला. ५ क्रोधानें. ६ सुनंदेच्या हतानें. ७ पुष्पसमुदाययुक्त.

मार्नी असें निजमनीं अज पूरिताश. ८४

[स्र.] मेघांनीं मुक्त ऐशा शशिस सुविमला पावते चंद्रिका ते,

---

१ (श्लोक. ७१—८४) अजाचे महाकुलीनत्वादिक गुण सुनंदामुखानें ऐकून व लावण्यतारुण्यादिक गुण समक्ष पाहून इंदुमतीच्या अंतःकरणांत त्याविषयीं अत्यंत अभिलाष उत्पन्न झाला. आणि "हा योग्य तूतें, वर यास तूं गे, संयुक्त हो कांचनरत्नयोगें" या सुनंदावचनावरून हा आपल्यास अत्यंत अनुरूप पति आहे याविषयीं तिची ही संमति दिसून आल्यावरून इंदुमतीनें मोठ्या आनंदभरित मनानें अजाचे कंठांत माळ घालून त्याला वरिलें. अजाच्या पूर्वीं ज्या ज्या राजाच्या सन्निध इंदुमतीला नेऊन सुनंदेनें त्याचें वृत्तवर्णन केलें त्यांतून एकही राजा तिला आवडला नाही. तेव्हां ते राजे तिला न आवडण्याचीं कारणें त्या त्या वर्णनाचा विचार करितां अनुमित होतात तीं पुढें लिहितों. अजाच्या पूर्वी सात राजांचें वर्णन सुनंदामुखानें ऐकून इंदुमतीनें त्यांचा नकार केला. त्यांत मगध देशाचा राजा परंतपनामा हा पहिला होय. याचें वर्णन श्लोक २०—२४ पर्यंत आहे. त्या सर्वांचें मनन करितां, परंतपत्वामुळें क्रूरत्व, लोकरक्षणव्यग्रत्व, संतत यज्ञानुष्ठानतत्परत्व हीं त्या वर्णनांत व्यंजित झाल्यावरून तो राजा इंदुमतीला आवडला नाहीं असें दिसून येतें. अंगदेशाचा राजा हा दुसरा होय. याचें वर्णन श्लोक २६—२९ पर्यंत आहे. तें पाहतां, यांत अतिवीररस वर्णिला आहे, आणि "तुल्यो नेकत्र दक्षिणः" या शास्त्रान्वयें हा दक्षिणनायक असल्यामुळें सर्व स्त्रियांबरोबर सारखें वागणारा, तेव्हां अर्थात् इतर स्त्रियांप्रमाणेंच मी ही एक होईन ! व सुरांगनांनीं उपभुक्तयौवनही हा आहे, असें वाटून इंदुमतीनें त्याचा नकार केला असें अनुमान होतें. तिसरा अवंतिपति. याचें वर्णन श्लोक ३२—३६ पर्यंत आहे. त्यावरून पाहातां, हा केवळ शूर होय, आणि "आहे इच्छा मनीं कीं" अशा सुनंदावचनावरून तिची ही असंमतीच होय असें वाटून इंदुमतीनें हा वरला नाहीं असें दिसून येतें. चौथा प्रतीप. हा अनूपदेशाचा राजा. याचें वर्णन श्लोक ४१—४३ पर्यंत आहे. तें पाहतां, याचें नांवच मुळीं प्रतीप (प्रतिकूळ, विरुद्ध) म्हणून अरुचिकारक तसेंच याला अग्नीचें (संतापकारकाचें) साहाय्य, आणि त्याच्याच बळावर हा परशुरामाच्या कुठारास मोजीत नाहीं असें वाटून व "इच्छा होय तरीं यया नृपतिच्या अंकीं बसें सुंदरी" या सुनंदावचनावरून तिची ही अरुचीच दिसल्यावरून इंदुमतीनें त्यास वरिलें नाहीं असें दिसतें. पांचवा सुषेण. हा शूरसेनदेशाचा राजा. याचें वर्णन श्लोक ४६—५१ पर्यंत आहे. तें पाहतां, हा शत्रूंस ताप देणारा म्हणून क्रूर असें वाटून, व यास स्त्रियाही बहुत आहेत असें समजून इंदुमतीला तो रुचला नाहीं असें वाटतें. साहवा हेमांगद. हा कलिंग देशाचा राजा. याचें वर्णन श्लोक. ५३—५७ पर्यंत आहे. तें पाहतां, याचें केवळ शूरत्व मात्र व्यक्त झाल्यावरून

किंवा रत्नाकराला निजगुणसदृशी जान्हवी प्राप्त होते;
तैसी ही या मिळाली; अनुगुण घडलें हें असें संघ गांगे,
प्रीतीनें तैं प्रजांचा, परि अतिकटु तो क्षोणिपां शब्द लागे.८५

[व.ति.] त्या राजमंडळित जो वरपक्ष तो कीं,
सानंद होय दुसरा विमना विलोकी,
पद्में प्रफुल्लित तळ्यांत जशीं प्रभातीं,
होती, तिथेंच कुमुदेंहि सुकोनि जाती. ८६

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, साहवा बुधवरा हा सर्ग आहे पहा. ॥ १ ॥

**या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा इंदुमतीस्वयंवरवर्णननामक षष्ठ सर्ग समाप्त झाला असे.**

---

इंदुमतीला तो आवडला नाहीं असें अनुमान होतें. सातवा उरगपुरपति पांड्य. (पांड्य देशाचा राजा.) याचें वर्णन श्लोक ६०—६५ पर्यंत आहे. तें पाहतां, प्रथम पर्वताची उपमा आहे तिजवरून सौंदर्याच्यापेक्षां शरीराच्या स्थूलत्वाची म्हणजे अवाढव्यपणाचीच शीघ्र उपस्थिति होते; तसेंच "तूं दक्षिण दिशेची सपत्नी हो" या सुनंदावाक्यावरून तो दक्षिणदिशेचा पति होता हें उघड झालें. तेव्हां दक्षिणदिक्पतित्वामुळें यमाची प्रतीति होते; आणि त्याचें श्यामवर्णत्ववर्णनही याच प्रतीतीस अनुकूळ पडतें, याशिवाय, तडिल्लताघनसंयोगाप्रमाणें तुमचा संयोग असो अशा अर्थाच्या सुनंदावाक्यावरून समागमाचेंही क्षणभंगुरत्व प्रतीत होतें; या प्रकारें हें सारेंच अनिष्ट वाटून इंदुमतीनें याचा अंगीकार केला नाहीं असा तर्क वाटतो.

१ समुद्राला. २ गंगा. ३ अजाला. ४ मोठ्यानें बोले (प्रजांचा संघ). ५ राजांप्रत (तो शब्द कडू लागे). ६ विरुद्ध राजांचा पक्ष. ७ खिन्न. ८ एकेच तळ्यांत प्रभातकाळीं पद्में विकसित होतात व कुमुदें सुकतात तसें एकेच राजसभेंत एक पक्ष संतुष्ट व दुसरा खिन्न झाला.

# सर्ग सातवा.

## श्लोक.

[मा.] जसि बहुत विराजे षण्मुखें देवसेना,
तसि सदृश वरानें ती दिसे शोभमाना,
रघुसुतयुतकन्ये घेउनी भोजभूप,
मग निजनगराच्या पातला तो समीप. १

[व.ति.] राजे दुजे दिनमुखीं ग्रह तेंवि झाले
निस्तेज, तेहि अपुल्या शिबिरास गेले,
पावोनि भूपतनयेविषयीं निराशा,
धिक्कारिती बहुमनीं निजरूपवेशा. २

[शि.] शची होती तेथें निकट ह्मणुनी कार्य तिथलें,
अनर्थावांचोनी सहज सगळें पार पडलें;
अजद्वेषी राजे असति, तरि त्यांनीं गडबड
नसे कांहीं केली, मनिंच करिती ते बडबड. ३

[शा.वि.] जेथें सुंदर रंगवल्लि लिहिल्या, पुष्पें मृदू टाकिलीं,
इंद्राच्या धनुसारिखी रुचि असीं सत्तोरणें बांधिलीं;
उत्तुंगध्वज तेथ जे उभविले, तीहीं न बाधे उन,
ऐशा शोभन राजमार्गें नवरा तैं ठेपला येउन. ४

सोन्याच्या खिडक्या जयास असती, त्या उन्नतीं मंदिरीं
होत्या कार्यपरायणा स्थित तईं पौरांगना सुंदरी;
आला जैं नवरा समीप तंव त्या पाहावया धांवती,
कांहीं काम सुचे न, अन्य परिहो झाली स्थिती यारिती. ५

कोणी एक वधू वरास उठली पाहावयाला त्वरें,
वेणींतील फुलें गळोनि पडलीं, जैं तूटला दोर रे,

---

१ षडाननानें. २ देवांचें सैन्य. ३ आपल्या जोग्या. ४ इंदुमती. ५ अजानें युक्त अशा कन्येस. ६ आपल्या रूपाला व वेषाला ( धिक्कारिती ). ७ विवाहाच्या आरंभीं वाग्दानसमयीं पुढें होणारें मंगलकार्य निर्विघ्न पार पडावें ह्मणून कन्येचा पिता इत्यादिक शचीनामक देवतेची स्थापना करून पूजा करीत असतो या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. ८ ज्या मार्गांत. ९ कांती. १० सूर्याचें ऊन.

हस्तामाजि तसेच केंस धरुनी वातायनीं[1] पातली,
बांधाया बुचडा तिला न सुचलें, ऐसी गती जाहली. ६

लाखेचा रस पावला धरुनियां लावीत होती सखी,
तों ओढूनि पदास कोणि युवती होवोनि हर्षोन्मुखी;
गेली धांवत ती वरास बघण्यासाठीं अति व्यग्रधी,
तो ओला अलिता पथीं उमटला तेथें गवाक्षावधी[2]. ७

होती एक वधू घरांत बसली, घालावया अंजना[3],
घाली दक्षिणलोचनीं, मग दुज्या घालूं करी योजना;
तों दारीं वर पातला, ध्वनि तई त्याचा तिनें ऐकुनी,
एके हातिं शलाकिका[4], तसिच ये धांवोनि वातायनीं. ८

पाहायास वरास कोणि खिडकीपाशीं त्वरें अंगना
गेली, तैं फिटलें स्ववस्त्र असडा बैसोनि तद्बंधना;
हस्तीं घेउनियां निऱ्यां वर धरी तों नाभिपद्मावरी,
कांती तत्करकंकणस्थ[5] मणिची शोभे बहू साजरी. ९

अर्धीमुर्धिंच गुंफिलीं, न सुदृढें[6], रत्नें अशी कांचि ती.
एकीची, उठुनी त्वरें प्रतिपदीं [7]ती चालतां सांडती;
अंतीं केवळ अंगठ्यास पदिंचे गुंतून राहे सुत,
ऐसी दर्शनसंभ्रमें[8] युवतिची चेष्टा घडे अद्भुत. १०

कांतांचीं वदनें प्रसन्न, नयनें चापल्ययुक्तें वरी
भृंगीचेपरि तीं, सुवास मधुचा येई मुखाभ्यंतरीं;
जैं वातायनिं कौतुकें शिरविती त्यांनां[9] वधू संभ्रमें,
हीं पद्मेंचि अरंध्रें[10] एथ रचिलीं ऐसें जनाला [11]गमें. ११

दृष्टचा प्राशिति, त्या यथेष्ट हि अजा नारी पुरींच्या तया,
तेव्हां सोडूनि त्यास, अन्यविषया जाती न भोगावया;

---

१ खिडकींत. २ खिडकीपर्यंत. ३ काजळा. ४ सळई. ५ त्यांच्या करांतील कांकणाचे मण्यांची. ६ घळकट बसविलीं नव्हतीं. ७ स्त्री. ८ पाहण्याच्या गर्दीनें. ९ मुखांनां. १० दाट. ११ ( खिडक्यांतून स्त्रियांच्या प्रसन्न मुखांची दाटी झाली तेव्हां तीं कमळेंच एकावर एक दाट रचलीं आहेत असें वाटलें कारण त्यांस मधूचा सुवास येत होतां व भ्रमरीप्रमाणें चंचळ नेत्रें त्यांवर शोभत होतीं ).

यासाठीं इतरेंद्रियव्रज तईं एकेचि तल्लोचनीं,
झाला लीन खरा असेंचि गमलें तेव्हां जनाच्या मनीं. १२
"राजांनीं बहुतीं दुरून तिजला होतें जरी याचिलें,
तीनें पाहुनि हा समक्ष वरिला, केलें बहू चांगलें!
लक्ष्मीनेंहि[१] असा स्वतांचि वरिला विष्णू बघूनी पुरा,
ऐसी ती करिती नें, केंवि मिळता व्हावा तसा नोवरा?[२] १३
[इं.व.] रूपें गुणें ही द्वय हें समान, होता न याचा जरि योग जाण,
निर्मून यांतें श्रम धातयाचे[३], जाते तईं सर्व वृथा तयाचे. १४
[शा.वि.] हे जन्मास अले रतिस्मर[४] खरे! कांकीं, हिनें शोधुनी,
या आत्मानुगुणा अजास वरिलें लाखो नृपाळांतुनी;
जो अन्योन्यसमागमक्रम नरा जन्मांतरींही घडे,
त्याचें ज्ञान समस्त इंद्रियगणीं होतें मनां रोकडें."[५] १५
[मं.क्रां.] ऐशा कर्णप्रिय पुरवधूप्रोक्त संभाषणाला,
जांवाई तैं परिसतचि ये सासऱ्याच्या घराला;
शोभाशाली रचुन अवघे मंगलाचे पदार्थ,
जेथें ठेवी परमकुतुकी भोजराजा समर्थ. १६
[शा.वि.] खालीं हत्तिणिचे[६] वरोनि उतरे तो[७] कामरूपेश्वरीं
देवोनी कर, तों विदर्भ नृपती आला पुढें सत्वरी,[८]
त्यानें दाखविल्या पथें हळुहळू चौकांत ये आंतल्या,
नारीच्याहि मनांत तेंवि तंव ज्या तेथें स्वयें पातल्या.[९] १७
[इं.व.] सिंहासनीं स्वर्णमयीं तयाला, नेवोनियां बैसविलें अजाला,
रत्नासवें गंधफुलें जयांत, नृपें असें अर्घ्य दिलें करांत;
[उ.जा.] त्यानंतरें तो मधुपर्क दिव्य, तसें दुकूलद्वय देइ भव्य,
स्वीकारिलें सर्वहि तें अजानें, कांताकटाक्षासमवेत त्यानें. १८

---

१ समुद्रांतून लक्ष्मी निघाली तिनें जसा विष्णू निवडून वरला तसा हिनेंही हा वर स्वतां पाहून वरला असा भाव. २ असें न करिती तर व्हावा तसा नवरा कसा मिळता असा अन्वय. ३ ब्रह्मदेवाचे. ४ रति व काम. ५ पुरांतल्या स्त्रियांनीं उक्त. ६ राजे लोक जांवयास लग्नाकरितां हत्तिणीवर बसवून मिरवत आणीत असत. ७ अज. ८ कामरूप राजावर हात ठेवून हत्तिणीवरून खालीं उतरे तों विदर्भ राजा पुढें आला असा अन्वय. ९ ही सहोक्ति अलंकार होय.

[शा.वि.] नेसोनी शुचिवास, राजसुत तो कामापरी शोभला,
तैं अंतःपुररक्षकीं सविनयीं कन्येकडे आणिला;
चंद्राचे किरणीं सफेनजलधी मर्यादवेलीकडे,
जैसा नेईजतो, तशाच रिति ही गोष्टी अजाची घडे. १९

तेथें भोजपुरोहित श्रुतमती तेजस्वि अग्नीपरी,
त्याचें पूजन या सुतें रघुचिया केलें सुखाचे भरीं;
तेव्हां त्याहि पुरोहितें यजियलें वन्हीस आज्यादिकें,
केलें लग्न तदग्निसाक्षिक तयां दोघांजणांचें निकें. २०

हस्तें हस्त तिचा धरोनि अज तें पूर्वींहुनी शोभला,
त्याला योग्य असा रसालतरुचा दृष्टांत वाटे मला;
ज्याच्या सन्निकटीं अशोकलतिका संबद्धही त्या असे,
तीचे पल्लव तद्दला झगटतां शोभा विशेषा दिसे. २१

कांटा दाट अजाचिया मणगटा तेव्हां उभा राहिला,
स्निग्ध स्वेदहि येइ इंदुमतिच्या दिव्यांगुलीला भला;
ऐसा सात्विकभाव रम्यमदनें वांटून दोघांमधीं
यावेळीं दिधला, अशा करिति तें तर्कास गंभीरधी. २२

अन्योन्यास पहावयास उभयां वाटे मनीं लालसा,
तैं चोरून हळूच यत्न करिती, पाहावयाला जसा;
दृष्टादृष्टि घडे, तंई विरमुनी खालीं बघूं लागती,
संकोचें रमणीय फारचि दिसे तल्लोचनांची स्थिती. २३

कुंडीं अग्नि सुदीप्त होउनि वरी ज्वाला महा चालली,
जेव्हां तीं उभयें प्रदक्षिणविधी त्याला करूं लागलीं;
मेरूच्या निकटीं क्रमें दिननिशा संगें जशीं चालती,
तैसीं दिव्य वधूवरें सुरुचिरें काळीं तया शोभती. २४

१ शुद्ध वस्त्र. २ विनययुक्तीं. ३ हा कर्मणि प्रयोग, यांत कर्ता चंद्रकिरणीं हा. ४ त्या अग्नीच्या साक्षीनें. ५ आम्रवृक्षाचा. ६ गंभीरबुद्धीचे लोक. ७ मेरु पर्वताला सूर्य प्रदक्षिणा घालितो तेव्हां सूर्य असतो त्या भागाला दिवस व त्याचे मागचे भागाला रात्री असते तशीं हीं वधूवरें एकामागें एक शोभूं लागलीं, एथें मेरूप्रमाणें अग्नि व रात्रीदिवसांप्रमाणें वधूवरें होत.

[उ.जा.] नितंबगुर्वी सुचकोरनेत्री, लज्जावती आणि मनोज्ञगात्री,
आज्ञेवरोनी गुरुच्या सुकांती, अग्नींत लाजांजलिला त्यजी ती.२५

[शा.वि.] धूमाचा बहुपुण्य अग्निमधुनी लोंढा वरी चालिला,
ज्याला शोभन गंध दग्धहविचा मोठा असे लागला;
गालाच्या भंवतीहि इंदुमतिच्या तो जैं असे लागुनी,
कर्णीं कैरव ठेविलें क्षणभरी, भासे जनाला मनीं. २६

आले नेत्र भरोनि फार उदकें काळे बहू काजळें,
कानीं खोवियले यवांकुरहि जे ते म्लानता पावले;
आदर्शापरि गाल निर्मळ तरी ते जाहले धूसर,
चर्या यापरि होय इंदुमतिची लागोनि तीतें धुर. २७

[वं.] वधूवरें बैसलिं कांचनासनीं, त्यां स्नातक क्षोणिपती सुवासिनी,
आर्द्राक्षतारोपण ते अनुक्रमें, करीति त्या दंपतिला सुसंभ्रमें. २८

[व.ति.] ऐसा विवाहविधि साधुनि भोजराजें,
आले स्वयंवरनिमित्त नृपाळ जे जे,
त्यांचेंहि पूजन पृथक् निजसेवकांतें
आज्ञापुनी करि, करोनि महाव्ययातें. २९

[शा.वि.] पोटीं नक्र तरी, प्रसन्न वरती, ऐशा ऱ्हदाचेपरी,
क्रोधा दाबुनि, आंत मित्रपण तें दावोनि त्यांनीं वरी;
सत्कारग्रहणा करोनि, उपदाव्याजें तया मागुती
देवोनी पुसुनी तयास निघती ते जावया भूपती. ३०

[स्र.] "सारोनी लग्न सारें, परतुनि रघुचा पुत्र येईल जेव्हां,
कांता घेऊं हरोनी, सकळहि मिळुनी, ठोकुनी त्यास तेव्हां;"
ऐसा संकेत आधीं ठरउनि, मग ते सर्वभूपालयोध
सिद्धा सेना करोनी, करिति सकल ते तेधवां मार्गरोध. ३१

[शा.वि.] सांगोपांग विवाहकृत्य इकडे झाल्यावरी रीतिनें,
भोजानें निजशक्ति लक्षुनि दिलीं लक्षावधी आंदणें;
जामात्यास वधूसह क्षितिपती तो धाडिता जाहला,

१ लोट. २ जळालेल्या (हविचा). ३ धूर. ४ सुवर्णासनीं. ५ गृहस्थविशेष. ६ भोजराजा. ७ पतिपुत्रवती स्त्रिया.

स्वस्थानाप्रति, तें स्वतांहि नृपती त्या बोळवूं चालला. ३२

[स्र.] त्रैलोक्यख्यातकीर्ती[1] रघुसुत, रिपुला जाळि ज्याचा प्रताप,
तत्संगें तीन रात्री वसुनि मग फिरे कुंडिनेशाचा[2] महीप;
दर्शाचें पर्व गेल्यावरि हळुहळु तो चंडभानूस[3] लोकीं
सोडोनी दूर जातो, तुहिनकर[4] तशी गोष्ट हेही विलोकीं. ३३

[शा.वि.] पूर्वी दिग्विजयीं हरोनि रघुनें नेली स्वयें संपदा
भूपांची अवघ्याहि सर्व, ह्मणुनी त्यां कोप आला तदा;
त्याचा पुत्र अज स्वतांहि हरुनी स्त्रीरत्न कीं नेतसे,
हें साहे न, ह्मणूनि भूप अवघे एकत्र झाले असे. ३४

[व.ति.] पूर्वी त्रिविक्रमपदीं[5] बहु संभ्रमानें,
श्री अर्पिली हि बलीनें अपुले करानें,
प्रल्हाद त्यास अडवी, नृप हे तसे रे,
नेतां वधूस अज, रोधिति त्यास सारे. ३५

[स्र.] मंत्री मोठा पित्याचा चतुर बहु तयापाशिं ठेवून सेना,
कांतेच्या रक्षणाला अज झटकरि ये, भेटण्या वैरियांना;
क्षुब्धा भागीरथीचा अतिजवन असा ओघ चाले महा तो,
त्याला शोणाभिधान प्रथित नद जसा आडवा शीघ्र येतो. ३६

स्वाराशीं स्वार तैसे, करिवर करिशीं, भांडती थोर वेगें,
पैत्तीशीं[6] पादगामी मिसळुनि, वहिले हाणिती शस्त्रयोगें;
अन्योन्याचे समोर प्रबलतर रथी धांवुनी भीडती ते,
तुल्याशीं तुल्य ऐसे, निरखुनि करिते जाहले संयुगातें[7]. ३७

[शा.वि.] गंभीरध्वनि वाजती रणतुरें, तद्घोरघोषामुळें,

---

१ त्रैलोक्यांत प्रसिद्ध ज्याची कीर्ति असा ( रघुसुत ). २ भोजराजा. ३ सूर्यास. ४ चंद्र. ५ बलि नामक दैत्यानें इंद्रपदप्राप्त्यर्थ शंभरावा यज्ञ आरंभिला असतां विष्णूनें वामन अवतार घेऊन त्याजपाशीं त्रिपाद भूमी मागीतल्यावरून त्यानें हातावर उदक घातलें तेव्हां विष्णूनें मोठा देह केला त्यास त्रिविक्रम म्हणतात त्याच्या तिसऱ्या पायास जागा मिळेना म्हणून तो त्यानें बलीच्या मस्तकीं ठेवून त्यास पाताळीं घातलें त्यावेळेस प्रल्हादानें त्या त्रिविक्रमपादास आडविलें या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. ६ पायदळाशीं पायदळ. ७ युद्धातें.

ऐकायास न शब्द येइ, ह्मणुनी कोणी न तें चावळे,
हा कोण क्षितिपाल हें तरि शरीं टंकांकनींच्या वशें,
होतें मुद्रित तें नृपांस, सहजें पाहूनि बाणा दिसे. ३८

घोड्यांचे खुर आपटोनि सहसा धूळी रणीं ऊठली,
वेगें स्यंदन धांवती ह्मणुनियां मध्यंतरीं दाटली;
हत्तीचे श्रुतिताल लागुनि, नभीं अत्यंत विस्तारली,
ती अंतःपटसी बनून, रविला आच्छादिती जाहली. ३९

वायू लागुनियां, विदीर्ण सहसा होती मुखें जीं निज,
तींही ओढुनि घेति थोर धुरळा मत्स्याकृतीचे ध्वज,
ग्रीष्मांतीं पडती जळें गढुळ तीं, त्यां प्राशिताती जसे
मोठाले परमार्थमत्स्य, तसली शोभा ययांची दिसे. ४०

[शि.] रथांगांच्या नादावरुनि मनि ये कीं रथ भला,
महा घंटाघोषावरुनि समजे हत्ति उगला,
स्वभर्त्यांच्या नांवा परिसुनि कळे योधहि तसा,
दिसेना तें कांहीं, बहुत धुरळा दाटुनि असा. ४१

[शा.] नेत्रा बाधी धूलिरूपांधकार, तेव्हां घोडे हत्ति धानुष्क वीर,
यांचीं रक्तें वाहती शस्त्रघातें, तीं बालार्कस्थानि झालीं तयातें. ४२

[शा.वि.] रक्तानें भिजुनी, दबून बसलीं सारीं रजें खालचीं,
तेव्हां जीं उरलीं वरी तदुपरी ही कल्पना बुद्धिची,
जें भूमीवरि लालशोणित गमे निर्धूम अंगार तो,
धूळी जी वर तोच धूर पहिला व्योमास जो व्यापि तो. ४३

[स्र.] मूर्छेनें व्याप्त होतां, फिरवुनि रथ ज्यां सारथी दूर नेती,
मूर्छा जातांचि सूताप्रति बहुविध ते शूर तें दोष देती;

---

१ बोले. २ हा राजा कोण हें. ३ बाणावर. ४ टांकीनें खोदल्यावरून. ५ बाणांस पाहून तें (हा नृपाळ कोण हें दिसे असा अन्वय). ६ कर्णताल. ७ खरे मासे. ८ चाकांच्या. ९ बाल सूर्याचा उदय झाला म्हणजे अंधकार दूर होतो तसें एथें रक्तानें धूळ भिजून नाहींसी झाली म्हणून धूलीरूप अंधकाराला रक्त हें बालार्कस्थानीं झालें असा भाव. १० धूलीरूप अंधकाराला. रक्त हेंच लालनिखारे व वर जो धुरळा तो त्याचा धूर असा भाव.

पूर्वी जींहीं हणीलें, वळखुनि मग त्यां केतुचिन्हावरोनी,
क्रोधावेशें तयांच्या वरि हणिति बळें धांवुनी आयुधांनीं. ४४
ओढोनी कर्णमूलावधि, शरगण जे टाकिले योधवर्गी,
ते येतांना, स्वबाणीं सबळ रिपुगणीं तोडिले अर्धमार्गी;
तत्रापी अग्रखंडें अणकुचिसहितें पूर्ववेगानुसार,
जावोनी योजिलेलें स्थळ बिनचुक तीं वेधिती आरपार. ४५
[स्र.] हत्तीचें युद्ध चाले जंव अतिनिशितीं चक्रधाराव्रजांनीं,
वेगें आधोरणांचीं बहु शिरकमळें कापिलीं युध्यमानीं,
श्येनाच्या तें नखीं तत्कच अटकुनियां राहती गुंतुनी तीं,
यासाठीं मस्तकें हो लवकरि नचि तीं तेथुनी खालिं येती. ४६
स्वाराला स्वार मारी, तंव जरि बसला थोर आघात त्यातें,
मूर्छा येवोनि घोड्यावरिच पडतसे टेंकुनी मस्तकातें,
मूर्छावस्था असे जों तंवर नचि हणी मागुती स्वीय शस्त्र
त्याला आद्यप्रहर्ता स्मरुनि मनिं मनुप्रोक्त सन्नीतिशास्त्र. ४७
[शा.वि.] देहीं निस्पृह वीर वर्मधर जे तत्खड्गवेगें पहा,
कोशांतूनि निघूनि आपटति तें दंतीं गजांच्या महा,
तेणें अग्नि पडे, विलोकुनि जया घेवोनि हत्ती भया,
शुंडेनें जलबिंदुतें उडवुनी ते वीझवीती तया. ४८
बाणीं तोडियलीं शिरेंचि दिसती जेथें फळें चांगलीं,
डोक्यांच्या पगड्या तुटून पडल्या तीं पानपात्रें भलीं,
*वाहे शोणित तेंचि मद्य गमलें, या हेतुनें केवळ
शोभे तें रंण मृत्युचें तंव जणूं विस्तीर्ण पानस्थळ. ४९
बाहूचा तुकडा तुटोनि पडला त्याच्या तईं बाजुला,
चोंची मारिति पक्षि त्यां हुसकुनी कोल्ही धरी त्याजला,

१ अग्रखंडें. २ चक्रधारासमुदायांनीं. ३ माहूतांचीं. ४ युद्ध करणारांनीं. ५ सामनेवाला बेसावध आहे तर त्यावर वार करूं नये असें जें मनूक्त चांगलें नीतिशास्त्र तें मनीं स्मरून न हणी असा अर्थ. ६ बाणांच्या योगानें (तोडियलीं अशीं शिरें). ७ मस्तकें. * "वाहे शोणित तेंचि मद्य गमलें या हेतुनें ओखटें, भासे तें रण मृत्युचें सकलिका दारू पिण्याचें पिठें" असें पाठांतर. ८ रणभूमी. ९ मद्यपान करण्याची जागा.

लागे खाउं, तदंगदाग्र खुपलें तीच्या मृदू ताळुला,
त्रासोनी पिशितप्रिया तरिहि ती फेंकी दुरी त्याजला. ५०
खड्गानें शिर कापिलें स्वरिपुनें, तैं तो विमानीं बसे,
वामांकावरि ज्याचिया सुरुचिरा देवांगनाही असे;
ऐसा तो अतिहर्षनिर्भरमना पाहे रणाच्या कडे,
तों त्याचाच कबंध नृत्य करितां त्याच्याच दृष्टी पडे, ५१

[व.ति.] दोघे रथी रथि बसोनि रणार्थ आले,
तैं सारथी पडुनि सारथि तेच झाले,
घोडे मरून पडले, तंव ते गदांस
घेवोनियां करिति शीघ्र महाहवास;

[भु.प.] गदा मोडतां बाहु युद्धा करीति, बहू दाविती युद्ध कौशल्यरीति,
असे एकमेकास मारून अंतीं, स्वयें स्वर्गतीलागिं दोघेहि जाती. ५२

[उ.जा.] परस्परां मारुनि शस्त्रयोगें, स्वर्गास गेले जरि वीर दोघे,
एके स्त्रियेचा तिथलेहि नाद लागोनि तेथें करिती विवाद. ५३

[शा.वि.] सेना दोनहि घोर युद्ध करिती, तैं जाहली हे स्थिती,
केव्हां एक हटे, दुजीहि दुसऱ्यावेळीं सरे मागुती;
पर्यायें पुढिले व मागिल असे वारे जईं लागती,
दोघी हाटविती महोर्मिच जशा त्या एकमेकीप्रती. ५४

[इं.व.] *सेना जरी शत्रुबळें पराजिता, अज स्वयें त्यासचि होय मारिता,
धूमा तृणांतोनि समीर लोटितो, जेथें तृणें तेथचि वन्हि धांवतो. ५५

[भु.प.] रथारूढ होतां निषंगीहि शूर, तनुत्राण आंगीं करीं चाप थोर,
असा वीर साऱ्या नृपांलागिं मागें, स्वयें एकटा हाटवी वीर्ययोगें;

---

१ त्याच्या बाहुभूषणाची अणी. २ मांस जिला आवडतें अशी तरी. ३ मस्तक तुटून गेलेलें धड. ४ मोठें युद्ध. ५ मोठाल्या लाटा.

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[शा.वि.] शत्रूचें बळ हाटवी अजबळा अत्यंतवेगें जरी,
मोठा शूर पराक्रमी अज तईं त्यालाच तो संहरी;
धूमाला जरि दूर सारित असे वायू तृणांतोनि हा,
राहे जेथ तृण प्रभूत शिरतो तेथेंच अग्नी महा. ५५

जसा यज्ञवाराहरूपी रमेश[1], महाकल्प[2]कालीन अंभोनिधीसें[3]
निवारीतसे एकला शक्तियोगें, तसा शूर हा शत्रुला सारि मागें.५६

[शा.वि.] शोभे दक्षिण हस्त तूणिवदनीं तो घालतां काढतां,
केव्हां बाण शरासनीं चढवितो, हें नादिसे पाहतां,
जे लागूनि सवेग ठार मरती तैं शत्रु भूमीपती,
ते सारे शर तों गमे जनमनां मौर्वीतुनी नीघती. ५७

दांतीं चावुनि ओंठ लाल दिसती क्रोधाचिया निर्भरीं,
भाळा[4]लागिं अढ्या पडूनि चढल्या तैं भोंवयाही वरी;
गर्भी हुंकृति शब्द चालत असे, ऐशीं शिरें तोडुनी,
कंठीं बाण हणोनि सर्व भरली तैंहीं[5] तईं मेदिनी. ५८

[शा.] साऱ्या सैन्या सर्वही शस्त्रभारा, घेवोनीयां भूपसंघात[6] सारा,
सर्वें यत्नें एकदाची अजाला, लक्षोनी तो हाणिता होय त्याला.५९

[शा.वि.] शस्त्रांनीं रिपुच्या समग्र रथ तों झाकून गेला असे,
त्याचें अग्र दिसे, ह्मणोनिच तईं जाणावया येतसे;
प्रातःकाल जसा बहू हिमवशें आच्छादुनी राहतो,
तेव्हां अल्परविप्रकाश बघुनी, तेणेंचि तो भासतो. ६०

[व.ति.] संमोहनाख्य रिपुमोहकर प्रसिद्ध,
जें दे प्रियंवद[7] समंत्रक अस्त्र शुद्ध,
आलस्यशून्य अज यासमयीं सवेग,
त्याचा करी रिपुवरी समरीं प्रयोग. ६१

[शा.] तेणें ऐसें प्रेरिलें अस्त्र जेव्हां, निद्रा आली सर्व सैन्यास तेव्हां,
तीच्या योगें मूर्छना त्यांस आली, शस्त्रें अस्त्रें हातचीं तें गळालीं;

---

१ विष्णूच्या दहा अवतारांपैकीं हा (वाराह अवतार) तिसरा होय. यासच 'यज्ञवराह' 'आदिवराह' असें ही म्हणतात. याचें मुख डुकराचें व देह मनुष्याचा वर्णिला आहे. हिरण्याक्षनामक दैत्य अत्यंत उन्मत्त होऊन त्यानें लोकांस बहुत पीडा दिली व पृथ्वीसही भार होऊन ती समुद्रांत बुडूं लागली; तेव्हां विष्णूनें हा वाराह अवतार घेऊन त्या दैत्यास मारून आपल्या दंताग्रानें पृथ्वीचा उद्धार करून तिला उचलून धरिलें अशी पुराणकथा आहे. तिजकडे या स्थलीं लक्ष्य आहे. २ कल्पांतींच्या. ३ समुद्रास. ४ भाल्यांत. ५ त्या शिरांनीं. ६ राजसमूह. ७ या नांवाचा गंधर्व.

स्तंभा योधे टेंकती तें ध्वजाच्या, झाल्या माना वांकड्या फार ज्यांच्या,
पागोटीं त्या बाजुच्या स्कंधि आलीं खालीं, ऐशी दुर्दशा थोर झाली. ६२

[शि.] प्रिया ज्याची घेई रुचिर रुचि त्या ओंष्ठि अज हा,
धरोनी शंखातें निजकरिं तईं वाजवि पहा;
स्वहस्तें जें संपादित यश जणूं मूर्त बघतां,
जना वाटे पीतो समरिं रघुचा पुत्र निरुता. ६३

पळाले जे पूर्वी वळखुनि तयांनीं ध्वनि तदा
धन्याचे शंखाचा, परतति मनीं पावुनि मुदा,
परिम्लानीं अंभोरुहगणिं जसें बिंब विलसे
विधूचें, निद्रिस्ता रिपुगणिं तसा तें अज दिसे. ६४

[शा.वि.] "हारीलें यशमात्र सर्व तुमचें पुत्रें रघूच्या स्वतां,
नाहीं जीवित नाशिलें, सदयता केली असी तत्त्वतां,"
रक्तानें भिजवोनि बाणवदनें तींहीं अजानें करें,
शत्रूच्या लिहिलीं ध्वजावरि अशीं तें सुंदरें अक्षरें. ६५

[स्र.] भाळीं धर्मांबुबिंदू अभिनव जमले फार योगें श्रमाचे,
पागोटें काढिल्यानें कच हि विखरले भोंवती मस्तकाचे,
बाहूला चाप शोभे लटकुनि, असला वीर तो तेथ आला,
जेथें भार्या भयार्ता बसलि, अज तिशीं तो करी भाषणाला. ६६

"टाकोनीयां भयातें सुतनु, निरखि या वैरियांतें खुशाल,
घेतील क्षिप्र यांचें शिशुहि हिसकुनी हस्तिचें शस्त्रजाल
ऐसें केलें जयानें, अससि करगता तूं तयाच्या, तुला गे
हट्टें हारूं पहाती नृप! नवल असें देखिलें काय सांगे." ६७

[शा.वि.] शत्रूपासुनियां विषाद तिजला झाला असे जो स्वतां,
जावोनी मुख रम्य फार दिसलें, चित्तांत ये स्वस्थता;
निश्वासें मलिनत्व येउनि पुन्हा नैर्मल्य जो पावला,
तो आदर्श तिच्या मुखाप्रति मला दृष्टांत वाटे भला. ६८

[भु.प्र.] तईं हर्ष पावे मनीं थोर राणी, तरी ती भिडेनें न बोलेचि वाणी,
सख्यांच्या मुखानें प्रशंसा तयाची, करी ती तईं होय ती राजयाची.

१ घामाच्या जळाचे बिंदू. २ नूतन. ३ स्त्रिये. ( हें संबोधन )

स्थली चांगली भीजली वृष्टियोगें, तरी मेघवृंदास केकाच सांगे,
तसा हर्ष तीच्या मना जाहलेला, सखीभाषणांनींच तो व्यक्त केला. ६९

[शा.वि.] ऐसें वामपदास ठेवुनि अजें भूमीपतींच्या शिरीं,
केली इंदुमती पराक्रमवशें तैं आपुली अंतुरी,
झाले रूक्ष रजें जिचे कच अशी ती ही जयश्रीच कीं,
मूर्ता इंदुमती स्वयें जनमना तैं भासलीसे निकी. ७०

[पृ.] वरास अज येई तों अधिच वृत्त बापा कळे,
सुतें नृपति जिंकुनी परिणिली सुकांता बळें;
"अजा बहुत धन्य बा, तनय योग्य होशी खरा,"
असें वदुनि त्याचिया फिरवि भूप पृष्ठीं करा;
कुटुंब निरवोनियां मग सुतास तो सत्वरी
त्यजोनि विषयस्पृहा नृपति मोक्षमार्गा धरी;
सुदक्ष सुत होय तैं कधि न सूर्यवंशी नृप,
गृहस्थपणिंच्या सुखाविषयिं होति हो लोलुप। ७१

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, सातवा बुधवरा हा सर्ग त्याचा पहा. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा अजपाणिग्रहणनामक सप्तम सर्ग समाप्त झाला असे.

---

## सर्ग आठवा.

श्लोक.

[व.ति.] होतें विवाहशुभकंकण जों हतांत,
तों त्याचिया अणिकही रघु दे करांत;
स्त्रीचे परी वसुमती सकळाहि तीं या

---

१ मयूरवाणी. २ बायको. ३ पुत्रास कुटुंब निरवून असा अन्वय. ४ पृथ्वी.

शोभे मनोज्ञ, जणु इंदुमती द्वितीया. १

[शा.वि.] जीसाठीं अति घातपात करिती लोकांत भूपात्मज,
ती पृथ्वी स्वयमेव ये, ह्मणुनि घे तीतें महात्मा अज,
भोगाची बहुवासना ह्मणुनिच स्वीकारिता जाहला
नोहे हें, परि आग्रहें स्वजनकें आज्ञापिलें त्याजला. २
केला तीर्थजलीं अजास गुरुनें राज्याभिषेक स्वतां,
तत्संगें पृथिवी तया अनुभवी, पावे बहू तुष्टता;
तेणें उच्छ्वसितें[1] बहूत तिजला आलीं तयांच्या वशें,
झालें आज कृतार्थ हेंच सुचवी, ऐसें जनाला दिसे. ३
त्याला तें गुरुनें अथर्वविधिनें[2] संस्कार केला नवा,
त्यायोगें रिपुला दुरासद[3] बहू तो जाहलासे युवा;
जैसा अग्निस वायुयोग घडतो, क्षात्रा[4] महोग्रा[5] अतां
तेजा येउनियां तसें मिसळलें हें ब्राह्म[6] तेज स्वतां. ४

[शि.] प्रजा या राजाला ह्मणति "नृप हा नाहिंच नवा,
परी पूर्वीचा हा नृपति रघु ये होउनि युवा[7]!"
न तो बापाची ती अपरिमित लक्ष्मीच अज घे,
परी शौर्यौदार्यादिक गुणहि तो घेइ अवघे. ५

[स्र.] *दोघांचा योग दोघां शुभकर घडुनी, फार शोभा अलीसे,
त्यामाजी एक जाणा, निजपद रघुचें नंदनें रम्य भासे;
तैसें तारुण्य मोठें नव बहु विलसे जें अजाच्या तनूला,

---

१ उदबृहणें. २ अथर्ववेदांत इष्टकार्यसिद्धीविषयीं मंत्रतंत्र विधि सांगितले आहेत त्या अन्वयें वसिष्ठानें या राजपुत्रासही त्या वेदाचा उपदेश केला. ३ दुर्धर्ष. ४ क्षत्रियसंबंधी ( तेजा ). ५ मोठ्या उग्र ( तेजा ). ६ ब्राह्मणसंबंधी ( तेजा ). ७ तरणा.

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[शा.वि.] दोघांचा शुभकारि योग घडुनी दोन्हीं बहू शोभलीं,
तीं हीं मी कथितों तुम्ही समजुनी घ्यावीं मनीं चांगलीं;
बापाचें सुसमृद्ध राज्यपद तें शोभे सुताच्या वशें,
तैसें यौवन जें सुतांगि, विनयें शोभा तयाला दिसे. ६

८ रघूच्या पदावर अज बसला ही एक गोष्ट; व अजाच्या तरुण देहास विनयाचा योग झालाही दुसरी गोष्ट; अशीं दोहींनीं दोन शोभलीं.

त्याला प्रत्यक्ष आतां अतिशय विनयांचा भला योग झाला. ६

[शा.वि.] उद्वेग क्षितिला न होउ सहसा तेव्हां अशा हेतुनें,
तीचा तो उपभोग भूप करिता झाला दयार्द्र मनें,
आणीली परिणोनि नूतन वधू भीती न तीच्या मनीं,
वाटो, यास्तव भोगितो बुध जसा अत्यंत संभाळुनी. ७
*प्रत्येकास गमे जनीं सकळ मी राजा बहू आवडे,
ऐसें प्रीतिपुरःसर क्षितिपती दे लक्ष्य सर्वांकडे;
येती अंबुधिला शतावधि नद्या सर्वांहि तो आदरी,
कोणाचीहि तिरस्कृती नचि करी, योचीहि तैसी परी. ८

[उ.जा.] न सौम्य भारी, नचि तीक्ष्ण भारी, मध्यस्थितीलागिंच अंगिकारी,
वायू बहू नम्र करी तरूंना, समूळ नाशीत नसे तयांना;
तैसाचि हा भूमिपती नृपांतें, तो पाववी केवळ नम्रतेतें,
समूळ त्यांचा न करी विनाश, त्यांची अशी येइ दया तयास.९

[भु.प्र.] नसे उद्धतत्वादि चित्ता विकार, स्वभावें धिमा फार होता कुमार,
ऋजुत्वें बहू चालवी कार्यभार, प्रधानादिकां आवडे तोचि फार.
असे एकला योग्य हा कार्यभारा, नको साह्य माझें अजा मत्कुमारा,
असें जाणुनीयां रघू तो विलोकी, धरी थोर वैराग्य चित्तीं विवेकी.
जसें मृत्युलोकीं तसें स्वर्गलोकीं, नसे एकही वस्तु नाशाविणें कीं,
ह्मणोनी रघू सोडि त्यालागिं देखा, धरोनी मनीं मुक्तिमार्गास एका.१०
जरा पातली देखुनीयां शरीरा, सुतीं सद्गुणीं स्थापुनी राज्यभारा,
स्वयें नेसुनी वल्कलातें स्वहस्तें त्यजोनी गृहा शीघ्र जावें वनातें.
दिलीपाचिया सर्वही वंशजांचा, असे हाच आचार विख्यात साचा,
तिथें संयमातें करोनी रहावें, तनुत्याग होतांच मोक्षास जावें. ११

[पृ.] वनाभिगमनोन्मुखा निरखुनी पित्या सत्वरी,
स्वमस्तकहि मौलिच्या सहित ठेवि पायांवरी,
ह्मणे, "मज अजी असें सदनिं एकल्या टाकुनी,
नकाचि गमना करूं अदय होउनीयां मनीं." १२

---

१ चतुर पुरुष. * "प्रत्येकास गमे, नृपास अवघ्यापेक्षांहि मी आवडे." असें पाठांतर. २ या अजाची.

[भु.प्र.] विलोकोनि अश्रू तया लोचनाचे, तसें बोलणें दीनवाणें तयाचें,
दया येउनी अंतरीं नंदनाची, त्यजी तेथुनी भूप वार्ता वनाची.
जसा टाकुनी एकदा कंचुकातें, न घेई तया सर्प लोकीं तयातें,
तसा राहिला आत्मजाचे समीप, न घे त्यागिल्या संपदेला महीप. १३

[व.ति.] संन्यास घेउनि रघू नगरासमीप,
बाहेर बांधुनि मठास वसे महीप,
पुत्रोपभोग्य सुनबाइ[2] रमेपरी ही,
सेवी जितेंद्रियगणा[3] निज सासऱ्या ही. १४

[शि.] शशी जातां अस्ताप्रति, उदय पावे जंव रवी,
अवस्था येते तैं विपुल गगनालागुनि नवी;
जुना राजा जातां नव नृपति सिंहासनिं बसे
कुलीं ह्या, तेणें हें कुलहि गगनाच्या परि दिसे. १५

[स्वा.] *एक भिक्षु[4] अणि एक नृपाळ, शोभती उभयतां बहुसाल,
नित्य मुक्ति फलदायक एक, भुक्तिदायक दुजा पथ देख;
दोन तेचि पथ भूवरि आले। या रिती विबुधिं तर्कित केलें. १६

[मा.] अजितरिपु[5] जिणाया मंत्रियाचे समेत,
बसुनि करि विचारा पुत्र तो बुद्धिमंत,
जनक[6] परपदाचा लाभ व्हावा ह्मणोनी,
विजनिं बसुनि राहे वेष्टिला योगियांनीं. १७

[भु.प्र.] जनीं येति मागावया न्याय जे जे, तयांसाठिं सिंहासनीं पुत्र राजे,
पिता धारणेसाठिं तेव्हां मनाच्या, बसे आसनीं नित्य शुद्धीं कुशांच्या[7]. १८

---

१ सापाची कांत तिला. २ रघूची सून ( अजाची बायको ). ३ ज्यानें इंद्रियगण जिंकला अशा ( सासऱ्या ).

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[पृ.] यती जनक शोभला, तनय जाहला भूपती,
विलोकुनि तयांप्रती जन मनीं असें कल्पिती;
" प्रवर्तक निवर्तक प्रकट मार्ग जे दोन रे,
जगांत अजि येउनी विलसताति ते हे खरे !" १६

४ संन्यासी. ( बाप रघु व पुत्र अज यांच्या गुणांची व आचरणांची तुलना कांहीं पद्यांनीं केली आहे ). ५ न जिंकिलेले वैरी. ६ बाप. ७ दर्भांच्या.

[व.ति.] दावोनियां भुजपराक्रम तें विशेष,
पुत्रें रणांत जिणिले रिपु ते अशेष,
अभ्यासुनी सतत योगविधीस तातें,
केलें स्ववश्य तंव पांचहि मारुतांतें. १९

[भु.प्र.] रिपूंच्या[1] कृतीच्या फळाचीच होळी करोनी बळें एक[2] तो त्यास जाळी,
दुजा[3] ज्ञानरूपी प्रदीप्तीं हुताशीं करी भस्म जाळूनियां कर्मराशी. २०

[व.ति.] तो संधिविग्रहमुखां[4] अज षड्गुणांतें,
पाहोनि तत्फल रिपूवरि योजि त्यांतें,
जो मृत्सुवर्ण समलेखि असा रघू तों,
सत्वादि प्राकृत[5] गुणां सबलां जिणी तो. २१

[वं.] घडोनि येई फलसिद्धि जोंवरी, न सोडि यत्नाप्रति एक तोंवरी,
साक्षात् घडे जोंवरि आत्मदर्शन, दुजा न सोडी तंव योगसाधन. २२

[शा.वि.] शत्रूंचा न घडो प्रसार ह्मणुनी पुत्र प्रयत्ना करी,
तैसी इंद्रियवृद्धि दुर्धर बहू तीतें पिता आवरी;
ऐशी भुक्ति[6] व मुक्ति यांजविषयीं आसक्त दोघेहि ते,
स्वस्वाभीष्ट फलाप्रती उभयतां तैं जाहले पावते[7]. २३

[भु.प्र.] कितीएक वर्षं सुताच्या दयेनें, अशीं काढुनी योगमार्गें रघूनें,
अविद्याकृता टाकुनी तो तमाला, स्वरूपा मिळोनी समाधिस्थ झाला. २४

[व.ति.] देहावसान कळलें रघुचें अजाला,
शोकाश्रुंचा नयनिं फारचि पूर आला,
तैं मेळवूनि यति पाहुनि भिक्षुधर्म[8],
केलें तदैव खननादिक[9] सर्व कर्म. २५

[शा.वि.] होती भक्ति विशेष त्यास जनकीं या येवढ्या हेतुनें,
केलें सर्वहि और्ध्वदेहिक तयें त्याचें प्रियें नंदनें,

---

१ शत्रूंचीं कृत्यें निष्फळ करी असें तात्पर्य. २ पुत्र. ३ पिता. ४ संधिविग्रह इत्यादि सहा गुण राजनीतींत सांगितले आहेत. ५ प्रकृतीसंबंधी. ६ अशी भुक्ती म्ह० भोग व मुक्ति म्ह० मोक्ष यांविषयीं अनुक्रमें दोघे आसक्त झाले. म्हणजे भोगाविषयीं पुत्र आसक्त व मुक्तीविषयीं पिता आसक्त झाला. ७ पावते जाहले असा अन्वय. ८ यतिधर्म. ९ पुरणें वगैरे.

योगाभ्यासपथें तनु त्यजुनि जे ब्रह्मीं मिळाले असे,
पुत्रापादित पिंडदानविधिची त्यांना अपेक्षा नसे. २६

[शा.] "झाला बापा,त्वत्पिता मुक्त आतां,तो शोकाला पात्र नोहेचि ताता,"
ऐसें तेथें जाणते जे मिळाले, त्यांनीं त्याचें तें समाधान केलें.

[इं.व.] तैं दुःखशोका त्यजुनी रघूचा, पुत्र स्वतां घेइ धनुष्य साचा,
कोणी प्रतिस्पर्धि न आपणातें, केलें असें त्यासमयीं जगातें. २७

[व.ति.] *क्षोणी तसी सुभग इंदुमती ययांनीं,
संपादिला अज पती बलशालि त्यांनीं,
ऐका तई प्रसवली बहु रत्नमाला,
तैसा इंदुजीस सुत वीरललाम झाला. २८
सूर्यापरी प्रखरकांति वपू जयाचें,
व्यापीहि जो दशक कीर्तिवशें दिशांचें,
ज्याचें असे दशरथ स्फुट नाम हें कीं,
जो रावणारिजनक श्रुत होय लोकीं. २९

[पृ.] ऋषी, अणिक देवता, पितरही, ऋणा यांचिया,
श्रुतें, सुयजनें, सुतें, सकल फेडि भूपाल यां;
असा अनृण होउनी अज विराजला फार तो,
खळ्यांतुनि सुटोनियां रवि जसा बहू शोभतो. ३०

[शा.वि.] आर्तांचें भय वारणार्थ विलसे ज्याचें वपूचें बळ,
विद्वत्सत्कृतिसाठिं अध्ययनही ज्याचें असे केवळ;
यासाठीं धनमात्र लावित असे अन्यार्थ ऐसें नसे,
त्याचे ते गुणही परार्थ अवघे होते बलादी असे. ३१

[मं.क्रां.] कोणे एके समयिं रघुचा पुत्र राज्यव्यवस्था
पुत्राधीना करुनि, मनिं घे कामिनीक्रीडनास्था,
भार्यासंगें निज उपवनीं, नंदनीं जेविं इंद्र

---

१ पुत्रानें केलेलें. * "क्षोणी अणीक धरणीपतिपुत्रि यांनीं." असें पाठांतर. यांत णींचा अनुप्रास साधतो. २ पृथ्वी. ३ इंदुमतीस. ४ वीरश्रेष्ठ असा. ५ तीक्ष्णकांति. ६ रामचंद्राचा बाप. ७ शास्त्राध्ययनानें (ऋषीचें ऋण). ८ यज्ञानें (देवऋण). ९ पुत्रोत्पादनानें (पितृऋण). १० या तिन्ही ऋणा फेडी असा अन्वय. ११ सूर्याभोंवतीं जो परिवेष कधीं कधीं दिसतो त्याला सूर्याचे खळें असें म्हणतात.

इंद्राणीशीं, करि अज तसा क्रीडनातें नरेंद्र. ३२

[शा.वि.] तेंव्हां दक्षिणसागरानिकट जें गोकर्ण नामें महा
क्षेत्र श्रेष्ठ तिथें अहर्निश वसे गौरीसवें कामहा;
त्याचें दर्शन घ्यावयास्तव दिनीं एके सुरर्षी स्वयें,
वीणावादनसक्तहस्त वरतीं आकाशपंथेंच ये. ३३

[व.ति.] माला सुदिव्यसुमनीं रचिता सुरेखा,
वीणेवरी मुनिचिया नव होति देखा,
"मातें तदीय अधिवास घडो" ह्मणोनी
जाणों समीर उडवी तिजला धरोनी. ३४
पुष्पानुसारि मधुपावलि वर्द्धकीला,
वेढी विलोकुनि जिला गमलें जनाला,
पाहोनि वायुकृतधिकृतिचे प्रकारा,
ती ढाळिते सतत सांजन बाष्पधारा. ३५

[शा.वि.] माला ती विमला सुगंधिबहुला शोभा लतांची महा,
हारी तैं ऋतुसंभवा अपुलिया सौगंध्ययोगें पहा,
उद्यानीं नृपकामिनी बसलिसे तीचे स्तनाग्रावरी,
आकाशांतुनि येउनी सजव ती खालीं पडे सत्वरी. ३६

[वै.] क्षणमात्र कुचावरी तिला, बघुनी सुंदरि होय विव्हला,
मरणाप्रति पावली त्वरें, तंव आश्चर्य जनां गमे खरें !
गिळितां विधु राहुनें जसी, दिसते निष्प्रभ चंद्रिका तसी,
दिसली नृपतिप्रिया मृता, न कळे कारण कांहि शोधितां. ३७

[वं.] *अचेतना होउनि राजसुंदरी, पतीस घेवोनि पडे धरेवरी,

---

१ शचीशीं सह नंदनवनीं इंद्र क्रीडा करितो तसें. २ गोकर्णक्षेत्र हें दक्षिणहिंदुस्थानाच्या दक्षिणभागांत महाप्रसिद्ध शिवक्षेत्र आहे. एथें माघमासीं महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरत असते. तेथें शिवाचें आत्मलिंग स्थापिलेलें आहे. ३ नारद. ४ वीणा वाजविण्यांत सक्त आहे हस्त ज्याचा असा (सुरर्षि). ५ हिचा योग घडोन सुगंधप्राप्ति व्हावी म्हणून. ६ वायु. ७ भ्रमरपंक्ति. ८ वीणेला. ९ अंजनयुक्त. १० अश्रू. ११ सवेग.

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[व.ति.] निश्चेष्ट शीघ्र पडतां पतिलाहि पाडी, दोघांचि ही तनु अशा रितिनें धडाडी,
तेलासवेंचि पडते जसि कां दिव्याची ज्योती सवेग पृथिवीतलिं एकदांची. ३८

तेलासवें ज्योत जसी दिव्याचि ती, सवेग येते वरतोनि खालतीं. ३८

[व.ति.] आक्रोश थोर करि सेवकवर्ग त्यांचा,
ऐकोनि दीर्घकरुणस्वर तैं तयांचा
हंसादिपक्षिगण ओरडती भयें ते,
जाणों ययांपरि तयांसहि दुःख होतें. ३९

[शा.वि.] झाली तैं व्यंजनादि साधनवशें मूर्छा अजाची दुरी,
राणी इंदुमती तसीच पडली निश्चेष्ट भूमीवरीं;
मर्त्याचें अवशिष्ट कांहिं असतें आयुष्य हो जोंवरी,
आशेनें उपचार लोक करिती ते चालती तोंवरी. ४०

[शा.] ताराहीना वैल्लकी होय जैसी, राणी भासे चेतनाशून्य तैसी,
अंकीं तीतें घे करांनीं नृवीर, ज्याच्या चित्तीं प्रेम राहे अपार. ४१

मृत्यूनें ती जाहलेली विरूप, अंकीं घेतां भासला तेंवि भूप,
फिक्की प्रातःकाळिं वैातायुलेखा अंकीं ज्याच्या तो शशी जेविं देखा. ४२

[शा.वि.] होता धीर तरी, अधीर बहु तो होवोनियां अंतरीं,
दाटे कंठ, तसाच भूमिपति तैं शोकें विलापा करी;
लोहाला कठिणाहि मार्दवचि दे जो ताप तो प्राणियां,
लोकामाजि मृदू करील, न असे आश्चर्य गोष्टींत या. ४३

"स्पर्शाला सुकुमार फार असती लोकांत जीं कां फुलें,
होतीं तींहि समर्थ जीवित हरायाला स्वकीयें बलें;
मारायास नरास निष्ठुर विधी चित्तीं धरी वासना,
सांगा हो, मग काय त्यास जगतीमाजी उणें साधना? ४४

किंवा जें मृदु होय त्यास मृदुनें मारीतसे अंतक,
ऐसा सर्व जगांत विश्रुत असे त्याचा बहू लौकिक;
भारी कोमल आणि शीतल असे लोकांमधें जें दंव,
तद्योगें नलिनी मरोनि पडते, हें जाणती मानव. ४५

माळा मारक होय, हेंहि ह्मणणें मिथ्याच वाटे मना,

---

१ विझण वारे वगैरेचे योगानें. २ ताराहित. ३ वीणा. ४ अज. ५ मृगलेखा.
६ एथून कांहीं पद्यांनीं अजाचा विलाप वर्णिला आहे.

कां कीं ठेवितसे उरीं, तरिहि ती कैसी मला मारिना ?
कोणाला विष तारितें, अमृतही कोणास मारीतसे,
तस्मात् मृत्युस हेतु एक मजला ती ईश्वरेच्छा दिसे ! ४६

किंवा दैवगती विरुद्ध ममही, सध्या नसे ती सुधी,
या हेतुस्तव वीज ही जणुं अतां निर्मी स्वबुध्या [1]विधी;
वृक्षाचा करितां न नाश अणुही स्वीयें [2]बलें संप्रती,
[4]तीनें पाडियली [3]तदाश्रित लता, मारोनियां खालती. ४७

केलें मी अपराध फार, तंवही केली न तूं हेलना !
आतां तों अपराध अल्पहि नसे हें ठाउकें त्वन्मना;
ऐसेंही असतां, न पात्र मम हा संभाषणाही असे !
ऐसें मानुनियां सखे मज, अजी मौना धरीलें कसें ? ४८

मी आहें शठ धूर्त वंचक, असें तूं ओळखूनी अतां,
झालीसी परलोकवासि, पुसल्यावांचून मातें स्वतां !
दुष्टाचें न मुखावलोकन पुन्हा होवो, असें चिंतुनी,
तेथोनी परतोनि येउंच नये, हें धारिलें कीं मनीं ! ४९

कांतेच्या सह जाइ जीव मम हा, ही गोष्ट झाली बरी,
तीतें सोडुनियां निघे परत तो, ही तों अयोग्या खरी;
धिग् जीवा ! करणें तुझें न बरवें वाटे मनीं शोधितां,
याचें दुःसह कष्टरूप फल हें बा भोगि तूं तत्वतां ! ५०

[वै.] सुरतश्रमजन्य घर्म हा, वदनीं सुंदरिच्या दिसे पहा !
परि ती तरि या क्षणीं असी, त्यजुनी सर्वहि झालि नाहिंसी !
[उ.जा.] पळामधें हा घडला प्रकार, हें पाहतां देह दिसे असार !
असे बहू भंगुर तत्स्थिती ते, देवा असो धिक्कृति जाण तीतें ! ५१

[शि.] मनेंही म्यां केलें कधिंहि न तुझें अप्रिय सये,
मला टाकायाची मति तंव मनीं कैंवि अजि ये ?
पति [5]क्षोणीचा मी परि वरिवरी प्रीति तिकडे,
खऱ्या प्रेमाचा तों भर सकल वाहे तुजकडे ! ५२

---

१ ब्रह्मा. २ विजेनें. ३ वृक्षाश्रित. ४ खालतीं पाडिली असा अन्वय. ५ क्षोणीकडे.

[शा.वि.] ज्या माजी भरलीं फुलें सुरुचिरें, जे नील भृंगापरी,
ज्यांचे पेड वळोनि सुंदर असी वेणी दिसे साजरी;
त्या केशांस समीर लागुनि सये ते हालती जैं अतां,
होतो भास मनास कीं जिव तुझा येतो जणूं मागुता ! ५३

कोणी एकलता हिमालयगता तेजास जी वागवी,
रात्रीं होउनियां प्रकाशित, तमा ती तेथ त्या घालवी,
तैसी सावध होउनी मम सखे, ऊठ स्वयें सुंदरी,
माझी ही विरहव्यथा सकलिका आतां करी गे दुरी. ५४

रात्रीचें मिटतें सरोज उदरीं ज्याच्या अली कोंडती,
ते शब्दा करिती न, तें दिसतसे त्याची जसी का स्थिती;
तैसें भाळ विशाळ युक्त अलकीं ऐसें तुझें जें मुख,
तें निःशब्द विलोकुनी मज गडे, वाटेल कैसें सुख ? ५५

चंद्राला रजनी पुन्हा मिळतसे, कोकांस कोकांगना,
त्यांचा सावधि तो वियोग ह्मणुनी सोसे तयांच्या मना;
आतां भेट तुझी अशक्य ह्मणुनी संताप जो हा असा,
होतो त्वद्विरहें, सखे, मज न तो जाळील कीं अग्निसा ? ५६

शय्या सुंदर पुष्पराजि रचिता ती ही खुपे हो जिला,
ऐसी शारदपूर्णचंद्रवदनें जीची तनू कोमला !
ती काष्ठीं घटिता भयंकर चिता दीप्ताग्निनें संयुता,
गे सोशील कशी सरोजनयने, सांगें अतां तत्वतां. ५७

[व.ति.] एकांतिची सहचरी तव मेखला ही,
तीही अतां मधुर शब्द करीत नाहीं !

---

१ कमल. २ भ्रमर. ३ कुटिल केशांनीं युक्त. ४ रात्री. ५ कोक असें चक्रवाक-पक्ष्याला म्हणतात. त्यांत पुरुष (नर) आणि स्त्री (मादी) यांचा रात्रीं वियोग असतो. त्यांची परस्परें प्रीति अत्यंत असते म्हणून त्यांस वियोगदुःख फार होतें. सूर्योदय झाला म्हणजे त्यांची परस्पर भेट होते अशी कविप्रसिद्धि आहे तिजकडे या स्थलीं "कोकास कोकांगना पुन्हा मिळतसे" या वाक्यांत लक्ष्य आहे. ६ ज्याला समाप्ति आहे असा (वियोग). ७ शरत्कालच्या पूर्णचंद्राप्रमाणें मुख जीचें (हें संबोधन). ८ कमलनयने (हें संबोधन).

याचेवरोनि मज हे करभोरु, भासे
कीं ती तुझ्याचि विरहें मृत जाहलीसे. ५८

तूं मंजुल स्वर दिला सखये, पिकास,
हंसीस मंदगति, दृष्टि चला मृगास,
वातें वनांत डुलती लतिका सुरेख,
त्यां हावभाव दिधले रमणीय देख. ५९

मातें घडो सुख ह्मणोनिच पाठिमागें,
ह्याह्या स्थलीं स्वगुण ठेवियले तुवां गे,
त्यांनीं मला सुखविजे, परि तेचि पाही,
आतां मदीय तनुची करिताति लाही! ६०

[शा.वि.] देखेही सहकार आणि फलिनी बागामधें संप्रती,
या दोघांस परस्परें सुचतुरे, त्वां कल्पिलीं दंपती;
त्यांचें मंगलकार्य हें न करितां गेलीस लोकांतरीं!
आहे हें करणें तुझें उचित कीं! सांगे मला सुंदरी. ६१

केला दोहद तूं अशोक तरुला, त्याला फुलें पातलीं,
होतीं सुंदर योग्य वेणिस तुझ्या जीं भूषणें चांगलीं;
झालीसी परलोकवासि सखये, या कारणानें असा,
तीं वाहूं तव पिंडदानसमयीं पिंडावरी गे कसा? ६२

ज्याचे नुपुर वाजती छुमछुमा ऐशा पदांचा मला
झाला अद्भुत लाभ, हें मनिं सये, हा आठवोनी भला;
पावे चंद्रमुखी अशोकविटपी शोकास तो अंतरीं,
पुष्पांचें मिष दाउनी करितसे ही बाष्पवृष्टी खरी. ६३

[शि.] तुझ्या श्वासा ऐसीं बकुलकुसुमें सौरभयुतें,
कराया तत्कांची अपण बसलों एथ निरुतें,
वदूं काई कांते! त्यजुनि तिस अर्धींच सुभगे,
अशी निद्रा घेशी, उचित तुज हें सांग मज गे! ६४

तुझ्या दुःखें दुःखी, तव सुखभरानें बहु सुखी,

---

१ आंबा. २ लताविशेष. ३ (हें संबोधन). ४ अशोकवृक्ष.

अशा तुझ्या संगें असति सखया जाण सुमुखी,
जसा शुक्लीं पक्षीं विधु सुभग वाढे प्रतिदिनीं,
तसा आहे तूझा तनय गुणशालीहि सदनीं,
तुला जें का वाटे प्रिय मजाहि वाटे प्रियचि तें,
मनीं दोघांच्याही रुचि अणुहि भिन्ना न वसते;
अशी सर्वांशानें स्थिति सकल सौख्यास्पद मनां,
असोनि हा कैसा हृदयिं धरिला निष्ठुरपणा! ६५

[शा.वि.]झाली ध्वस्त[1] रती, धृती[2]हि सकला अस्ताचला पावली,
संपे गायन, उत्सवींहि ऋतुच्या नाहीं रुचि राहिली;
तैसें कारण अल्पही न उरलें या भूषणांचें स्वतां,
शय्या शून्यचि जाहली मम अजी जी जाळिते पाहतां! ६६

तूं माझ्या असती धनीन घरची, मंत्री विचारांतली,
एकांतांतील मित्र, शिल्पकृतिची गे पट्ट शिष्या भली,
ऐसी तूं! तुजला दयारहित या दैवें बळें हारितां,
नेलें सर्वहि! काय शेष उरलें तें तूं वदे तत्वतां! ६७

काढोनी दयिते, मधु स्वमुखिचें तूतें मियां अर्पिलें,
तें प्राशोनिच संप्रती मन तुझें संतुष्ट कीं जाहलें;
त्या पानावर हें तिलोदक कसें स्वर्गीं रुचेल प्रिये?
झालें दूषित जें मृगांकवदने, उष्णाश्रुनीं माझिये. ६८

*मोठाले विषयोपभोग घडले मातें तुझ्या संगतीं,
उद्यानांत वसंतकालिं दयिते झाली यथेष्टा रती;
आहे वैभव तें, परंतु न असे वस्तू अजा मोहक,
झालें त्वद्विरहें असें गणितसे दुःखामधें हें सुख!" ६९

---

१ नष्ट. २ प्रीति. ३ धैर्य.

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

[शा.वि.] त्वत्संगें विषयोपभोग घडले नानापरीचे मला,
अद्यापी सखये, उणें न किमपी द्रव्यादिसंपत्तिला;
तत्रापी विरहें तुझ्या मम मना झालें महारोचक,
तेणें कांहि न आवडे, गणि सखे दुःखामधें हें सुख! ६९

ऐसें तो करुणस्वरें परिपरी बोलोनि कांतिप्रती,
उद्यानस्थ तरूंसही रडविता झाला तईं भूपती;
वाहे जो मकरंद फुल्ल कुसुमापासोनि त्यांखालतीं,
तद्रूपेंच तईं गमे, जनमना अश्रूच [1]ते ढाळिती. ७०

[स्र.] त्याचे मांडीवरोनी मग जसितसि ते ओढुनी बांधवांनीं,
मोठ्या दुःखें तयांनीं अग[2]रुतरुभवा इंधना मेळवोनी,
माळा [3]ती नारदाची अमर[4]सुमकृता अंत्यभूषाच झाली,
जीतें, ती राजपत्नी झटकरि अन[5]लामाजि तैं दग्ध केली. ७१

[शा.वि.] "कैसा हो नृप जाणता ह्मणवितो, हा बाइल्याची खरा!
जाते स्त्री नवऱ्यासवें, न कधिही स्त्रीच्यासवें नोवरा!"
ऐसें सर्वहि निंदितील ह्मणुनी, राणीसवें भूप या
गेला नाहिं चितेवरी, नचि तईं भेणें स्वमृत्यूचिया. ७२

तीच्या तैं दशवा[6]सराहुनि पुढें कर्तव्य साऱ्या क्रिया,
उद्यानींच सपिंडनांत विधिवत् केल्या नृपानें तया;
शास्त्रार्थज्ञ ह्मणोनियां करि महादानाहि भूम्यादिका,
मोठा खर्च करोनि होय नृप तो संपा[7]दिता लौकिकी. ७३

कांतिवांचुनि एकलाचि नगरीमाजी प्रवेशा करी,
तैं लोकां दिसला, दिसे विधु जसा गेल्यावरी शर्वरी[9];
बाष्पें पौरवधूमुखीं निरखुनी भूपास वाटे असें,
कीं जो शोक अपार होय मजला त्याचे उसासे जसे! ७४

होता यज्ञ करीत आश्रमि गुरू[10] त्याला समाधींत रे,
झालें ज्ञान तईंच कीं नृपतिची बागांत भार्या मरे;
तच्छोकातिशयें भ्रमिष्ठ नृपती झाला असें जाणुनी,
त्याला बोध करावयास चतुरा शिष्याला धाडी मुनी.
[उ.जा.] तपोवनांतूनि पुरांत येउनी, भूमीपतीची तंव भेट घेउनी,
वसिष्ठशिष्य श्रुतवान्[11] करीतसे, आर्ता[12] नृपाशीं तंव भाषणा असें. ७५

१ वृक्ष. २ अगरु नामक वृक्षाच्या इंधना. ३ पूर्वोक्त. ४ दिव्यपुष्पांची. ५ अग्नींत. ६ दाहा दिवसांहून ( पुढें ). ७ संपादिता होय असा अन्वय. ८ ( हें संपादिता होय याचें कर्म ). ९ रात्री. १० वसिष्ठ. ११ विद्वान्. १२ शोकाकुल झालेल्या.

[शा.वि.] "जें का मानसतापकारण तुला झाल असे निश्चित,
सारें योगबळें मदीयगुरुतें या जाहलें विश्रुत;
बोधाया तुजला समक्षच तिहीं येणें असे चांगलें,
ते आहेत परंतु संप्रति नृपा, यज्ञामधें गुंतले. ७६
तूं सद्वृत्त नृपा, तुझी विदित या आहे जनीं धीरता,
यासाठीं लघुसा निरोप गुरुनीं सांगीतला तत्वतां;
तो आतां तुजला प्रविष्ट करितों ऐकोनि घेई स्वयें,
तो चित्तांत धरोनियां नरपते, तूं चाल त्या अन्वयें. ७७
'पाताळ क्षिति आणि जाण तिसरा जो स्वर्ग, लोकीं[1] यया,
झालें, होत असे, अणीक पुढती होणार[2] जें कीं तया;
जाणायास समर्थ जाण असती [3]जे ज्ञानदृष्टया स्वयें,
यासाठींच जनांत जां[4]सें ह्मणती त्रैकालिकज्ञानिये. ७८
होता जो तृणबिंदुनामक मुनी विख्यात पृथ्वीवरी,
तो रात्रंदिन कष्ट भोगुनि तपश्चर्या सुघोरा करी;
साशंकें हृदयें सुरेंद्र हरिणी नामें तई अप्सरा,
भंगायास तपास त्या मुनिचिया, धाडी महा सुंदरा. ७९
जेव्हां ती मुनिच्या पुढें सुरवधू शृंगारचेष्टा करी,
हें तों विघ्न तपास जाणुनि, ऋषी क्रोधावुनी अंतरीं;
तूं होशील मनुष्य मृत्युभुवनीं उन्मत्त देवांगने,
शांती सोडुनियां तिला वदतसे शापास या रीतिनें. ८०
स्वामी मी परतंत्र, त्यांतहि असें स्त्रीजाति जन्मा[5]धमा,
झाला जो अपराध थोर मम हा, त्याची करा जी क्षमा !
या दीनें वचनें द्रवूनि, मुनि तो उच्छाप हा बोलिला,
कीं, जैं दिव्य फुलें विलोकिशिल तैं जाशील तूं स्वस्थला ८१
[इं.व.] जन्मोनि ती भोजकुळांत बापा, राणी सुरूपा तव होय भूपा;
पाहोनि आतां सुरपुष्पमाळा, ती अप्सरा गेलि निजस्थळाला ! ८२
[शा.वि.] गेली प्राणसखी कसी मम, विभो चित्तांत नाणी असें,

१ या तीनही लोकीं. २ भूतभविष्य वर्तमाना. ३ गुरूजी. ४ ज्या गुरूजींस. (त्रैकालिकज्ञानी असें म्हणती ). ५ जन्मानेंच नीच.

जन्मा जो नर येइ मृत्यु नियमें त्याच्या कपाळीं असे;
आतां तूं प्रतिपाळि योग्य रितिनें भूपा यया भूमितें,
भूमीनेंचि कलत्रवंत ह्मणती भूपांप्रती जाणते. ८३
संपत्तींतहि उद्धतत्व अगदीं होतें तुवां टाकिलें,
आत्मज्ञानहि शास्त्र पाहुनि तसें लोकांमधें दाविलें;
आतां प्राप्त असे विपत्ति तुजला या वेळि ही ज्ञान तें,
आहे जागृत, हें प्रकाशित करी दावोनि बा धीरतें ! ८४
मेल्यानेंहि न ती मिळेल मग बा कोठून या रोदनें,
जे मेले नचि ते पुनश्च मिळती कोण्याहि रे साधनें;
कर्मे भूवरि भिन्नभिन्न घडती यासाठिं जीवांप्रती,
मेल्यानंतरही पृथक् घडतसे कर्मानुसारी गती ! ८५
शोका सोडुनियां समाहित[1] नृपा, होवोनियां अंतरीं,
उद्देशूनि कुटुंबिनीस विहिता श्राद्धादि कर्मा करी;
कोणी संतत रोदनास करितां जे अश्रु ते ढाळिती,
ते प्रेताप्रति जाळितातिं नृपते, ऐसें स्मृती बोलती. ८६
जी लोकांत अचेतन स्थिति असे ती नित्य जाणे नृपा,
चैतन्य स्फुट तीस जें मिळतसे तें तो क्वचित् जाण पा;
यासाठीं क्षणमात्रही जरि घडे बा प्राणसंयोग हा,
मानी लाभचि, दीर्घ काळ घडतां नोहे कसा तो महा?[2] ८७.
इष्टाचा घडतां विनाश जगतीमाजी अडाणी नरें,
हें तों शल्यचि रोंविलें स्वहृदयीं हें मानिजे तें खरें;
ज्ञाते ते तरि या प्रसंगिं ह्मणती जें शल्य हो मूळचें,
तें जावोनि समूळ दार उघडें होतें स्वयें मुक्तिचें ! ८८
आत्मा आणिक देह दोन्हि असती प्रत्येक मर्त्यास रे,
त्यांचे योगवियोग उक्त असती शास्त्रामधें विस्तरें,
जे कां पुत्रकलत्ररूपविपय क्षोणीपते बाह्य ते,
शोका तद्विरहें कशास करिजे? सांगे नृपा, पंडितें. ८९

---

१ समाधान युक्त. २ (क्षणभर प्राणसंयोग घडतां जर लाभ आहे तर कांहा वर्षे घडतां महा लाभ नव्हे काय? असा अन्वय).

[पृ.] जितेंद्रिय नराग्रणी असिसि तूंचि बापा सुधी,
न शोक करि भूपते करिति कां जसे मूढधी !
तरु[१]क्षितिधरांमधें मग नसेचि बा अंतर,
समीर[२]वश होउनी पडति दोनही ते जर !' ९०

[शा.वि.] बोधाला गुरुच्या अशा परिसुनी ' हां जी, बहू उत्तम,'
ऐसें बोलुनियां निरोप मुनिला देई नृपाळोत्तम;
शोकानें भरल्या नृपाळहृदयीं त्याला[३] रिघावा नसे,
तोंही त्या मुनिच्यासवें परतला भासे मनाला असें. ९१

होता पुत्र लहान यास्तव नृपें तें आठ वर्षें असीं,
दुःखें घालविलीं सदैव दयिते चिंतोनियां मानसीं;
वस्तू तत्सदृशा, तशा प्रतिकृती, स्वप्नांत आलिंगनें,
तीचीं, तो नरपाळ काळ बहुधा कर्मी अशा साधनें. ९२

सौधाचाहि बळेंच भेद करितें जैसें वडाचें मुळ,
राजाचे उरिं शोकशल्य करि हो फोडोनि तैसें बिळ;
झाला रोग असाध्य जीवहर ही तेथें, तरी भूप हा,
स्त्रीचा सत्वर योगकारक असा त्या लाभ मानी महा ! ९३

झाला थोर कुमार शिक्षणहि त्या झालें बहू चांगलें,
देखोनी, निजराज्य भूमिपतिनें त्याच्यावरी सोंपिलें;
रोगार्ता तनुची नकोचि मजला ही संगती यावरी,
कंटाळोनि नृपाळ यापरि तई [४]प्रायोपवेशा करी. ९४

[व.ति.] भागीरथी व सरयू त[५]टिनी प्रसिद्ध,
[६]तत्संगमीं गति[७]द तीर्थ असे विशुद्ध,
तेथें तनु त्यजुनि निर्जर व्हावयाचें,
[८]आलेख्य तो मिळवि सत्वर भूप साचें.

[शा.वि.] स्वर्गी जाय नृपाळ तों स्वदयिता तेथें तया भेटली,
पूर्वीहूनि विशेष त्यास दिसली रूपें गुणें आगळी,

---

१ वृक्ष आणि पर्वत यांत. २ वायूच्या स्वाधीन. ३ त्या बोधाला. ४ प्राणत्यागार्थ अनशन व्रत. ५ नद्या. ६ त्यांच्या संगमांत. ७ सद्गती देणारें. ८ सनद, सर्टिफिकेट.

आनंदें रमणीय नंदनवनीं चेतोहरीं मंदिरीं,
भोगा भूपति भामिनीसहित त्या भोगी अनेकापरी. ९५

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, आठवा बुधवरा हा सर्ग त्याचा पहा. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा अजविलापनामक अष्टम सर्ग समाप्त झाला असे.

## सर्ग नववा.

### श्लोक.

[शा.वि.] बापानंतर तत्पदीं दशरथ क्षोणीपती जाहला,
ज्यानें इंद्रियवर्ग सर्वहि समाधीच्या बळें जिंकिला,
मोठा शांत व पालनीं चतुर हा ऐसी जयाची प्रथा,
शास्त्रीं शस्त्रगणीं प्रवीण, अयुतां वीरां रणीं जिंकिता. १

[भु.प्र.] प्रजा मानसीं होय तैं फार तुष्ट, नसे हो कधीं ज्यावरी कोणि रुष्ट;
असें राज्य तो चालवी सुस्वभाव, कुमारापरी स्तुत्य ज्याचा प्रभाव २

[शा.वि.] जे कोणी श्रमपूर्वक क्षितिवरी कर्में करीती नर,
त्यां संतुष्ट करावयास समर्थी दोघे सदा तत्पर,
त्यामाजी नृप एक हा दशरथ प्रख्यात दे जो धनां,
तैसा इंद्र दुजा सुवृष्टि करितो जो धाडुनीयां घनां. ३

[व.ति.] राज्या करी जंव अजात्मज बुद्धिमंत,
शांत स्वभाव सुरसा बहुकांतिकांत,

१ स्त्रीसहित. २ राजा. ३ ख्याती. ४ दहाहजार. ५ पडाननापरी. ६ इंद्र हा मेघांस पाठवून पृथ्वीवर पर्जन्यवृष्टी करितो अशी पुराणप्रसिद्धि आहे. ७ दशरथ. ८ देवासारिखा. ९ कांतीनें फार शोभायमान.

व्याधी न बाधि, मग कोठुनि शत्रुभीती,
पृथ्वी फला सुविपुला प्रसवे सदा ती. ४

[शा.वि.] झाला दिग्विजयी रघु क्षितिपती, त्याच्या पुढें तत्सुत,
वैरिव्रात जिणोनियां, क्षितितलीं झाला असे विश्रुत;
या दोघां नृपतीमुळें वसुमती पूर्वी जसी शोभली,
तैसा हाहि पराक्रमी पति मिळे एणें दिसे चांगली. ५

दुष्टां दंड करी, बहूत धन दे तो याचकांना तदा,
तेजाचा जणुं पुंज शोभत असे कांती जयाची सदा;
या हेतुस्तव काल, गुह्यकपती, तैसा तिजा भास्कर,
या देवांसम हा नृपाळ गणिला लोकांमधें भूवर. ६

कांतारीं मृगया, विधुप्रभ मधू, रूपान्विता अंगना,
अक्षक्रीडन जें भ्रमास करितें लोकीं नराच्या मनां,
ऐसीं हीं व्यसनें न वेध करिती भूपाचिया अंतरीं,
जो भाग्योदय होउ यास्तव सदा राजा प्रयत्ना करी. ७

* देवेंद्राशिहि दीनवाणि वदला नाहीं विपत्तींत ही,
मिथ्या वाक्य वदे न भूमिपति तो मोठ्या विनोदांत ही;
क्रोधानें रिपुलाहि ताडित नसे जो निष्ठुरें भाषणें,
ऐसें सत्य अदीन गोडहि असे ज्याचें सदा बोलणें. ८

[शा.] आज्ञाधारक जे नृपाळ असती, त्यांशीं करी मित्रता,
स्पर्धेतें करिती, तयांस यमसा झाला असे दंडिता;
ऐसे मित्र समस्त भूमिपतिचे उत्कृष्टता पावले,
तैसे शत्रुसमूह वैर करुनी पात्र क्षया जाहले. ९

[शा.वि.] हस्त्यश्वादि असंख्य सैन्य असतां तो एकला भूपती,

१ शत्रुसमूह. २ यम. ३ कुबेर. ४ सूर्य. ५ पृथ्वीवर. ६ रानांत. ७ चंद्राप्रमाणें पांढरें मद्य.

* अथवा (वरील अर्थाचाच दुसरा श्लोक)—

[व.ति.] मोठा समर्थ सुरनाथ तथापि त्याशीं,
भूमीपती न कृपणा करि भाषणाशीं,
खोटे न मस्करिमधेंहि वदे नृवीर,
बोले न कोपुनि रिपुसहि तो कठोर. ८

८. नाशास.

वैऱ्यां दावुनियां पराक्रम, रणीं जिकी समस्ता क्षिती;
"झाला हा अमुचा धनीच विजयी!" हें घोषणाचें पुढें,
राही कार्य चमूंकडे, ह्मणुनि ती तेव्हां करी तेवढें. १०

[इं.व.] तो एकला बैसुनियां महारथीं, क्षोणी जिणी वीर्यवशें महारथी,
गंभीर ज्यांचा ध्वनि जातसे नभीं, अब्धीच झाले जयघोषदुंदुभी. ११

[व.ति.] वज्रा धरोनि करिं पर्वतपक्षनाश,
जैसा करी नमुचिसूदन निर्जरेश;
तैसाचि हा दशरथ प्रभु वैरिपक्ष,
नाशी शरां हणुनियां कमलायताक्ष. १२

[शा.वि.] जैसी इंद्रपदाप्रती प्रतिदिनीं तीं दैवतें वंदिती,
याचेही चरणीं तसेचि अवघे राजे शिरा ठेविती;
तेव्हां तेथ चकाकती मुकुटिचे त्याच्या हिरे साजिरे,
त्यामाजी आणखीहि या नृपतिच्या कांती नखांची शिरे. १३

शत्रूंच्या विधवा स्त्रिया मिळुनियां, त्यांनीं मुलें आपुलीं
मंत्र्याच्या करवीं यया नृपतिच्या पायांवरी घातलीं,
आश्वासोनि तयांस सागर तटापासोनि भूमीपती,
येई तैं अलकेसमा स्वपुरिला सेनेसवें मागुती. १४

आलीसे जरि सार्वभौमपदवी श्रेष्ठा तयाच्या हतीं,
एकच्छत्र जरी करी पृथिविचें तो राज्य भूमीपती;
लक्ष्मी चंचळ शोधिते मिष सदा अन्यस्थळीं जावया,
ऐसें जाणुनि उद्यमा नृप करी आलस्य सोडोनियां,

[उ.जा.] आंगांत अग्नीपरि तेज वाहे, तथापि चंद्रापरि सौम्य राहे;
असा असे पंक्तिरथाख्य लोकीं, नसे तयाशीं सम अन्य लोकीं. १५

[व.ति.] या भूपतीस अणखी पुरुषोत्तमातें,
दोघां ययांसचि भजे जनि हो रमा ते,

---

१ सेनेकडे. २ चमू (तेवढें घोषणाचें कार्यमात्र करी). ३ (हें राजाचें विशेषण). ४ जयघोषाचे नगारे अब्धी म्हणजे समुद्रच झाले. ५ नमुचिदैत्यास मारणारा. ६ इंद्र. ७ कमलापरी दीर्घनेत्र ज्याचे. ८ अलकापुरीसारिख्या. ९ दशरथनामक. १० लक्ष्मी ही एक विष्णु व दुसरा उत्तम राजा या दोघांचेंच सेवन करिते या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे.

साध्वीस योग्यपति हेचि यथा वदान्य,
ऐसा नसे पुरुष या पृथिवींत अन्य. १६

[द्रु.वि.] मगधकेकयकोसलभूपती कुमरि यांस मनोहर आसती,
वरिति त्या नृपजांहि अजात्मजा, बहुत पावति तोष मनांत ज्या.

[उ.जा.] नद्या जशा पर्वतजा त्वरेनें, रत्नाकरा पावति आदरानें;
तैशाच या तीन नृपात्मजाही, त्या पावल्या तैं अजनंदनाही. १७

[शा.वि.] ऐसा ह्या युवतित्रयें सुरुचिरें शोभे बहू भूपती,
त्यांतें पाहुनियां कवीश्वर मनीं उत्प्रेक्षिती या रिती,
कीं आला मघवाचि हा क्षितिवरी घेवोनि शक्तित्रया,
दुष्टां दंडुनि वीर्यवान् नयपथें मर्त्यांस पाळावया. १८

[पृ.] रणीं करि सहायता क्षितिपती सुरेशांस हा,
सुरारिगण मारुनी हरि तदीय बाधा महा;
करोनि शरवृष्टिनें सुरवधूंस तैं निर्भया
सभेंत मनुजेश्वरें स्वयश लाविलें गावया. १९

[शा.वि.] आणी दिग्विजया करोनि अमिता संपच्चया मंदिरीं,
त्याचा तो विनियोग दीक्षितपणें यज्ञांत राजा करी;
त्यानें तैं सरयू तसीच तमसा यांच्या तटीं रोंविले
स्वर्णस्तंभ, जिहीं प्रदेश तिथले अत्युन्नतीं शोभले. २०

[द्रु.वि.] सरळ दंड, मृगाजिन, मेखळा, कुशमयी, मुखिं वाग्यम शोभला;
हरिणशृंगहि कंडुनिवारणा, असि नृपाळ तनू हरि ते मना.

[इं.व.] घे यज्ञदीक्षा नरपाळ साची, सामग्रि ऐसी विलसे नृपाची,
शोभे बहू तींत करी प्रवेश जैं अष्टमूर्ती भगवान् महेश. २१

---

१ लक्ष्मीला. २ मगधराजा केकयराजा व कोसलराजा. ३ राजकन्या. ४ दशरथाला. ५ नद्या ह्या पर्वताच्या कन्या आणि समुद्राच्या स्त्रिया होत असी कविप्रसिद्धि आहे म्हणून राजकन्यांस नद्यांची व दशरथास समुद्राची उपमा एथें सूचित केली आहे. ६ समुद्राप्रत. (रत्नाचा आकर हेंही साभिप्राय पद आहे). ७ दशरथास. ८ इंद्र. ९ कोश, दंड व प्रभाव ह्या तीन शक्तींस ( घेऊन ). १० इंद्र. ११ दैत्यसमुदाय. १२ दशरथें. १३ दर्भाची (मेखला). १४ दंडमृगाजिनादिकांनीं युक्त असी. १५ राजाच्या तनूंत. १६ शिवाच्या आठ मूर्ती वर्णिल्या आहेत त्या अशाः—१ पृथिवी, २ जल, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश. ६ सूर्य, ७ चंद्र, ८ यज्ञ करणारा. १७ शिव.

[शा.वि.] झाला तो पृथिवीपती अवभृथस्नानें विशुद्ध स्वयें,
जेणें योगबलें करोनि, जिंणिलीं होतीं समस्तेंद्रियें;
स्वर्गीं देवसभेंत योग्य बसण्या, ऐसा महात्मा खरा,
तो एका अमरेश्वरासचि नमी, अन्या न कोणा नरा! २२

वारंवार रणामधें नरपती धांवे सुरेशापुढें,
त्याचा स्यंदन धांवतां घडघडा मोठा धुरोळा उडे;
ये तो आड रवीचिया, तंव महा दैत्यांस मारोनि हा,
त्यांच्या रक्तवर्शेंचि नाशित असे ऐसा न योद्धा महा. २३

[द्रु.वि.] यमकुबेरजलेश सुरेश्वरा, सम जया गणिताति नरेश्वरा,
अभिनवीं कुसुमीं पुजण्या तया, जणुं वसंतचि ये समयीं यया. २४

[व.ति.] तों दक्षिणेकडुनि उत्तर दिक्‌प्रदेशा
जावें असें, गमतसे मनि त्या दिनेशा;
उष्णें प्रभातसमयीं हरि तो हिमाला
ने त्या दिशेस रविसूत तुरंगमाला. २५

आधीं फुलें मग नवीन दलें तरूला,
त्यानंतर भ्रमरकोकिलसंघ आला;
ऐशाक्रमेंचि रमणीय ऋतू वसंत,
होई तईं प्रकट तो गहना वनांत. २६

[शा.वि.] भूपें साधुहितार्थ या जमविली न्याय्यें पथें संपदा,
तीतें लक्षुनि याचकौघ मिळती तीभोंवतीं सर्वदा;
तैसे या ऋतुनें सुपुष्ट नलिनी पाहोनि तीतें सरीं,
तैं हंसभ्रमरादि पक्षि पडती येवोनि तीचे वरी. २७

[पृ.] वसंतऋतुमाजि त्या बहुत सौख्यदें जीं मना,
न केवल फुलेंच तीं करिति मन्मथोद्दीपना;
अशोकतरुचीं नवीं श्रवणिं घालिती कामिनी,
दलेंहि करिती बहू मद विलासियांचे मनीं. २८

---

१ यज्ञांतीं स्नान. २ इंद्र. ३ यम कुबेर वरुण इंद्र यांशीं तुल्य. ४ ज्या राजाला. ५ नूतनीं. ६ सूर्याला. ७ अरुण. ८ सरोवरांत. ९ सौख्यदेणारीं ( हें फुलांचें विशेषण ).

[शि ] वनश्रीचे भाळीं तिलक रचिले जेंवि मधुनें,
मरंदा देणारीं असि विलसती ज्यास सुमनें;
असे शोभाशाली कुरबकतरू दिव्य असती,
मिलिंदांच्या वृंदाप्रति बहुत वाचाळ करिती. २९

[शा.वि.] कांतों घेउनियां चुळास मधुच्या बुंधावरी टाकितां,
ज्याला सुंदर मद्यगंधि सुमनें आलीं वनीं तत्वतां;
तेव्हां तन्मकरंद लोलुप अशा झुंडी अलींच्या महा,
येवोनी बकुलाख्यवृक्ष अवघे व्यापूनि गेले पहा ! ३०

[पृ ] पलाश तरुला वनामधि वसंतलक्ष्मी भली,
तई अरुणवर्ण दे विपुल कुड्मलें चांगलीं;
असंकुचित मानसा मदवशा पतीला जशी
क्षतें नखवशें करी, सुभग दीसती हीं तशीं. ३१

[शा.वि.] कांतांचे अधरोष्ठ सक्षत तयां जें फार बाधा करी,
ज्याचा जोर विशेष यास्तव वधू कांची करीती दुरी;
ऐशा तीव्र हिमा समूळ हरण्या सामर्थ्य सूर्याचिया,
अंगीं तें नव्हतें, परी हळुहळू न्यूनत्व आणी तया. ३२

शोभाढ्या सहकारकोमललता वातें बहू कांपतां,
जाणों या शिकताति भाव करण्या, ऐसें गमे तत्वतां;
उद्यानीं कलिकाचयें सुविपुलें युक्ता बऱ्या डोलती,
कामक्रोधाहि जिंकिती नर, तयालागींहि त्या मोहिती. ३३

[पृ.] वसंतऋतु पातला तंव सुगंधशाली फुलें,
अलीं बहुत साजिरीं ह्मणुनि तें तरू शोभले,
वनीं प्रथम कोकिला करिति मुग्धनारीपरी,
मनोज्ञ मितभाषणा सुखवि जें जना अंतरीं. ३४

[इं.व.] बागांतल्या सुंदर वेलि देख, त्या नर्तकी भासति तें सुरेख,

१ वनसंबंधी लक्ष्मी. २ वसंतानें. ३ मकरंदा. ४ भ्रमरांच्या. ५ स्त्रियांनीं मद्याचा चूळ बुंधावर टाकिला म्हणजे बकुलवृक्षाला फुलें येतात अशी कविप्रसिद्धी आहे. ६ त्यांच्या मकरंदाविषयीं लोलुप. ७ मदांध झालेली स्त्री. ८ कुड्मलें. ९ हिमाला. १० आंब्याची कोमल लता. ११ लज्जावती तरुण स्त्रीचे परी.

आले तयां पल्लव जे नवीन, तें पाणियुग्म स्फुट होय जाण;
[उ.जा.] वातें हले जैं सुकुमार पाला, तो पाणिचा भाव गमे मनाला,
शिरीं तयांच्या अलिवृंद गाती, त्या रूपकीं ह्या गमताति गीती;
पुष्पें तयां जीं रमणीय होतीं, शोभे तयांची जणुं दंतकांती,
अशापरी रूपक नर्तकीचें, शोभे भलें वेधक जें मनाचें. ३५

[शा.वि.] नाना रम्यविलास फार करितां येती जयाच्या वशें,
सौगंध्यें अपुल्याचि केसरभवा पुष्पांस जिंकीतसे;
ऐसें मद्य पतीसवें मधुरहो पीती तई अंगना,
स्वादा संतत देउनी करितसे जें मन्मथोद्दीपना, ३६

[पृ.] प्रफुल्ल कमलें जलीं, भंवति पक्षिही बोलती,
सुमंजुलरवा अशा विपिनवापिका शोभती;
सुहास्यवदना ढिल्या सरव ज्यांचिया मेखला
अशा युवतिचा तयां, उचित वाटतो दाखला. ३७

[शा.वि.] झाली फार कृशा वसंतसमयीं, तैसी मुखांची दिसे,
कांती फारचि पांडु, इंदु उदयालागीं जई येतसे,
यासाठीं पतिची न भेट असली जी नायिका खंडिता,
तीशीं[10] तुल्य अशी स्थिती रजनिला आली तई तत्वतां. ३८

[मा.] दंव किमपि पडेना, त्यामुळें स्वच्छ झाले,
किरण शशधराचे ज्यांस सौंदर्य आलें,
श्रम हरिति रतीचे देखुनी त्या समराला,
तरुणमनिं शिराया फार आवेश आला. ३९

[शि.] प्रदीप्ता अग्नीच्या परि बहुत तेजस्वि दिसतें,
वनश्रीचें स्वर्णाभरणचि जनालागिं गमतें;

---

१ हातांचा. २ बकुळीच्या (पुष्पांस). ३ ज्यांत मंजुळ शब्द होतात अशा. ४ वनांतल्या विहिरी. ५ हास्ययुक्त मुखें ज्यांचीं अशा (युवती). ६ शब्दयुक्त (अशा मेखला). ७ त्या विपिनवापिकांस. ८ वसंत कालीं रात्री कृश म्ह० लहान होतें. पक्षीं खंडितनायिका कृश होते. ९ तोंडाची, रात्रिपक्षीं प्रदोषसमयाची. १० त्या खंडितनायिकेशीं (तुल्य) खंडितनायिका कृश होते तिचें मुख चंद्रोदयीं पांडुर होतें तसी स्थिति वसंतकालीं रात्रीला आली.

असें कोरांन्याचें कुसुम पतिनें कोमल करीं,
दिलें तें प्रेमानें कमलनयना घालिति शिरीं. ४०

[शा.वि.] काळा अंजनसा द्विरेफगण हो ज्याच्यावरी बैसला,
ऐसा तो तिलकाख्य वृक्ष बरवा बागामधें शोभला,
तेणें भव्यवनस्थली अतिशयें श्रीच्या दिसे कीं तसी,
लोकामाजि सुधांशुकांतवदना शोभे तिलानें जशी. ४१

येतो फार सुगंध जीस मधुचा, जो वेधितो कीं मन,
आरक्ताधररूप रम्य दिसतो पाला जिला शोभन;
पुष्पें हींच जिचें मनोज्ञ हंसणें ज्याची प्रभा पांढरी,
एणें ती नवमल्लिकाख्य युवती चित्ता प्रमोदा करी. ४२

शेले रंगित, लालजर्द चुनड्या, कानीं यवांचे तुरे,
तैसे कोकिल शब्द, ऐकुनि जयां कांतावियोगी झुरे;
ऐसीही मदनाख्यभूपति चमू तीणें विलासी जन
केला स्त्रीपरतंत्र, त्याविण कुठें लागे न त्याचें मन ! ४३

[पृ.] मरंदवश होउनी भ्रमर बैसले जीवरी,
कणीं सुधवलींहि जी बहुत पुष्ट झाली खरी;
असी तिलकमंजरी उपवनीं भली शोभली,
जशी कचभरीं तिच्या विमल मौक्तिकें गुंफिलीं. ४४

[शा.वि.] बागांतील समीरणें उडविला पुष्पोत्थ रेणुव्रज,
शोभे जेंवि उभा धनुर्धररतीशाचा विशाल ध्वज;
किंवा तो ऋतुलक्ष्मिचा शितिमुखालंकारचूर्ण स्वयें,
ज्यातें लक्षुनि धांवती मधुकरश्रेणी तंई निश्चयें. ४५

१ स्त्रिया. २ श्रीच्या अतिशयें असा अन्वय. ३ चंद्रवत् शोभनमुखी ( स्त्री ). ४ तिलकानें. ५ कांतेचा ज्याला वियोग तो. ६ शेले, चुनड्या, कोकिलशब्द वगैरे. ७ मदननामक राजाची सेना. ८ पांढऱ्या. ९ ( भ्रमर हेच काळे केश, तेथें पांढरे मकरंदकण हींच मोत्यें गुंफिलींशीं दिसलीं असा भाव ). १० योद्धा जो मदन त्याचा. ११ पांढरें मुखास अलंकृत करणारें चूर्ण. १२ भ्रमरांची पंक्ति.

* हिंदोळ्यावरि बैसुनी पतिसवें कांता वसंतोत्सवीं,
चातुर्ये दृढ रज्जुला धरुनियां, दोला स्वयें हालवी;
'आतां मी पडतें,' ह्मणोनि वदनें बोलोनियां तत्क्षणीं,
रज्जू टाकुनि भीमिषें करितसे आशा धवालिंगनीं. ४६
"कोपा टाकुनि द्या, तुह्मी रुसुं नका, चित्तांत ईर्ष्या पुरे,
स्त्रीहो, यौवन फार चंचळ असे, गेलें न मागें फिरे,"
ऐसें मन्मथशासना जणुं कथी तो कोकिलांचा गण,
वाटे कीं युवती यथेष्ट रमती त्या शासना ऐकुन. ४७
शोभे ज्या मधुविष्णुकामतुलना ऐसा नृवीराग्रणी,
रूपानें रतिशा विलासचतुरा कांता सवें घेउनी;
भोगोनी विविधा यथेष्ट विषयां तेव्हां वसंतोचितां,
इच्छी कीं मृगयाविहार करिजे आतां वनीं तत्वता. ४८
कौशल्यें चैललक्ष्यभेद करितां येतो, तशीं चेष्टितें,
पाहोनी पशुचीं, मनोगत कळे तत्कोपभीत्यादि तें;
होतें कष्टवशें शरीर हलकें ऐसें शिकारीमधीं,
जाणोनी गुण मंत्रियांस पुसुनी जाई वनीं तो सुधी. ४९
भूपानें मृगयोपयोगि असल्या वेषा करोनी भलें,
कंठाला लटकाविलें निज धनू, जें मौर्विनें शोभलें;
अश्वाचे खुर लागुनी रज उडे नोहे जैयाला मितें,
आच्छादी सकला नभास, दिधलें त्याला जसें कीं छत. ५०
केशांचा बुचडा कसोनि कुसुमस्त्रग्बंधनानें शिरीं,
पानांशीं तरुच्या समान हिरव्या वर्मा शरीरीं धरी;

---

*थवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक.)—

हिंदोळ्यावरती बसोनि युवती भर्त्यांसवें खेळती,
तें आलिंगनवासना दृढ मनीं येवोनि त्या बोलती;
'धांवा रे पडतों' असें मिप तईं दावोनि दोन्ह्या मुठ्या,
सोडोनी हतच्या, गळ्यांत पतिच्या त्या मारिताती मिठ्या. ४६

१ हे स्त्रियांनों. २ कामाच्या आज्ञेस. ३ वसंत विष्णु व काम यांची तुलना ( ज्यास शोभे ). ४ चल म्ह० चंचल असें लक्ष्य म्ह० ज्याला नेमून मारायाचें तें. ५ त्या पशूंचें क्रोध भय इत्यादि मनोगत. ६ ज्या रजाला. ७ मिती.

घोड्याच्या गतिनें सुरेख हलती कानांतलीं कुंडलें,
ऐसा जाय वनीं नृपाळ, चरती जेथें मृगांचीं[1] कुळें. ५१

आत्म्याला वनदेवता[2] शिरवुनी वेलीमधें राहती,
दृग्व्यापार मधुव्रतीं निजबळें ठेवोनियां पाहती;
भूपा कोसलिच्या जनास सुखदा त्रात्यास पूतास त्या,
ऐशा देखुनियां प्रसन्न विपुला, संतुष्ट झाल्या सैत्या[3]. ५२

जेथें तैस्कर[4], दैल्दली[5], व वणवे नाहींत ऐशा वनीं,
कुत्रे आणि किरात धांवति पुढें जाळीं सवें घेउनी;
पक्षी, एण, गवे, यथेष्ट चरती, गोड्या जळाचे झरे,
मैदानें बहु लांब रुंद बरवीं, भूपाळ [6]तेथें शिरे. ५३

चिंताशून्य मनांत जो दशरथ प्रख्यात रूपें नैरीं[7],
चापाच्या कठिनस्वनें पळविले ज्यानें महा केसरी;
जैसें भाद्रपदांत इंद्रधनु तें ज्या वीज मौर्वी बरी,
तैसें सज्य करोनि तो धनु करीं घेई वनाभ्यंतरीं. ५४

स्तन्यार्थी[8] हरिणींस आडविति तैं मार्गीं तैयांचीं[9] पिलें,
दर्भांचे सुकुमार अंकुर मुखीं ज्यांच्या बहू शोभले;
टोंकारोनि पुढें सदा विचरती ते कृष्णसाराव्हय,
ऐसे तैं मृगयूथ भूमिपतिच्या आले पुढें सैान्वय[10]. ५५

[द्रु.वि.] सजव वाजिवरी नृप बैसला, निशितें[11] बाण शरासनिं लाविला;
नृपति यापरि धांवतसे वनीं, निरखुनी हरिणी सभया मनीं.

[इं.व.] इतस्ततां धांवति घाबरोनी, त्या पाहती व्याकुळ लोचनांनीं,
आर्द्रीं कटाक्षीं तंव हो तयाचें, तें श्याम शोभे वन सर्व साचें;
सुस्निग्ध नीलोत्पलदीर्घ पत्रें, जैं हालती वातवशें विचित्रें;
तींहीं जसें श्याम अरण्य होतें, तैसें मृगीदृष्टिवशें[12] दिसे [13]तें. ५६

---

१ " हरूंचीं " असें पाठांतर. २ ( एथें वेलीचे ठायीं वनदेवतांचा व भ्रमरांच्या ठायीं त्यांच्या दृष्टीचा आरोप आहे ). ३ ( वनदेवता ). ४ चोरटे. ५ चिखलाचीं ठिकाणें. ६ तसल्या वनांत. ७ नरांमध्यें. ८ स्तन पिण्यासाठीं उत्सुक (हें मुलें यांचें विशेषण). ९ हरिणींचीं मुलें. १० संततीसहवर्तमान. ११ तीक्ष्ण बाण. १२ हरिणींच्या दृष्टियोगानें. १३ अरण्य.

[शा.वि.] लावी बाण वधावयास विपिनीं एक्या मृगा भूपती,
तों त्याची दयिता मधेंच अडवी आली अकस्मात ती;
राजा कामिमनोगतज्ञ[1] ह्मणुनी त्याला दया येउनी,
कर्णांतावधि ओढिला शर तरी तो घे तई काढुनी ! ५७

[व.ति.] तो भूमिपाळ इतरांहि अनेक एणां,
मारावयास्तव धनूवरि लावि बाणा;
तेव्हां मनीं मृग भयातिशयास घेती,
या हेतुनें नयन चंचल फार होती;
तें पाहुनी नृपतिच्या स्मरणांत आले,
प्रौढांगनानयनविभ्रम[2] पाहिलेले;
येई दया नृपतिच्या हृदयांत थोर,
तेव्हां अशी घडलि अद्भुत गोष्ट फार;
आकर्णकृष्ट बहु घट्ट तथापि त्याची,
झाली अपोअप ढिली मुठ राजयाची ! ५८

डोबीचिया चिखलिं सूकर बैसलेले,
तेथूनि ते निघुनि शीघ्र वनांत गेले,
अर्धेंच चर्वित मुखांतिल जे लव्हाळे,
मार्गीं पदोपदिं तई दिसती गळाले;
त्यांचीं पदेंहि वठलीं वळिनींचि ओलीं,
तींही तया नृपतिनें अवलोकिजेलीं,
ऐशा खुणा बघुनि भूमिपती सवेग,
त्या धोरणेंचि करि सत्वर पाठलाग[3]. ५९

थोडा पुढें लवुनि वाजिवरोनि भूप,
तो सूकरांप्रति हणी शरजाल खूप,
वृक्षांस कंबर तयें खिळली शरांनीं,
नाहींच जाणियलि त्या क्षणिं सूकरांनीं;
क्रोधें उभे करुनि केसर[4] भूपतीला,

१ कामिजनांच्या मनांतील अभिप्राय जाणणारा. २ प्रौढस्त्रियांचे नेत्रविलास. ३ डुकरांचा पाठलाग. ४ मानेवरील केंस.

तेचि स्वयें उलट इच्छिति मारण्याला,
ऐसे परी बहुत कोपुनि सूकरांचें,
गेलें निघूनि तव भान समग्र त्यांचें. ६०

[शा.वि.] आघातोद्यत एक वन्यमहिषा देखोनियां सत्वर,
त्याचे नेत्रबिळांस लक्षुनि शरा मारी धराधीश्वर;
रक्तानें नचि तो भिजे जरि निघे भेदोनियां आंतडें,
पाडी बाण अधीं अरण्यमहिषा त्या मागुनी तो पडे. ६१

शिंगें तोडुनि तीक्ष्णबाणनिकरीं भूमीपती सत्वरी,
गेंड्यांचीं बहुधा शिरें नरपती तो हालकीं तें करी;
दुष्टांचा दमिता न सोसुनि नृप प्राधान्य त्यांचें, करी,
त्यांचा नाश, परंतु जीवहरणा वांछी न तो अंतरीं. ६२

आंवासोनि दरीस्थ वाघ जंव त्या भूपावरी धांवती,
भग्ना वातवशेंचि सर्जतरुच्या शाखा तसे भासती;
दावोनी करलाघवास भरलीं त्यांचीं मुखें निर्भयें,
भूपें बाणगणीं, क्षणांत गमले भातेच तीं निश्चयें. ६३

जाळीमाजि लपून सिंह बसती त्यां क्षोभवोनी स्वतां,
मारावें ह्मणुनी भयानक करी मौर्वीरवा तत्वतां;
'राजा' शब्द मृगांस लक्षुनि येया लोकांमध्यें लाविती,
त्याचा मत्सर वाटुनी करितसे ऐसें जणूं भूपती. ६४

ज्यांच्या वक्र नखोदरांत शिरलीं होतीं नवीं मौक्तिकें,
ज्यांचें फारचि तीव्र दंतिततिशीं शत्रुत्व होतें निकें;
त्यां सिंहांस वधूनि भूमिपतिनें ऐसें मनीं आणिलें,
कीं, युद्धांत सहाय जीं गजकुलें त्यांच्या ऋणा फेडिलें. ६५

घोड्याला चॅमरांसभोंवति नृपें तें धांववोनी त्वरें,
त्यांचीं तीव्रशरीं हरोनि ढवळीं तीं घेतलीं चामरें;
यामागें इतरांहि भूमिपतिचीं तीं घेउनी सोडिलें,
जैसें त्यांस, तसेंचि यांहि चमरां जीवित्व त्यानें दिलें. ६६

१ आघात मारण्यास उद्युक्त. २ बाण. ३ तोंड वासून. ४ 'राजा' हा शब्द. ५ ह्या सिंहास. ६ हत्तींचा समुदाय. ७ मृगविशेष. ८ चामरें. ९ भूमीपतींस (राजांस).

[व.ति.] अश्वासमीप अवचीत उडूनि मोर,
आला वनीं नृप तिच्या अगदीं समोर,
होता जरी दशरथास तईं वधार्ह,
त्याचा विचित्र दिसला नृपतीस बर्ह;

[शा.वि.] केशांचा चुचडा सपुष्प रतिच्या काळीं सुटोनी बरी,
वेणी पाठिवरी सुदीर्घ दिसते स्त्रीची जशी साजरी;
तीची होउनियां स्मृती नृपवरा चित्तांत येई प्रिया,
त्यायोगें शर मारण्यास बरवें वाटे न भूपा तया! ६७

[व.ति.] कष्टामुळें नृपतिच्या वदनांबुजाला,
तेव्हां वनांत फिरतां बहु घाम आला,
पाल्यास जो हलवि आणिक शीत जो कां,
तो त्यास वायु सुकवी निमिषांत एका. ६८

[शा.वि.] राज्याचा तंव कार्यभार दिधला होता स्वमंत्र्यांकडे,
अन्याही विषयाकडे न मन त्या भूमीपतीचें जडे;
ऐसा हा मृगयेस संतत भजे या हेतुनें संप्रती,
आकर्षी चतुरा विलासिनिपरी ती या नृपाळाप्रती. ६९

शय्या कोमळ पत्रपुष्परचिता जैं भूपतीची सुधी,
दीपस्थानिं विराजती ज्वलनशा रानांतल्या औषधी;
कोणीही परिवार सन्निध नसे, ऐशी कधीं यामिनी,
काढी तो मृगयानुरक्तहृदय क्षोणीपती काननीं. ७०

[शा.] हत्तींचे जे कर्णताल स्वतांचे, जाणावे ते दुंदुभी भूपतीचे,
त्यांच्या नादा ऐकुनीयां प्रभातीं, होई भूमीपाळ जागा वनांतीं;
पक्षी तें जे बोलती सुस्वरांनीं, त्यांतें मानीं भूप हा भाट रानीं,
त्यांचीं तेव्हां ऐकुनी रम्य गीतें, वाटे मोठा हर्ष भूमीपतीतें. ७१

[शा.वि.] वाटेनें रुरुच्या वनीं दशरथ स्वेच्छावशें चालिला,
घोड्याची गति शीघ्र यास्तव चरीं कोणी नसे पाहिला;
अंगीं घाम मुखांत फेंस असला घोडा सवें घेउनी,

१ पिसारा. २ स्त्री. ३ पळांत. ४ मृगया. ५ मृगयासक्त ज्याचें हृदय असा. ६ वनामध्यें. ७ मृगविशेष. ८ सेवकांनीं.

आला तो तमसानदीवरि जिच्या कांठीं मिळाले मुनी. ७२
तेथें कोणि नदींत पाणि भरण्यासाठीं घडा घातिला,
त्यायोगें बुडबूड शब्द सहसा होतां नृपें ऐकिला;
हत्तीचा ध्वनि हा असें समजुनी त्या घोरणानें शरा,
सोडी भूपति लक्ष्यवेध करण्यामाजी असे जो पुरा. ७३
युद्धावांचुनि अन्यकार्यसमयीं हत्तीस मारूं नये,
ऐसें शास्त्र, परंतु तें दशरथें तैं सोडिलें निर्भयें;
कोणी शास्त्रमतीं प्रवीण असतां लोभें, मदें, मत्सरें,
कामें, अंध बनोनि जाति कुपथा दुर्वासनेच्या भरें. ७४
'हा हा तात!' असा ध्वनी परिसुनी भ्याला मनीं भूपती,
शोधी कारण तों सशल्य गंवसे वेतामधें मूर्ति ती
पुत्राची मुनिच्या, तिला निरखितां धैर्यें जरी आगळा,
तोही तत्क्षणिं भूमिपाळ हृदयीं चिंताशरें खोंचला. ७५
घोडा सोडुनि भूवरी उतरुनी तो ब्रह्महत्या भयें,
'होसी कोण?' असें तयास पुसता झाला नृपाळ स्वयें;
'नाहीं रे द्विज जातिचा, परि असे मी शूद्र बा तत्वतां,'
ऐसें गुंतत गुंतत स्वकुल तो होई नृपा सांगता. ७६
'माझीं अंध व फार वृद्ध पितरें आहेत, त्यांच्याकडे
आतां ने मजला, दयानिधि! करी तूं काम बा एवढें;'
ऐशा तद्वचनावरोनि नृपती एकूलत्या त्या सुता,
नेई हाळुच, शल्य तें नुपटितां[2] वृद्धांसमीप स्वतां.

[व.ति.] भूमीपती मग महाविनयें करांस;
जोडोनियां कथितसे निज वृत्त त्यांस,
हत्ती ह्मणोनि शर[1] टाकियला मियां जी,
तेणें अशी घडलि गोष्ट चुकोन आजी. ७७
तीं दंपती बहुविलाप करोनि अंतीं,
जैं शल्य काढविति भूपतिच्याच हातीं,

१ बाण. २ न उपटितां.

तैं तो मरे, मग करें नयनोत्थ ओपा,
घेवोनि देइ नृपतीप्रति वृद्ध शापा ! ७८
'देहांत तूंहि मजसा निजपुत्रशोकें,
रे पावशील अतिवृद्धपणींच देखें,'
ऐसें तई तनयशोकशराग्रविद्धें,
तत्काळ शाप दिधला नृपतीस वृद्धें.
पुच्छांवरी पद पडे तंव डंख हाणी
जैसा, भुजंगम तसा नृप त्यास मानी,
होवोनियां अतिशयें हृदयांत सोधी,
त्याला वदे दशरथ प्रथमापराधी. ७९

[शा.वि.] 'ताता! मी अजुनी निपुत्रिक असें, या हेतुनें शाप हा
मातें वाटतसे, कृपा मजवरी केली तुह्मी ही महा !
अंती भूमिस जाळितो परि पुढें धान्यें बहू पेरितां,
येतें पीक तिच्यांत थोर हित हें होतें जसें तत्वतां !' ८०
'हें झाल्यावरि तापसा नृप वदे, हां जी दयासागरा !
मोठा निर्दय आणि वध्य जन हा ! द्या कांहि आज्ञा करा;'
तो बोले 'मज वाटतें शिशुसवें जाऊन ध्यावें स्वतां,
भार्येशीं सह, याजसाठिं रचि बा तूं शीघ्र आतां चिता.' ८१
हें होतें इतुक्यांत सेवक तिथें आले नृपाचे भले,
त्यांनीं सर्व मिळोनि कार्य मुनिचें तत्काळ संपादिलें;
पापानें बहु खिन्न होउनि मनीं भूपाळ येई घरीं,
और्वा सागरसा स्वनाशक अशा शापास पोटीं धरी. ८२

**या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा मृगयावर्णननामक नवम सर्ग समाप्त झाला असे.**

१ डोळ्यांतील. २ उदका ( घेवोनि ). ३ मृत्यू. ४ पुत्रशोकरूप बाणाच्या अग्रानें विद्ध झालेल्या (वृद्धें). ५ संचित. ६ पहिला अपराध ज्याचा तो ( दशरथ ). ७ (हा जन म्हणजे मी ). ८ वडवानळाला. ९ ( समुद्र स्वपोटीं धारण करितो तसा ).

# सर्ग दहावा.

## साक्या.

अमरनाथसें तेज जयाच्या अंगीं थोर विराजे,
तैसें ऐश्वर्यही जयाचें त्रैलोक्यामधिं गाजे;
ऐसा दशरथराजा पाळित असतां तो पृथिवीला,
कांहिं कमी दशसहस्र वर्षी काळ निघूनी गेला. १
लोकांमाजी ऋण पितरांचें प्रसिद्ध जें कां होय,
ते ज्याचे योगानें सारें सत्वर फिटोनि जाय;
शोकरूप तम दूर कराया ज्योती ह्मणती ज्यास,
अशा सुताची प्राप्ति अजुनिहि झालि न त्या राजास. २
मंथन होण्यापूर्वी[3] जेव्हां प्रसिद्ध रत्नोत्पत्ती,
झाली नव्हती, तैं जलधीला यत्नापेक्षा होती;
तैसा हाही नृपति संतती साधन इच्छित[4] चित्तीं,
फार दिवस राहिला असे तो दशरथ सत्पथें[5]वृत्ती. ३
ऋष्यशृंग[6]मुख मुनिवर होउनि ऋत्विज राजासाठीं,
झाले आरंभिते जितात्मे[7] तेव्हां सुतकामेष्टी[8], ४
इकडे रावणपीडित निर्जर[10] गेले शरण हरीला,

---

१ इंद्रासारखें. २ मनुष्यमात्रास तीन ऋणें असतात; एक देवऋण, एक पितृऋण व एक मनुष्यऋण. त्यांत पुत्र उत्पन्न केल्यानें पितृऋणापासून मनुष्य मुक्त होतो असें शास्त्र आहे. ३ पूर्वीं देव आणि दैत्य यांनीं मिळून अमृत मिळण्याकरितां समुद्राचें मंथन केलें तेव्हां त्यांतून लक्ष्मी कौस्तुभ पारिजात इत्यादिक चौदा रत्नें निघालीं. या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. ४ ' इच्छित राहिला असे ' असा अन्वय. ५ सन्मार्गानें वागणारा. ६ ऋष्यशृंग हा विभांडक ऋषीचा पुत्र. अवर्षणकालीं पर्जन्य पडण्याकरितां याचें स्थापन व पूजन सांप्रत काळीं करीत असतात. हा मृगीचे पोटीं वाढून जन्मला व याचे मस्तकावर शृंगें होतीं. ७ जितेंद्रिय. ८ पुत्रेष्टी. ९ रावण हा राक्षसांचा राजा. याची राजधानी लंका तीच प्रस्तुतचें सिंहलद्वीप होय असें म्हणतात. रावणाचा धाकटा भाऊ कुंभकर्ण व त्याहून धाकटा बिभीषण होय. रावणाला दहा तोंडें व वीस भुजा होत्या. हा मोठा बलवान् होता. यानें इंद्रास जिंकून त्याचें ऐश्वर्य आणिलें. कुबेरास जिंकून त्याचें पुष्पक विमान हिरावून आणिलें. यानें गोकर्ण क्षेत्रीं दहा हजार वर्षेंपर्यंत मोठें घोर तप केलें. हा मोठा शिवभक्त होता. यानें एकदा कैलास पर्वत उचलिला. यानें स्वर्ग मृत्यु पाताळ या तीनही लोकांस अत्यंत पीडा दिली त्या रावणाच्या दुष्टपणामुळें इंद्रादिक देव अत्यंत व्याकुळ होऊन शेषशयन विष्णूला शरण गेले असा या पद्यांत अर्थ उक्त आहे. १० देव.

जसे पथिक उष्णातुर जाती छायेच्या वृक्षाला. ५
स्वर्गाहूनी सकल देवगण आले जैं अब्धीला,
त्याच समयिं विष्णूही देखा दैवें जागा झाला;
साधनसामग्री मिळते जैं खोळंब्यावांचून,
तीतें लोकीं ह्मणती पुढल्या कार्यसिद्धिची खूण. ६
सिंहासन शेषाचा देहचि त्यावर जो[1] आरूढ,
फणामणींची कांती ज्यावर पडली होती प्रौढ. ७
लक्ष्मी पद्मासनीं बैसली होती तीची कांची,
अंकावरती मृदू शालुनें छादित होती साची,
त्या अंकावर निजकरपल्लव तीनें आंथरलेले,
त्याचे ठायीं निजपदयुगला जेणें स्थापीयेलें. ८
पद्में विकासशाली तैसें नेत्रयुगुल कीं ज्याचें,
बालार्कापरि कांतियुक्त तें होतें वस्त्र जयाचें;
ज्यातें देखुनि मनांत वाटे तोष सर्वही लोकां,
ह्मणुनि शरत्कालचीच उपमा देती ज्याला देखा. ९
श्रीवत्सावर[3] पडे जयाची फार मनोहर कांती,
लक्ष्मीचा हा विलासदर्पण ऐसें ज्यास गणीती;
उदकाचा जो सार असा कौस्तुभाख्य मणि जो दिव्य,
विशाळ वक्षस्थळीं तयांला सदा धरी जो भव्य. १०
परोपरीचीं रम्य भूषणें ज्यांच्यावर ऊदंड,
असे दीर्घ बहु विटपाचेपरि शोभति जे भुजदंड;
त्यांची शोभा पाहुनि वाटे तेव्हां लोकमनाला,
कीं हा दुसरा जलधीमध्यें पारिजात जणुं झाला[6] ! ११
दैत्यांच्या ज्या प्रीतिपात्र वधु त्यांच्या कोमलगालीं,

१ ( विष्णूचें वर्णन होईपर्यंत हें संबंधी सर्वनाम त्या विष्णूचाच संबंध दाखवितें ). २ आच्छादित. ३ श्रीवत्स म्हणून विष्णूच्या हृदयप्रदेशावर आंगचेंच चिन्ह आहे. ४ समुद्राचें मंथन करून त्यांतून चौदा रत्नें काढिलीं त्यांपैकीं कौस्तुभ म्हणून एक होतें तें विष्णूनें कंठांत धारण केलें. ५ वृक्षांच्या फांद्यांप्रमाणें. ६ पारिजात हाही समुद्रमंथनकालीं समुद्रांतून निघाला होता म्हणून त्यावर ही उत्प्रेक्षा केली.

मदमत्तपणें वसे सर्वदा जी कां विचित्र लाली;
तीतें ज्या हो दूर करीती, ज्यांचें तेज अपार,
अशा अस्त्रदेवता जयाचा करिती जयजयकार. १२
ज्याच्या अंगावरती दिसती वज्राचे वण फार,
सोडुनि दिधलें होतें जेणें शेषाचेंही वैर;
असा गरुड नम्रतापुरःसर जोडोनी निजहात,
ज्याच्या सान्निध उभा राहिला आज्ञांकित दिनरात. १३
निद्रा गेल्यामुळें शोभती दिसती हीं बहु चित्रें[1],
वीक्षणमात्रें पावन करिती ऐसीं जीं का नेत्रें;
त्या योगानें सुखशयनातें पुसणारे मुनि थोर,
भृग्वादिक जे त्यांस पाहुनी करी अनुग्रह फार. १४
असुरध्वंसक देव असा जो प्रेमभरानें त्याला,
सकलसुरांचा संघ आदरें नमना करिता झाला;
मनोवाणिला अगम्य ऐसा जो का पुरुष विचित्र,
त्याचें करिते झाले सुर तें अशाप्रकारें स्तोत्र. १५
"विश्वातें जो निर्मुनि आधीं मग जो पाळी त्यातें,
अंतीं संहरि ऐशा त्रिगुणा नमितों आह्मी तूतें. १६
आकाशांतिल मेघोदक जें मुळचें गोडें होतें,
उपाधियोगें आंबट खारट जैसें मग तें होतें;
तैसा तूं निर्विकार असतां सत्वादिक गुणयोगें,
स्रष्टा, रक्षणकर्ता, हर्ता, ऐसीं घेसी सोंगें. १७
अप्रमेय तूं परी परिच्छेदक सकलांचा होसी!
निस्पृह तूं परि इतर जनाची इच्छा पूर्ण करीसी!
अजिताहि अससी हे देवा तूं! परि सर्वांचा जेता,
सूक्ष्मरूप बहु असोनि सकळा स्थूळांचा निर्माता[2]. १८
सर्वांच्या तूं हृदयीं असतां, अससी बा अतिदूर!
कामशून्य[3] असतांही करिसी देवा तूं तप घोर;

---

१ विस्मयकारक. २ निर्माणकर्ता ३ निष्काम.

दयायुक्त तूं तथापि तुज दुःखाचा लवही नाहीं !
जुनाट असतां जराशून्य तूं ! नवल केवढें पाही ! १९

सर्वांलांही तूंच जाणसी ! तुला न जाणे कोणी !
जन्मरहित तूं, तथापि असती सर्वांची मुळयोनी !
सर्वांचा तूं धनी, तुला तों धनी न कोणी देख !
नानारूपें घेसि परंतु मुळचा तों तूं एक. २०

सामें सातहि तालसुरावर तुला सर्वदा गाती,
सात जलनिधी ह्यांच्या उदकीं निजसी तूं दिनराती;
सप्तार्ची जो अग्नी तो बा वदन तुझें तेजाळ,
साता लोकांचा तूं होसी आश्रय सर्वहि काळ. २१

चतुर्वर्ग देणारें साधन ऐसें श्रेष्ठ ज्ञान,
चतुर्युगात्मक काळ जयाचें न कळे कोणा मान !
विप्रादिक जें वर्णचतुष्टय ऐसें हें बा सारें,
चतुर्मुखात्मा तूंच जहालें तुजपासुनि देवा रे ! २२

मुक्तिप्राप्ती व्हावी ह्मणुनी करोनि योगाभ्यास,
प्राणायामादिकीं साधनीं वश करुनी चित्तास;
हृदयसरोजीं विराजसी तूं देवा ज्योतीरूप,
त्या तुजला ते योगी ध्याती एकांतीं गुपचूप. २३

जन्मशून्य तूं असोनि घेसी जन्मा वारंवार,
अचेष्ट असतां, वधिसी बापा असंख्य रिपुचे भार;
निजुनि सर्वदा जागा असती अशा कृती तव नाना,
विरुद्ध असती, यथार्थ तूझा अंत कळेना कोणा ! २४

इकडे इंद्रिय लालन करुनी विषय सेविजे फार,
इकडे निग्रह करुनि मनाचा आचरिजे तप घोर;
इकडे स्नेहपुरःसर कीजे पालन विश्वजनाचें,
उदासीनता धरोनि बसणें इकडे निःस्नेहाचें;

---

१ सात ज्याला ज्वाला आहेत असा. २ धर्म अर्थ काम मोक्ष मिळून जो समुदाय तो. ३ ब्रह्मदेवरूप. ४ ‘ कळेवा कोणा’ हा पाठ असतां प्रश्नाची खूण आणि ‘ कळेना कोणा ’ हा पाठ धरिला तर उद्गाराची खूण जाणावी.

अशी विलक्षण कृती परेशा नसेचि जी सामान्य,
कोण असेरे जगीं कराया समर्थ तुजविण अन्य? २५
सिद्धिहेतु पथ वेगवेगळे आगमोक्त आहेती,
तरी सागरा गंगौघापरि तुजचि पावती अंतीं. २६
मनें आपुलीं तुझ्याच ठायीं ज्यांनीं स्थापित केलीं,
कर्में तैशीं तुझ्याच ठायीं ज्यांनीं समर्पियेलीं;
असे पूर्णवैराग्यशील जे मानव त्यांना अंतीं,
पुनरावृत्तिच्छेदक ऐसी देशि तूंचि बा मुक्ती. २७
भूम्यादिक ऐश्वर्य तुझें बा दिसतें जें प्रत्यक्ष,
त्याचा ही कवणास कळेना अंत विभो पद्माक्ष;
मग जो अप्रत्यक्ष असा तूं त्या तव देवा अंत,
कधीं तरी लागेल नराला? सांग तूंच निभ्रांत! २८
स्मृतिमात्रेंची केवळ देवा पावन करिसी लोकां,
स्पर्शदर्शनादिकीं करिशि हें नको सांगणें देखा. २९
रत्नाकर सागर जो त्याच्या शुभ रत्नांच्या राशी,
धामनिधी सविता जो त्याचीं तेजें अपार जैसीं;
तशीं तुझीं चरितें विश्वेशा वाणीला व मनाला
अगोचरें, तीं विषय कशीं बा होतील स्तवनाला. ३०
जगीं तुला अप्राप्त असें वा प्राप्तव्यहि बा कांहीं,
परिपूर्णा देवा तुज ऐसें वस्तु एकही नाहीं;
तथापि जन्मा घेउनि कर्मा नाना परि करिशी तूं,
लोकांवरती दया करावी हाच तयाचा हेतू. ३१
महिमा तूझा वर्णन करितां मधें थांबती लोक,
त्यांचे हेतू दोन; त्यामध्यें वाणीश्रम हा ऐक,
तुझ्या गुणांचा पार कळेना हा तों दुसरा जाणा,
सकल गुणांचें वर्णन झालें असें कधीं होईना." ३२
अशाप्रकारें इंद्रियांस जो अविषय विष्णु अभंग,
प्रसन्न त्याला करिते झाले ब्रह्मादिक सुरसंघ;

---

१ हे कमलनेत्रा. २ अथवा. ३ एकहेतु. ४ दुसरा हेतु. ५ देवसमुदाय.

कांकीं तें देवांचें भाषण होतें सत्यचि सारें,
विश्वेशाची मृषा स्तुती तों न घडे, नियम असा रे. ३३
"अहां कुशल कीं?" अशा विष्णुच्या प्रश्नावरुनी त्याची,
प्रसन्नता जाणोनि मंडळी वदे तदा देवांची;
"भगवन्, राक्षसरूपी सागर मर्यादा सोडोनी,
अकालींच अतिपीडा देतो तो आह्मालागोनी." ३४
या बोला परिसोनि सुरेश्वर बोले बहुगंभीर,
आसपासच्या शैलगुहा तैं नादित झाल्या थोर;
उदकनिधीचा ध्वनी चालिला होता जो कां मोठा,
तोही त्याच्या पुढें लोपुनी गेला त्याचा ताठा. ३५
सर्वांहूनी आद्य कवी जो श्रीपरमेश्वर जाणे,
त्याचीं कंठादिक वर्णोच्चाराचीं जीं कां स्थानें;
त्या स्थानांनीं कृतसंस्कारा होउनि संप्रति वाचा,
कृतार्थता पावली यामधें संशय नाहीं साचा. ३६
विभुच्या वैदनापासुनि निघती झाली जेव्हां वाणी,
शुभ्र रैदांची कांति तिच्यावर पडे चांदिण्यावाणी;
पूर्वीं चरणापासुनि निघुनी कांहिं शेष राहीली,
तीच जान्हवी जणूं मुखाच्या बाहिर वाटे आली ! ३७
"सत्वगुणाला रजोगुणाला गुण तिसरा तम थोर,
कधीं कधीं हटवितो सुरांनो, जेंवी दावुनि जोर;
महिमा तुमचा तसा पराक्रम दोहोंचें सामर्थ्य !
अह्मा समजलें निशाचरेशें केलें सारें व्यर्थ ! ३८
चुकी पडोनी प्रमादयोगें घडतें पातक जेव्हां,

१ मिथ्या. २ राक्षस हाच समुद्र. ३ गर्व. ४ गंगा ही प्रथमतः विष्णूच्या पायांपासून निघाली असें पुराणांत वर्णन आहे. गंगेचा वर्ण पांढरा शुभ्र वर्णिला आहे. प्रस्तुत विष्णु बोलूं लागला तेव्हां त्याच्या दंतपंक्तीची शुभ्रकांति बाहेर दिसूं लागली. तेव्हां पूर्वीं पायांपासून जी शुभ्र गंगा निघाली, तिचा अंश कांहीं अवशिष्ट राहिला होता तोच आतां मुखावाटे बाहेर आला काय ! अशी दंतकांतियुक्तमुखनिसृतवाणीवर कवीनें उत्प्रेक्षा केली आहे. ५ दंतांची. ६ गंगा. ७ रावणानें.

सज्जनहृदयालागीं जैसा ताप होतसे तेव्हां !
तैसा राक्षसपती दुरात्मा ताप त्रैलोक्याला
देतो फारचि, हेंही कळलें देवांनो आह्माला ! ३९
जें कां तुमचें कार्य सुरांनो तेंच आमुचें आजी
आहे, ह्मणुनी इंद्रा करणें नको प्रार्थना माझी !
जनीं पहा साहाय्य अग्निचें स्वयेंचि करितो वात,
नाहिं कधीं त्यालागिं विनविलें अग्नीनें निभ्रांत ! ४०
पूर्वी तीव्र स्वखड्गयोगें तोडुनियां नव डोकीं,
साहसकारी राक्षसपतिनें केला तुष्ट पिनाकी !
एक राहिलें बाकी तें तों जाणा मँच्चक्राचा
योग्य राहिला असे सुरांनो देखा विभाग साचा ! ४१
परी विधीच्या वरप्रदानें भरभराट दुष्टाचा
म्याहि सोशिला ! चंदन जैसा सोसितसे सर्पांचा ! ४२
"नको मरण मज करें सुरांच्या, भीति नसे मनुजांची,"
तपें तुष्ट परमेष्ठीपाशीं अशा वरा तो याची ! ४३
आतां दशरथसूनु होउनी तीक्ष्ण शरांनीं त्याचीं,
शिरें तोडुनी सर्व सुरांनो राशी घालिन त्यांची !
शिरोलक्षणें विमळें कमळें त्यांची जी ही राशी,
रणक्षितीदेवता तिच्या ती योग्य होय पूजेशीं ! ४४
निशाचराचा नाश होउनी यज्ञहवींचा भाग,
पुन्हा तुह्माला मिळेल ऐसा सत्वर येइल योग ! ४५
पुण्यवंत नर विमानिं बसुनी व्योमपथें जाती जी,
दैवें रावणविमान देखुनि दडती मेघामाजी;
त्या लोकांनीं सर्व इतःपर टाकुनि त्यांचा त्रास,
निर्भयचित्तें गमन करावें देवांनो स्वर्गास ! ४६

१ रावणानें खड्गेंकरून एक एक मस्तक अर्पण करावें अशा प्रकारानें नऊ मस्तकें अर्पण केलीं तेव्हां शिव प्रसन्न झाला व त्यानें रावणाला ईप्सित वरप्रदान देऊन त्यानें तोडून टाकिलेलीं नऊही मस्तकें त्याचीं त्यास पूर्ववत् उत्पन्न केलीं, अशी कथा आहे. २ शिव. ३ माझ्या चक्राचा विभाग म्हणजे वांटा. ४ आकाशमार्गें.

शापभयानें निशाचरानें बळें हात केशांस
नाहिं लाविला ह्मणोनि नसती पात्र जाण दोषास;
अशा स्वर्गकामिनी तयांच्या वेणीबंधालागीं,
देवांनो आनंदभरानें सोडा तुह्मी वेगीं." ४७
रावणरूपावग्रहयोगें कडक लागुनी ऊन,
देवलक्षणें धान्यक्षेत्रें गेलीं सर्व सुकून;
कृष्णमेघ त्यांवरी वर्षुनी यापरि वागमृताला,
त्यांच्या उज्जीवना करोनी तईं नाहिंसा झाला ! ४८
रावणवध हें कार्य सुरांचें करायास दैत्यारी,
सिद्ध जाहला दयासिंधु तो भक्तांचा कैवारी;
वृक्ष जसे पुष्पांच्या योगें अनुसरती वायूस,
देवसंघ अंशांनीं तैसे अनुसरले विष्णूस. ४९
इकडे दशरथ पुत्रेष्टीच्या अंतीं कुंडांतून
विप्रविस्मयासवें निघाला पुरुष गुणांनीं पूर्ण. ५०
करी जयाच्या पयश्चरूचें हैमपात्र तें साजे,
भगवंताच्या अनुप्रवेशें दुर्वह त्याला ही जे. ५१
पुरुषदत्त तो चरू घेतला दशरथभूपालानें,
सागरदत्ता अमृता घेई इंद्र जसा स्वकरानें. ५२
* जगद्योनि विष्णूही इच्छी याया याच्या पोटीं,
येणें त्याची गुणवत्ता सुव्यक्त जाहली मोठी, ५३
द्यावापृथ्वी या उभयांला प्रातःकाळीं सत्य,

१ रावण हाच अवृष्टियोग. २ काळा मेघ. पक्षीं विष्णुरूप मेघ. ३ वाणीरूप जल. ४ देवरूपशेताच्या. ५ विष्णु. ६ ही सहोक्ति आहे. ७ स्वर्णपात्र. ८ वहन करण्यास कठिण. ९ समुद्रमंथन देवांनीं व दैत्यांनीं मिळून केलें त्यावेळीं त्यांतून जें अमृत निघालें तें इंद्रानें घेतलें या गोष्टीकडे या स्थळीं लक्ष्य आहे.

* अथवा ( वरील अर्थाचीच दुसरी साकी)—

त्रैलोक्याचा कारण ऐसी व्याप्ती ज्याची मोठी
तोही विष्णू जन्मा घ्याया इच्छी याच्या पोटीं;
लोकांमध्यें राजाचे गुण सर्वांहूनी श्रेष्ठ,
होते ऐसी स्पष्ट जाहली ययावरुनि ही गोष्ट ! ५३

वांटुनि देतो नव्या आतपालागिं जसा आदित्य;
चरुस्वरूपी विष्णुतेज तें भूपानें निजहस्तें
यथाविभागें वांटुनि दिधलें तसें दोन भार्यांतें. ५४
प्रिया केकयी कोशलकन्या ज्येष्ठा यांनीं भागें
तिजी सुमित्रा सत्कारावी असें भूप मनिं वागे. ५५
त्या दोघींनीं सुज्ञपतीचा अभिप्राय जाणोनी,
वांटा तिजला दिधला अर्धा निजनिज भागांतूनी, ५६
दोघी सवतीवरी तोषली तईं सुमित्रा नार,
जसी तोपते भृंगि गजाच्या मदलेखांवर फार. ५७
सुधानाडि जनहितार्थ रविच्या जलमयगर्भा जैशा,
विष्णुमया गर्भातें राण्या धरित्या झाल्या तैशा. ५८
गर्भधारणें तईं तिघी त्या झाल्या पिंगटवर्ण,
साळी जैशा पोटीं होतां कणयोगें परिपूर्ण. ५९
गदादिशस्त्रें करीं घेउनी विष्णूच्या लघुमूर्ति
अपुलें रक्षण करिती, ऐसें स्वप्नीं त्या पाहाती. ६०
"सुवर्णवर्णी पंख जयाचे, आकर्षी वेगानें,
मेघा ऐसा गरुड अह्मातें, घेउनि तो व्योमीं ने. ६१
गळीं घातला कौस्तुभ पतिनें, करिं कमलांचा पंखा,
अशी इंदिरा सेवा करिती झाली अमुची देखा. ६२
गंगातोयीं स्नान करुनियां जपती जे ब्रह्मातें,
सप्तऋषी कश्यपादि विनयें स्तविती नित्य अह्मातें." ६३
ऐसीं स्वप्नें ऐकुनि त्यांचीं राजा अपुल्या कानीं,
विष्णू येतो उदरीं जाणुनि अपणा उत्तम मानी. ६४
एक चंद्रमा जळीं अनेकीं विभक्त भासे जैसा,

१ प्रकाशास. २ सूर्याला सहस्ररश्मी म्हणजे किरण आहेत त्यांतून कितीएक शतरश्मीस अमृतनाडी अशी संज्ञा आहे. त्या अमृतसंज्ञक नाडी जलमय गर्भातें जशा धारण करितात, तसें दशरथ राजाच्या स्त्रियांनीं विष्ण्वंशमय गर्भास धारण केलें अशी ही उपमा होय. ३ साळी ह्या पोटीं कणयोगानें परिपूर्ण होऊन जशा पिंगट वर्ण होतात तशा राण्या झाल्या असा भाव. ४ लक्ष्मी.

त्यांच्या उदरीं विष्णू नानारूपें राही तैसा. ६५
सायंकाळीं जसें औषधीपासुनि निघतें ज्योति,
तेजस्वी पुत्रातें प्रसवे, तैसी कौसल्या ती. ६६
वपू देखुनी भूपालानें पुत्राचें अभिराम
जगन्मंगला तईं ठेविली यथार्थ अभिधा ' राम.' ६७
राघववंश प्रदीप ज्याचें पडलें अनुपम तेज,
तेणें केले दीप सूतिकागृहांतील निस्तेज. ६८

प्रसूतियोगें तंव कौसल्या कृशोदरी ती झाली,
शय्यागत रामानें तिजला फारच शोभा आली;
शैरत्कालिं कृश गंगा शोभे कमलांच्या पूजेनें,
वाळुवंटि बांधिल्या, शोभली तसी राणि पुत्रानें. ६९
कैकेयीला भरत ह्मणूनी पुत्र शीलवान् झाला,
जननीला तो करी अलंकृत विनय जसा कां श्रीला. ७०

तसे दिव्य लक्ष्मण शत्रुघ्न क्रमें तनय हे दोन,
जुळे सुमित्रा प्रसवे, जे कां असती बहु गुणवान;
उत्तम अभ्यस्ता जी विद्या बोधाला विनयाला,
प्रसवे लोकीं, तिचा दाखला शोभे या राणीला. ७१
जाउनि दुःखें सर्व सुखांनीं युक्ता पृथ्वी झाली;
यास्तव वाटे विष्णुमागुनी स्वर्गहि आला खालीं. ७२

असा चतुर्धा अवताराला विष्णू जेव्हां घेई,
दिशाचतुष्टय पतीसहित तें प्रसन्न फारचि होई;
सुखस्पर्शही वायु वाहती तेच जणूं उच्छ्वास,
चतुर्दिशांच्या आनंदाचे, असा जाहला भास.

---

१ शरत्कालीं पाणी आटून सूक्ष्म झालेली गंगा ( गंगौघ ) बाजूस वाळवंटा धिलेल्या कमलपूजेनें जशी शोभते तशी बाळंत होऊन कृशोदरी झाले राणी बाजूला शय्येवर असलेल्या पुत्रानें शोभती झाली, असा अन्वयार्थ कृश असें समासयुक्त पाठांतरही जाणावें. या पक्षीं शरत्कालानें कृश वा. ह्या प्रसूतियोगें कृशोदरी या उपमेला विशेष जुळतो. )

अग्नी झाला बहु तेजस्वी, प्रभा चढे सूर्याला,
रावणपीडा जाउनि वाटे हर्ष जाहला त्यांला. ७४
रावणमुकुटापासुनि गळती रत्नें तैं भूपृष्ठीं,
वाटे राक्षसलक्ष्मी अश्रू गाळी होउनि कष्टी. ७५
पुत्रलाभ होतांच नृपाला तोष फार देवांस,
होउनि त्यांनीं अधीं नृपाच्या वाजविलें भेरींस. ७६
कल्पवृक्ष कुसुमांची वृष्टी सौधीं लागे व्हाया,
भावी मंगल उपचारांचा तीच जाहली पाया ! ७७
जातकादि संस्कार करोनी शोधुनि उत्तम बाया,
भूपें अपुल्या बाळांसाठीं ठेउनि दिधल्या दाया;
दिनानुदिन तीं राजबालकें पिऊनि त्यांचें स्तन्य,
पूर्वोत्पन्ना पित्रानंदासवें वाढती धन्य ! ७८
सहजनम्रता शिक्षायोगें वाढे त्या कुमरांची,
जैसी तेजस्विता वाढते आज्यवशें अग्नीची. ७९
परस्परें ते चारहि बालक वागति मित्रत्वानें,
राघववंशा फारचि शोभा आली त्या योगानें;
जैसे साही ऋतू विरोधा सोडुनि देववनाला[1],
देती शोभा, प्रकार हाही त्याच रितीचा झाला. ८०
जरि चौघांची परस्परांशीं मैत्री फारचि होती,
तथापि दोघां दोघांची तैं विशेष जडली प्रीती;
राम व लक्ष्मण हे दोघेजण वागति ते जोडीनें,
तसे भरतशत्रुघ्न उभयतां खेळति बहु गोडीनें. ८१
वायु वन्हि वा इंदुतोयधी या दोघांदोघांची,
लोकामध्यें फूट पडेना जसी कधींही साची;
तसा रामलक्ष्मणांत, अणखी भरतरिपुघ्न ययांत,
भिन्नभाव अणुमात्र पडेना तेव्हां अन्योन्यांत. ८२
विनयें तेजें चौघे भाऊ मनोहरण लोकांचें,
करिती, जैसे समशीतोष्मे दिवस ग्रीष्मांतींचे. ८३

१ नंदनवनाला.

भूपाळाचे वेगवेगळे पुत्र शोभले फार,
धर्म, अर्थ, अणि काम, मोक्ष, हे अवतरले जणुं चार. ८४

विनयादि स्वगुणांनीं बालक भजती ताता तैसे,
त्याच नृपाला रत्नांनीं रत्नाकर भजती जैसे. ८५

दैत्यखड्गधारा मोडुनियां ज्यांनीं केल्या चूर,
अशा चार दंतांनीं शोभे जैसा सुरगज थोर;
सामदानभेदादिक असती उपाय जे कां चार,
त्यांच्या योगें जसा शोभतो नीतिमार्ग साचार;
लांबलांब बहु सुंदर ऐसे चार महा भुजदंड,
ते विष्णूच्या तनुला शोभा देती जेंवि उदंड;
तसे विष्णुचे अंशभूत जे रामादिक सुत चार,
त्यांच्या योगें राजराज तो दशरथ शोभे फार ! ८६

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, त्यांतला दशम हा सर्ग क्रमानें पहा. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा श्रीरामावतारनामक दहावा सर्ग समाप्त झाला असे.

---

## सर्ग अकरावा.

श्लोक.

[मा.] दशरथसुत होता राम भारी लहान,
लघुलघु झुलुपें ज्या दीसती शोभमान;
तरि मुनिवर विश्वामित्र येवोनि त्याला,

---

१ समुद्र. २ ऐरावत. ३ चंद्रवंशांत गाधि नांवाचा राजा झाला. त्याचा पुत्र विश्वामित्र होय. यानें मोठें उग्र तप केलें. त्या तपोबलानें हा क्षत्रियाचा ब्राह्मण झाला. हा वसिष्ठ ऋषीबरोबर स्पर्धा करीत असे. यानेंच आपल्या यज्ञाच्या रक्षणासाठीं राम-

नृपतिजवळि मागे यज्ञसंरक्षणाला;

[व.ति.] तेजस्विता बहुत ज्या वसते नरांत,
त्यालाचि थोर ह्मणुनी गणिती जनांत;
तो लेंकरूं जरि असे तरि लोक त्यास
संमानिती, नचि मनीं गणिती वयास. १

[शा.वि.] विद्वद्भक्त[1] महीपती सुबहुलें[2] कष्टेंहि लब्धा[3] सुता,
रामाख्या सहलक्ष्मणा[4] मुनिवरा[5] त्या होय तो अर्पिता;
कोणी येउनियां जरी स्वनिकटीं प्राणासही याचिती,
होईना रघुच्या कुलीं कधिहि ती याञ्चा तयांची[6] [7]रिती. २
"धूळी झाडुनियां, सुगंध सलिला मार्गांत सिंपा त्वरें,
माझे पुत्र तपोवनीं मुनिसवें जाया निघाले बरें;"
आज्ञा यापरि भूप जों करि चरां[8], तों तोयदांचे[9] गण,
वायुप्रेरित वर्षती सुकुसुमें, तैसें बहू जीवनं[10]. ३
बापाच्या वचनास [11]ते परिसुनी, तत्काळ दोघे जण,
भाते पाठिशिं बांधुनी, सहशरां चापां करीं घेउन,
पायीं भूपतिच्या लवोनि पडती, तेव्हां नृपाक्षींतुनी[12],
वेगें त्यांवरहीं[13] अखंडित पडे बाष्पोदकाची[14] [15]धुनी. ४

[शा.] ज्यांच्या चूडा सिक्त[16] बाष्पोदकानें जाती संगें ते ऋषीच्या त्वरेनें,
लोकांच्या दृक्पद्म[17]योगें सुरेख झालीं मार्गीं तोरणें तैं अनेक. ५

[शा.वि.] संगें लक्ष्मणमात्र घेउनि तदा रानांत रामाप्रती,
न्याया इच्छितसे मुनीश्वर, अशा हेतुमुळें भूपती;

---

लक्ष्मण यांस दशरथापासून मागून घेऊन पुढेंच आपलें यज्ञकार्य आटपून त्यांस जनकाचे घरीं सीतेचें स्वयंवर होतें तेथें नेलें. तेथें शिवधनुष्याचा भंग करून रामानें सीतेला वरिलें, अशी पुराणकथा आहे.

१ विद्वानातें भजणारा. २ मोठ्या. ३ प्राप्त झालेल्या. ४ लक्ष्मणासहित. ५ विश्वामित्राकारणें. ६ प्राणाची याचना करणारांची. ७ व्यर्थ. ८ सेवकांस. ९ मेघांचे समुदाय. १० उदक (वर्षती). ११ रामलक्ष्मण. १२ राजाच्या डोळ्यांतून. १३ रामलक्ष्मणावरही. १४ अश्रूची. १५ नदी (राम लक्ष्मण राजाचे पायीं पडले तों त्याच्या अश्रूची नदी त्यांच्यावर पडली असा पडणें या क्रियेच्या द्विरुक्तीनें चमत्कार साधला). १६ भिजल्या. १७ दृष्टिरूप पद्मांच्या योगानें.

सेना कांहिं नकोचि रक्षण करायाला स्वकीयां सुतां,
आशीर्वादचि एक योग्य ह्मणुनी, तो मात्र देइ स्वतां. ६

[शु.प्र.] नमूनी स्वमातांस ते जाति रानां, मुनीच्या पथीं शोभले चालतांना,
जसे कांतिमत्सूर्यसंक्रांतियोगें, बहू शोभती चैत्रवैशाख दोघे. ७

[शा.वि.] लाटांच्या परि चंचला भुजलता ज्यांच्या तदा शोभती,
बालत्वें चपला तरीहि विलसे त्या राघवांची गती;
वर्षाकाळि जलें प्रवृद्ध नद जे तीरासही पाडिती,
त्यांची त्या नृपबालकांस उपमा देती जगीं जे कृती. ८

विद्या दोन तईं बलाअतिबला क्षुत्तृड्व्यथानाशिनी,
त्या ह्या भूपतिच्या सुतांस शिकवी मार्गांत जातां मुनी;
मातेच्या निकटीं सुरत्नघटिता भूमीवरीही जसें
व्हावें सौख्य मुलां, तसेंचि वनि यां विद्याबलें होतसे. ९

होत्या ठाउक पूर्विंच्या बहुकथा, त्या तो मुनी तेधवां,
जातांना पथि विस्तरें वदतसे साद्यंत त्यां राघवां;
त्यायोगें सुखवाहनीं बसुनियां अक्लेश जावें जसें,
पायीं चालुनिही गमे नृपसुतां ऐकोनि गोष्टी तसें. १०

छायेनें घनवृंद, गोड सलिलें अत्यंत शीतें सरें,
कानाला सुखदायकें मधुरवें कीरादिकें पांखरें;
वायू पुष्परजें, तया अवसरीं संसेविती राघवां,
संगें त्या मुनिच्या बराच बनला हा योग हो तेधवां. ११

जीवांच्या सकलश्रमास हरिती आम्रादिवृक्षव्रज,
तैसीही उदकें जयांत पडलें फुल्लांबुजांचें रज;
यांचा दर्शनयोग होउनि घडे जें कां मुनीच्या मनीं,
त्याहूनी बहु सौख्य होय विपिनीं, त्या राघवां पाहुनी. १२

ज्यांचा देह शिवें हिमालयनगीं नेत्राग्निनें जाळिला,

---

१ तेजस्वि सूर्याच्या संक्रमणयोगानें. २ जे कुशल पुरुष (ते उपमा देती). ३ भूक व तहान यांची व्यथा दूर करणाऱ्या अशा बला व अतिबला या नांवाच्या दोन विद्या विश्वामित्रानें रामास दिल्या. ४ सरोवर. ५ प्रफुल्लित झालेल्या कमलाचें (रज). ६ ज्या कामांचा (देह).

त्याच्या रम्य तपोवनीं नृपतिचा सूनू तईं पातला;
हातीं कार्मुक आणि सुंदर तनू या हेतुनें तो दिसे,
लोकां कामचि देहवान्, परि कृती याची निराळी असे. १३

शापें यक्षिण राक्षसीच बनली, त्या ताटिकेनें स्वतां,
हा आहे पथ रुद्ध, ऐकुनि मुनीपासोनि हें तत्वतां;
दोघे राजकुमार निर्भयपणें दोरी धनुष्यांवर
लावोनी, गमना वनांत करिते झाले तईं सत्वर. १४

त्यांच्या चापरवास ऐकुनि तईं ये ताटिका शीघ्र ती,
जी कां काळिकभिन्न, कर्णयुगुलीं मुंडें जिच्या हालतीं;
आकाशीं निबिडा घनावलि जवें काळी बकीवेष्टित,
येते गर्जत, तत्समान दिसली ही राक्षसी निश्चित. १५

जीच्या तीव्रजवें पथांतिल तरू कांपावया लागले,
प्रेतांच्या वसनें जिणें निजवपू विक्राळ गुंडाळिलें;
उत्पन्ना पितृकाननीं बहुजवा वात्येपरी तेधवां,
ती रोधी रजनीचरी निजबळें रानामधें राघवा. १६

बाहू लठ्ठ व उंच फार ह्मणुनी भालाच तो भासला,
प्राण्यांचीं अंतडीं कराल दिसती त्यांची जिला मेखला;
ऐशी धांवत ये तयावरि तईं स्त्रीघातशंकेसवें,
मोठा बाण तिच्यावरी झडकरी तैं सोडिला राघवें. १७

पाषाणापरि घट्ट फार असल्या त्या ताटिकेच्या उरीं,
रामाचा शर तीव्रधार शिरुनी, मोठ्या बिळातें करी;

---

१ हिमालय पर्वतावर शिव तपश्चर्या करीत असतां त्याच्याकडे इंद्रानें कामाला पाठविलें. तो येतांच त्याला शिवानें नेत्राग्नीच्या योगें जाळून भस्म केलें अशी कथा आहे. त्या कामाचें हें वन होतें. कामासारिखा सुंदर त्रैलोक्यांत कोणी नाहीं अशी प्रसिद्धी आहे. त्या कामासारिखा राम सुंदर होता असा श्लोकतात्पर्यार्थ आहे. २ ताटिका ही मुळीं रूपानें चांगली होती. ही सुकेतुनामक यक्षाची कन्या. अगस्त्य ऋषीच्या शापामुळें हिला विक्राळ रूप प्राप्त झालें. हिचा पति सुंद. त्याजपासून हिला मारीच व सुबाहु असे दोन पुत्र झाले. ३ धनुष्याच्या शब्दास. ४ मेघपंक्ती. ५ बगळ्यांनीं वेढिलेली. ६ वस्त्रानें. ७ भयंकर. ८ स्मशानांत. ९ वाहाटुळीप्रमाणें. १० स्त्रीहत्याभयासहवर्तमान बाण सोडिला. (हा सहोक्त्यलंकार).

[1]रक्षोदेशिं मुळीं प्रवेश नव्हता ज्या [2]अंतकाचा कधीं,
झालें हें बिळ दार थोर शिरण्यासाठीं [3]तयां त्यामधीं. १८

रामाचा शर लागतांच पडली, ती ताटिका भूतळीं,
तेणें केवळ तेवढीच [4]वनभू नाहीं तईं कांपली;
ज्यानें [5]श्री स्वपराक्रमें त्रिभुवना जिंकोनि केली स्थिर,
त्या लंकापतिचीहि [6]साध्वसवशें ती कांपली थर्थर. १९

जेव्हां दुःसह [7]रामकामविशिखें वेगें [8]हृदीं ताडिली,
[9]गंधाढ्यें तंव [10]रक्तचंदनरसें होवोनि लिप्ता भली;
गेली सत्वर [11]जीवितेशसदनालागोनि [12]रात्रिचरी,
[13]अत्यार्ता [14]अभिसारिकेपरि बहू [15]ती होउनी घाबरी. २०

ऐसा देखुनियां पराक्रम मुनी जो फार संतोषला,
[16]रक्षोघ्नास्त्र समंत्रक प्रभु तयापासोनि तो पावला;
सूर्यापासुनि सूर्यकांतमणि तो काष्ठांस ज्वाळी असें,
ज्योती ज्यापरि पावतो, समयिं ह्या हें कृत्य झालें तसें. २१

तेथोनी मग येइ तो रघुपती एके स्थळालागुनी,
'हा तो पावन [17]वामनाश्रम' असें सांगे तयाला मुनी;
तेव्हां पूर्विल जन्मचेष्टित तया रामा जरीं नाठवे,
मोठी उत्सुकता तदीय हृदयामाजी तईं उद्भवे. २२

---

१ राक्षसांच्या देशांत. २ यमाचा. ३ त्या यमाला. ४ रानांतील जमीन. ५ लक्ष्मी ६ भीतियोगानें. ७ अभिसारिकापक्षीं अभिराम जो मदन त्याच्या बाणानें. ताटिकापक्षीं राम हाच काम त्याच्या बाणानें. ८ अ. प. चित्तांत. ता. प. उरस्थलांत. ९ अ. प. सुगंधयुक्तें. ता. प. दुर्गंधयुक्तें. (रसें). १० अ. प. केशर आणि चंदन यांच्या रसानें. ता. प. रक्त म्ह. रुधिर हाच चंदनरस तेणेंकरून (लिप्ता.) ११ अ. प. प्राणनाथाच्या गृहाप्रत. ता. प. यमाच्या गृहाप्रत. १२ अ. प. रात्रीं गमन करणारी. ता. प. राक्षसी. १३ अतिव्याकुळ (हाच अर्थ उभयत्र.) १४ मदनानें अत्यंत पीडित होत्साती शृंगार करून रात्रीच्या समयीं स्वतांच इष्टनायकाकडे जाणारी जी स्त्री तिला अभिसारिका म्हणतात तिच्याप्रमाणें. १५ ताटिका. १६ राक्षसनाशक अस्त्र. १७ बलीनामक एक दैत्य मोठा बलवान् व उदार झाला. त्यानें इंद्रपदप्राप्त्यर्थ शंभरावा यज्ञ आरंभिला असतां इंद्राचे हितार्थ विष्णूनें वामन अवतार घेउन बलीपाशीं त्रिपाद भूमी मागून त्यास त्रिविक्रमरूप धरून पाताळीं घातलें. त्या वामनाचा आश्रम या वनांत होता.

तेव्हां भूपसुतासवें निजवनीं वेगें मुनी पातला,
पूजापात्र हतांत घेउनि पुढें शिष्यौघ आला भला,
पर्णांचे पुट तेच अंजलि जयां ऐसे तरू शोभती,
उत्कंठें हरिणें जवें मुनिचिया तें दर्शना धांवती. २३

तेथें यज्ञ करी मुनी तंव तया ते राजपुत्र स्वतां,
विघ्नापासुनि रक्षिती शरगणीं तें पाळिनें तत्वतां,
रात्रीं आणि दिवा नभांत उदया नित्य क्रमें पावुनी,
राखीती किरणीं जसे विधुरवी लोकां तमापासुनी. २४

रक्ताचे पृथु बिंदुनी सकलही वेदी बहू दूषित
देखोनी ऋषिच्या करांतिल भयें पात्रेंहि झालीं च्युत;
कर्मे टाकुनि याज्ञिकीं तिथुनियां तें काढिलासे पळ,
ऐसी एकचि मंडपांत मुनिंची झाली तंई धांदल. २५

[भु.प्र.] पताका नभीं गृध्रपक्षोत्थवातें, तंई हालती नाहिं संख्या जयातें;
दळीं राक्षसांच्या बहू धामधूम, बघूनी वैरी काढि बाणास राम. २६

[शा.वि] मारीच्या व सुबाहुला रघुपती दोघांस मारी शर,
कांकीं हेच निशाचरांत अवध्या होते महा दुर्धर;
जिंकी वासुकिलाहि जो खगपती लोकांत मोठ्या बळें,
त्याच्या हो गणनेंत येतिल कशीं तीं तुच्छ मांडुळें! २७

वायव्यास्त्र रघूद्वहें धनुवरी अत्युग्र तें लाविलें,
जो मारीच निशाचरव्रजपती त्याच्यावरी सोडिलें;
होता पर्वतसा बहू जड तरी त्या जीर्णपर्णापरी,
अस्त्रें सहजांत दाशरथिनें तें पाडिलें भूवरी. २८

[पृ.] सुबाहु म्हणुनी दुजा निशिचर स्वमायाबळें,
तपोवनि मुनीचिया तंव इतस्ततां जो पळे;

१ पानांचे. २ द्रोण म्ह. द्रोणासारिखीं झालेलीं झाडांचीं पानें. ३ पाळीपाळीनें (क्रमानें). ४ चंद्रसूर्य. ५ लोकांस (तमापासून जसे राखिती असा अन्वय). ६ मोठमोठे. ७ गिधाडाच्या पंखांनीं उत्पन्न झालेल्या वायूनें. ८ आकाशांत. ९ गरुड. १० सापाच्या आकाराचे परंतु गरीब प्राणी आहेत. ११ राक्षससमूहाचा नायक. १२ जुन्या पानाप्रमाणें.

तयास निशितीं शरीं चिरुनि आश्रमापासुनी
दुरी रघुवरें दिलें क्षुधित पक्षियां वांटुनी. २९

[स्र]. यज्ञाचें विघ्न सारें दशरथकुमरीं यापरी नाशियेलें,
त्यांच्या तैं विक्रमाचें बहु कुलपतिच्या ऋत्विजीं स्तोत्र केलें;
अंतीं शास्त्रोक्तरीत्या क्रम मग धरूनी राहिलेल्या क्रियाही
नेल्या निर्विघ्नचित्तें सकलमुनिचिया शेवटा यौजकांहीं. ३०

[शा.वि.] दीक्षांतीं कृतमज्जना मुनिवरा केली प्रणामक्रिया
दोघांनीं, तंव हालती लघु शिखा शोभा तिहीं ये तया;
आशीर्वाद तयांस देउनि, कुशीं तैं फाटलेल्या करीं,
त्यांच्या तो कुरवाळि कौशिकऋषी सानंद पाठीवरी. ३१

[शा.] "चापारोपें कल्पिल्या जानकीच्या, लग्ना यावें शीघ्र तुह्मी तयेच्या,
ऐसें तेव्हां सादरामंत्रणाला, केलें भूपें [10]मैथिलें कौशिकाला.

[शा.वि.] यज्ञा संपवुनी, [11]विदेहनगरा जाया निघाला मुनी,
तेव्हां तो शिवचापवृत्त कथिता झाला मुळापासुनी;
त्यातें ऐकुनि रामलक्ष्मण धनू पाहावया इच्छिती,
जाणोनी मुनि हें सर्व अपुलिया ने त्या कुमारांप्रती. ३२

सायंकाळि तिघे पथा क्रमुनियां एके स्थळा पातले,
तेथें आश्रमवृक्ष रम्य बघुनी वासार्थ ते राहिले;
जेथें रूपवती तशीच युवती ऐसी [12]अहल्या सती,
इंद्राशीं रत जाहली क्षणभरी जाणून त्यातें [13]पती. ३३

---

१ "त्यांचें मौनी मुनीच्या निकट बहु तदा ऋत्विजीं स्तोत्र केलें" असें पाठांतर होय. यांत मुनीला मौन होतें म्हणून ऋत्विजांनींच रामलक्ष्मणाची स्तुती केली असा भाव आहे. २ विश्वामित्राच्या. ३ ऋत्विजांनीं. ४ यज्ञांतीं. ५ अवभृथस्नान केलेल्या (अशा मुनिवरा). ६ दर्भांनीं (फाटलेल्या म्ह० विदीर्ण झालेल्या). ७ हातानें. ८ राम-लक्ष्मणाच्या (पाठीवरी). ९ आदरयुक्त आमंत्रणाला. १० जनकराजानें. ११ जनकाच्या नगरास. १२ अहल्या ही गौतम ऋषीची स्त्री होय. ती अत्यंत रूपवती होती. तिच्याशीं इंद्रानें गौतमरूप धरून जारकर्म केलें. तें गौतमास कळून त्यानें 'तूं शिळा होऊन पडशील' म्हणून तिला शाप दिला. 'हें कर्म अजाणत मजपासून घडलें' म्हणून तिनें प्रार्थना केल्यावरून 'दाशरथिरामाच्या चरणस्पर्शानें उद्धरशील' म्हणून उःशाप दिला. ती अहल्या एथें शिळारूपानें होती. १३ इंद्रातें पती जाणून त्याशीं रत झाली असा अन्वय.

शापें होउनियां शिळा पडलि जी होती मुनीची सती,
ती जी संप्रति पावली स्वतनुची पूर्वीप्रमाणें स्थिती;
ही तों राघवपादपद्मरज जें त्याची कृपा जाणिजे,
जें कां दूर करी अघौघ अवघे संस्पर्शमात्रें निजें. ३४

आला गाधिज[1] राघवान्वित असें ऐकोनियां निश्चयें,
कामार्थां[2]समवेत धर्म[3]चि जणूं हा मूर्तिमंत स्वयें.
ऐसें मानुनियां विदेह[4]नृपती घेवोनि पाद्यादिकां,
सामोरें तंव त्यास सादर मनें तत्काळ गेला निका. ३५

आकाशावरुनी पुनर्वसु[5] हे आले जणूं भूतळीं,
ऐसें मानुनि, राघवांस नगरीवासी तईं मंडळी;
उत्कंठें अवलोकितां मधिमधीं ज्या पापण्या मीटती,
त्या येती अडव्या ह्मणोनि निमिषें[6] तीतें[7] नको वाटती. ३६

[इं.व.] समाप्त झाला नृपयाग जेव्हां, भूपास बोले मुनिवर्य तेव्हां,
"चापा पहायास बहुत राम सोत्कंठ, याचा करि पूर्ण काम. ३७

[शा.वि.] याचें जन्म महाकुलांत ह्मणुनी कन्येरा द्याया अजी,
आहे उत्तम हा; परंतु वपु तों याचें मृदू फार जी;
कैसा हा नगवील रौद्र धनुला दुःसाध्य कीं हा पण,"
ऐसें वाटुनि फार भूमिपतिचें तें खिन्न झालें मन. ३८

बोले भूपति, "थोर मत्त गज जे, त्यांतींहि जें कां जनीं
साधायास अशक्य कर्म, जरि तें इच्छी कराया मनीं
छावांही, तरि वासना विफल ती, जाती वृथा यत्न ते;
यासाठीं कलभास तें न बरवें निभ्रांत माझ्या मतें. ३९

---

१ विश्वामित्र. २ काम आणि अर्थ यांसहवर्तमान. ३ धर्म हा पुरुषार्थ. ४ जनक राजा. ५ आकाशांत पुनर्वसु नक्षत्र मोठें देदीप्यमान व सुंदर असतें त्याच्या तारा दोन आहेत. त्यांसारिखे हे रामलक्ष्मण दोघे देदीप्यमान व सुंदर होते म्हणून लोकांनीं यांस तेच पुनर्वसु खालीं आले असें मानिलें. ६ नेत्रनिमीलनें. ७ त्या मंडळीतें. ८ जनक राजाच्या घरीं शिवाचें मोठें प्रचंड धनुष्य होतें तें उचलून त्यावर जो बाण लावील त्याला आपली कन्या जी सीता ती द्यावयाची असा जनकानें पण केला होता. ९ हत्तीचा बाळ ( कराया इच्छी ) या क्रियेचा कर्ता.

[शा.] बा, त्या चापें लाजवीले नरेश, [1]ते, [2]जे ज्येच्या [3]घर्षणानें त्वचेस घट्टे केले, त्या स्वकीया भुजांला धिक्कारोनी चालले स्वालयाला." ४०

[शा.वि. बोले कौशिक यावरी, " नरपते, माझ्या वचीं [4]आयका,
आहे राम बलाढ्य थोर अवघ्या राजांहुनी हा निका,
किंवा बोलुं कशास हो! [5]अशनि तो जैसा कळे पर्वतीं,
रामाचें बल या कळेल तुझिया चापींच बा निश्चितीं." ४१

ही [6]आप्तोक्ति म्हणूनि भूप मुनिच्या वाक्या खरें मानुनी,
बोले कीं, " शिशुमाजि पौरुष वसे ऐसें घडे हो जनीं;
मोठ्या दीप्त [7]हुताशनीं क्षितितलीं जी दाहशक्ती असे,
ती अल्पा थिणगीमधेंहि वसते प्रत्यक्ष लोकां दिसे!" ४२

धाडी शीघ्र तदा विदेह नृपती तो सेवकांच्या गणां,
आणायास सभेंत शंकरधनू, सिद्धीस न्याया पणा;
वर्षाकाळि जसा स्वकीय धनुला [8]स्वर्गाधिराज स्वयें,
आविर्भूत करावयास [9]जलदां आज्ञापिती निश्चयें. ४३

जेणें सत्वर [10]विद्रुत क्रतुमृगां मारावया कारणें,
सोडी बाण [11]महेशें [12]पूर्वसमयीं सक्रोधवेगें मनें;
तें [13]सुप्ता भुजगेश्वरापरि [14]बहू विक्राळ होतें जरीं,
त्यातें देखुनि तो रघूत्तम बली तत्काळ घेई करीं! ४४

होतें तें दृढ पर्वतापरि बहू तत्रापि तो त्यावरी,
लीलेनें प्रभु रामचंद्र चढवी मौर्वीस तें सत्वरी;
पुष्पाचे धनुला जवें चढवितो [15]कंदर्प दोरी जसा,
[16]सभ्यीं विस्मितलोचनीं निरखिला श्रीराम तेव्हां तसा. ४५

जोरानें धनु ओढितां रघुवरें तत्काळ तें भंगलें,
तें वज्रापरि घोर शब्द निपजे जेणें त्रिलोकी हले;

---

१ ते (नरेश). २ जे (नरेश). ३ धनुष्याच्या दोरीच्या (घर्षणानें). ४ वचनाला. ५ वज्र. ६ आप्त म्ह० यथार्थवक्ता त्याचें वचन. ७ अग्नींत. ८ इंद्र. ९ मेघांस, १० पळालेल्या क्रतुरूप हरिणाला. ११ शिव. १२ पूर्वकालीं. १३ निजलेल्या. १४ शेषाप्रमाणें. १५ काम. १६ सभ्यांनीं.

मोठ्या क्रोधन जामदग्न्य मुनिला तो शब्द हें जाणवी,
कीं ही क्षात्रकुलांकुरास फुटली आतां नवी पालवी. ४६

त्याचें अद्भुत वीर्य जाणुनि धनुर्भंगावरोनी निकी,
रामालागि तई सभेंत नृपती दे खूप शाबासकी;
तेव्हां तो मिथिलाधिराज अपुली प्रत्यक्ष लक्ष्मीपरी
कन्या जी, तिस देउनी रघुवरा संतोषला अंतरीं. ४७

[शा.] तेव्हां राजा कौशिकाच्या समीप, आणोनीयां कन्यका सुस्वरूप,
अग्नी साक्षी ठेवुनी जेविं देती, तेवीं तीतें दीधलें रामहस्तीं. ४८

[व.ति.] " आह्मी स्वकीय तनया तुमच्या सुताला,
देवोनि सेवकपणा निमिच्या कुलाला,

---

१ जामदग्न्य मुनि म्ह० परशुराम, यानें क्षत्रियांचीं कुळें मारिलीं होतीं व तो क्षत्रियांचा अत्यंत द्वेष करीत असे, या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. २ ' क्षत्रियवंशाचा तुम्ही नाश केला खरा पण त्या वंशाला नवी पालवी म्ह० अंकुर ( रामरूप अंकुर ) फुटला बरें, संभाळा,' असेंच जसें काय या धनुष्यशब्दानें त्या कोपिष्ठ मुनीला जाणविलें अशी उत्प्रेक्षा होय. ३ जनक राजा. ४ इक्ष्वाकु राजाला शंभर पुत्र होते त्यांतून एकाचें नांव निमि होतें. यानें बहुत यज्ञ केले. एके यज्ञाचे वेळेस त्याचा कुलगुरु वशिष्ठ यास दुसऱ्याकडे गुंतल्यामुळें अवकाश नसून 'मी आल्यावर यज्ञ कर' असें त्यानें सांगितलें असतां निमीनें गौतम ऋषीस उपाध्याय करून यज्ञास आरंभ केला. पुढें वशिष्ठास राग येऊन 'तुझें देहपतन होईल' असा त्यानें निमिराजास शाप दिला. त्यानेंही तुझें देहपतन होईल म्हणून वशिष्ठास शाप दिला. त्याप्रमाणें उभयतांचेंही देहपतन झालें. पुढें ब्रह्मदेवानें दोघांसही दुसरे देह धारण करण्याची आज्ञा केली असतां वशिष्ठानें मित्रावरुणापासून दुसरा देह धारण केला. परंतु निमिराजास विदेह स्थितीच बरी वाटली म्हणून तो विदेहच राहिला. इकडे ऋत्विजांनीं निमीचा देह मंथन करून त्यांतून जो पुरुष निघाला त्याला राज्यासनीं बसविलें. त्याचें नांव मिथि. त्यानें गौतमाश्रमासमीप निमिराजाचें वैजयंत म्हणून नगर होतें तेंच आपली राजधानी केली. तेव्हां या राजाच्या नांवावरून वैजयंत नगराचेंच नांव मिथिला असें पडलें. मिथिराजाला मातेचा संबंध नसतां केवळ जनकाच्याच देहापासून झाला म्हणून त्याचें जनक हेंही नांव पडलें. याप्रकारें सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजापासून निमिकुलरूप एक स्वतंत्र शाखा झाली. त्यांत निमिपुत्र जो मिथि याचा बाप ( निमि ) विदेह झाल्यामुळें तेथून पुढें झालेल्या वंशजांस विदेह हें नांव पडलें. तसेंच मिथिलाराजाचें नांव जनक पडल्यामुळें पुढील वंशजांस जनक ही संज्ञा प्राप्त झाली. व त्याच्या नगरीचें ( वैजयंत

स्वीकारितोंच तरि होउनि यास मान्य,
कीजे मला नृपवरा जगतांत धन्य !"
ऐसा निरोप अपुल्या गुरुच्या मुखानें,
तैं धाडिला दशरथाप्रति मैथिलानें;
तो केधवां स्वसदनाप्रति रामतात
येईल, ऐसि नृप वाट असे पहात. ४९

[शा.] "मातें आतां चांगली सून यावी," ऐसें राजा जो मनामाजि भावी;
इष्टार्थाच्या सिद्धिचा तो निरोप घेवोनी ये विप्र तेथें अपाप.
जें जें चित्तीं इच्छिती पुण्यवंत, तें तें त्यांचें सिद्ध होतें क्षणांत;
इच्छावें जें कल्पवृक्षासमीप, तें तत्काळीं प्राप्त होतें अमूप;
तैसी इच्छा संप्रती राजयाची, तत्काळीं ती जाय सिद्धीस त्याची;
विप्राची त्या अर्घ्यपाद्यादि पूजा, सद्भावानें तैं करी शीघ्र राजा. ५०

[शा.वि.] पूजा घेउनियां नृपास मुनिनें संदेश सांगीतला,
तो ऐकोनि तयास फार हृदयीं संतोषही वाटला;
तेव्हां थोर चमूस घेउनि निघे तो इंद्रमित्र स्वतां,
तैं मोठा धुरळा उडोनि, रविला तो जाहला झांकिता. ५१
सेना घेउनि भूमिपाल मिथिलेलागीं त्वरें पावला,
बाहेरूनि तया पुरीसभंवता वेढा तिनें घातला;
बाहूंनीं अवळी पती, तरि वधू संतोष पावे जसा,
तैसा मित्रकृतावरोध पुरिला हा वाटला इष्टसा. ५२
त्याकाळीं वरुणेंद्रसे उभयतां त्या पत्तनीं भूपती,
अन्योन्याप्रति तोषपूर्वक समारंभें बहू भेटती;
खर्चोनी विभवानुसार अपुल्या द्रव्यास ते सादर,
कन्यापुत्रविवाहकार्य करिते झाले तईं सत्वर. ५३

---

नगराचें) नांव मिथिला पडल्यापासून त्या नगरीच्या राजांस मैथिल असें म्हणूं लागले. मिथिराजाच्या संबंधानें साऱ्या विदेह देशाला ही मैथिल अशी संज्ञा प्राप्त झाली असें म्हणतात. हा मैथिल किंवा विदेह देश हल्लींचा गोरखपूर प्रांत होय असें मत आहे. त्या प्रांतांतच हल्लीं जनकपुर म्हणून शहर आहे असें सांगतात.

१ हे राजश्रेष्ठा. २ जनकानें. ३ इंद्राचा मित्र. ४ मित्रानें केलेला अवरोध.

[व.ति.] सीतेस राम, अणि लक्ष्मण ऊर्मिलेला,
भ्राते तदन्याहि[1] कुशध्वजकन्यकांला,[2]
ऐसे युवे दशरथात्मज चारही ते,
झाले नरेश्वरसुतांप्रति[3] तें वरीते. ५४

ऐसे वधूस वरुनी सुत भूपतीचे,
लोकांत फार दिसती रमणीय साचे,
सामादि त्या नृपतिचेचि उपाय चारी,
लोकीं विराजति सांसिद्धिक[4] जेविं भारी. ५५

[रथो.] कन्यका नृपसुतीं[5] तसे भले, तेहि[6] त्यांहिं[7] तंव फार शोभले,
होय तो वरवधूसमागम, प्रत्ययप्रकृतिवत्[8] मनोरम. ५६

[शा.] ऐसीं चाऱ्हीं लग्नकार्यें सुतांचीं, संपादूनी भूपती उत्सवाचीं,[9]
जाया लागे जैं निजा पत्तनाला, व्याही त्याला पोंचवाया निघाला;
भूपासंगें जाउनी तो त्रिरात्र, मागें सीतातात[10] ये सच्चरित्र,
व्हावा तैसा जांवई हा मिळाला, एणें त्याला फार आनंद झाला. ५७

[शा.वि.] त्याकाळीं प्रतिकूळ वायु सुटुनी भारीं उडालें रज,
मोडोनी पडले कडाकड तईं उत्तुंग[11] सेनाध्वज;
मोठा पूर नदीस येउनि पहा पर्यंतभूमी[12] जसी
होते नष्ट पळांत, भूपचमुची झाली अवस्था तसी. ५८

[इं.व.] नभामधें त्यासमयीं विलक्षण, झाली स्थिती जी गणिती कुलक्षण,
खळें रवीच्या भंवतें भयासुर, देखोनि भीतिप्रति पावले नर;
तार्क्ष्यें[13] हता[14] कुंडलिच्या[15] जसा च्युत,[16] होतो मणी मस्तकिंहूनि निश्चित,
तो त्यांचि[17] देहें जंव वेष्टिला असे, खळ्यामधें सूर्य तईं तसा दिसे. ५९

[स्र.] श्येनांच्या[18] पक्षपंक्ती[19] मळकट असती फार ज्या, केश तेची,

१ रामलक्ष्मणाहून इतर ( भरत शत्रुघ्न ). २ कुशध्वजाच्या कन्यांस. ३ राजकन्यांस. ४ सिद्धियुक्त. ५ राजपुत्रांच्या योगानें ( कन्या शोभल्या ). ६ राजपुत्रही. ७ त्या राजकन्यांचा योगानें. ८ प्रत्यय आणि प्रकृति यांच्या समागमासारिखा ( मनोरम ). ९ लग्नकार्याचें ( विशेषण ). १० जनक. ११ उंच. १२ आसपासची जमीन. १३ गरुडानें. १४ मारलेल्या. १५ सर्पाच्या. १६ भ्रष्ट. १७ त्या मृतसर्पाच्या ( देहें ). १८ श्येन पक्ष्याच्या. १९ पंखांच्या ओळी.

संध्याकालीन अभ्रें अरुण दिसलिं तीं आर्द्र वस्त्रें जयांचीं;
ऐशा साऱ्या दिशा तैं मलिन ऋतुमती कामिनी भासल्या या
लोकांना, ज्या अयोग्या बहुतचि असती लोचनांनीं पहाया. ६०

[व.ति.] तैं ज्या दिशेस रवि त्याच दिशेकडेस,
भालू भयानक अशा करिती स्वनास,
"मारोनि बाहुजकुलास बळें स्वहस्तें,
रक्तें तुह्मी करितसां पितृतर्पणातें;
तो संधि सन्निध पहा अजि पातला कीं,
ऐसा न येईल पुनश्च कदापि लोकीं,"
हें जामदग्न्यमुनिला कळवावयाला,
जाणो अशा रितिच काढिति त्या स्वराला. ६१

[स्र.] ऐसे उत्पात मोठे निरखुनि नृपती येइ चित्तीं भयाला,
"यांची शांती करावी" ह्मणुनि विनविता जाहला तो गुरूला,
त्याकाळीं तो वशिष्ठ क्षितिपतिस वदे, "भूपते, सोड भीती,
उत्पातांपासुनीयां फल शुभचि नृपा देख होईल अंतीं." ६२
ऐसें ते बोलती तों प्रकट बहुजवें होय सेनेसमोर
तेजाचा लोक मोठा, वनदहन जणूं पातला तेथ घोर;
सेनानेते नृपाचे नयन पुसुनियां पाहती जों तयाला,
तों कोणी एक मोठा पुरुषचि सहसा लोचना पात्र झाला. ६३
बापाच्या पूत अंशां धरि निजगलिं तो नाम ज्या यज्ञसूत्र,

---

१ रजस्वला स्त्रिया. २ कोल्ह्या. ३ क्षत्रियकुलास. ४ भालू. (कथिती). ५ वणवा. ६ जमदग्नी ऋषीला रेणुनामक राजानें आपली कन्या रेणुका हिला दिलें होतें तिचे पोटीं जमदग्नी ऋषीपासून झालेला जो पुत्र त्याचें नांव परशुराम प्रसिद्ध आहे. हा विष्णूच्या मत्स्यादि दहा अवतारांपैकीं सहावा त्रेतायुगांत झाला. याचा बाप ब्राह्मण व माता क्षत्रिय म्हणून याच्यांत दोन ही प्रकारचीं म्हणजे ब्राह्म व क्षात्र अशीं तेजें होतीं. कार्तवीर्य राजानें जमदग्नीची कामधेनू बलात्कारानें नेली म्हणून यानें त्यास ठार मारून धेनु परत आणिली. कार्तवीर्याच्या पुत्रांनीं जमदग्नि ऋषीला ठार मारिलें ह्मणून परशुरामाला अत्यंत कोप येऊन त्यानें त्या सर्वांस ठार मारून त्यावेळचे सर्व क्षत्रिय राजे मारून त्यांच्या रक्तानें आपल्या पितरांचें तर्पण केलें. जनक राजा मोठा शैव व ब्रह्मनिष्ठ होता म्हणून परशुरामानें त्याची उपेक्षा केली. परशुरामही

मातेचा अंश तैसा धनु विदित जनीं घे करीं तें विचित्र;
चंद्रानें युक्त भासे दिनकर अणखी चंदनद्रू अहीनें,
तैसा सत्वें रजें ही सहित पुरुष तो पाहिला तें जनानें. ६४

बापाला कोप आला ह्मणवुनि न सुचे त्यास कर्तव्य कांहीं,
योग्यायोग्य व्यवस्था सुटुनि तंव बहू होय तो भ्रांत पाहीं;
त्याच्या आज्ञेवरोनी करि निजजननीमस्तकच्छेद वेगें,
ऐसी जिंकी दया जो प्रथम मग मही सर्वही शस्त्रयोगें. ६५

[शा.वि.] श्रीमच्छंकरभक्ति-सूचक अशी रुद्राक्षमाला भली,
सूत्रप्रोत तई यदीय उजव्या कानांवरी शोभली;
जीं एकाधिक वीसवार वधिलीं दुःक्षत्रियांचीं कुळें,
ती संख्या समजो ह्मणोनि तितुके जाणो मणी ओंविले. ६६

बापाला वधिलें ह्मणुनि चढला कोपास जो निश्चित,
जेणें क्षत्रियवंशनाशकरणीं दीक्षा असे स्वीकृत;
ऐसा दारुण वैरि हा, तनय तों चारीहि ते लेंकरें!
ज्ञात्याऱ्यास असा प्रसंग बघुनी, आंगीं भरे कांपरें. ६७

पुत्राची तशि शत्रुचीहि अभिधा विख्यात तें 'राम' ही,
ती त्या भूपतिला गमे प्रिय तसी देई मना भीति ही;
हारांतील मणी बहूत करिती आल्हाद जे निश्चयें,
तेच व्यालफणावरी निरखितां चित्तास देती भयें. ६८

तेव्हां बोलत, "अर्घ्य, अर्घ्य" ह्मणुनी भूपाल त्याच्या पुढें
येई सादर तो, परंतु मुनि तो पाहीच ना त्याकडे;
डोळे विंगळसे जयांत फिरती तें गर्गरा तारका,
ऐसा तो ऋषि राम जेथ तिथ ये भूपालकां मारका. ६९

---

मोठा शैव होता. परशुरामाच्या गर्दीत जी बाळें क्षत्रियांच्या बायकांनीं ऋषींच्या आश्रमांत आणून सोडिलीं तीं व ज्या कोणी बायकांचा वेष घेतला असले मात्र त्याच्या तडाख्यांतून वांचले. पुढें दाशरथी रामाची गांठ पडल्यावर त्यांतील विष्णुतेज रामांत प्रविष्ट झालें अशी कथा आहे. ७ आपल्या कंठांत.

१ चंदन वृक्ष. २ सर्पानें. ३ सुतांत ओवलेली. ४ दुष्ट क्षत्रियांचीं. ५ राजांस मारणारा (असा परशुराम).

मुष्टीमाजि धरी महा धनु, तसें घे अंगुलीनीं शरा,
मोठ्या क्रोधन जामदग्न्य मुनिला युद्धार्थ झाली त्वरा,
तेव्हां निर्भयचित्त राम मुनिच्या अग्रीं उभा राहिला,
त्याला भार्गवराम कोपुनि बहू ऐसा परी बोलिला. ७०

[शा.] "माझ्या बापा मारिलें क्षत्रियांनीं, तेणें माझी जाहली थोर हानी,
म्याही त्यांना स्वर्गसंख्याकवेळां, मारोनीयां कोप शांतीस नेला;
आतां सुप्ता भोगिला दंडघात, होतां जैसा कोपतो तो क्षणांत,
तैसा तुझ्या ऐकुनी विक्रमाला, माझ्या चित्तीं फार संक्षोभ झाला. ७१

[शा.वि.] कोण्याही नृपतीस जें नमवितां आलें नसे कार्मुक,
तें त्वां मोडुनि टाकिलें परिसुनी हें वाटतें कौतुक;
ही वार्ता जरि सत्य होय तरि हा माझाच वीर्यध्वज,
झाला भग्न, असें मनांत अपुल्या रे कल्पितों मी अज. ७२

[मं.क्रां.] कोणी पूर्वीं जरि मुखिं वदे राम हा शब्द जाणें,
बोधें क्षोणीवरिहि अवध्या होई माझाच तेणें;
आतां तूझ्या उदयसमयीं अन्य ही वाच्य त्याचें,
जाणोनीयां मम मन बहू पावतें लाज साचें. ७३

[शा.वि.] फोडी पर्वत ही अशा सुकठिना अस्त्रा धरी जो करीं,
त्या माझे अपराधकारक रिपू दोघेच भूमीवरी;
धेनूच्या हरणा करी मदवशें तो एक रे हैहय,
मत्कीर्ती हरुं पाहसी म्हणुनि तूं होसी दुजा निर्भय. ७४

दुष्टक्षत्रियवंशघातक असें मद्वीर्य मोठें जरीं,
मातें देइ न तोष, म्या न तुजला रे जिंकिलें जोंवरी;
अग्नीचें बल तेंचि सत्य गणिजे जें सागराभ्यंतरीं,
वेगें तो जळतो, महांतृणचयीं जैसा जळे सत्वरीं. ७५

तेजानें हरिच्याचि शंकरधनू झालें अधीं दुर्बळ,

---

१ परशुरामाला. २ एकवीस वेळा. ३ निजलेल्या. ४ सर्पाला. ५ वीर्यरूप ध्वज. ६ मह ( माझाच ). ७ हैहय राजा याचेंच नांव कार्तवीर्य. याला सहस्र बाहू होते म्हणून सहस्रार्जुन ही याचें नांव प्रसिद्ध आहे. यास परशुरामानें मारिलें. ८ अग्नी. ९ मोठ्या गवताच्या गंजांत. १० विष्णूच्या.

त्याला मोडुनियां जगांत अपुलें त्वां दाविलें कीं बळ;
वेगानें नदिच्या मुळींच खणुनी केलें जयाला ढिलें,
त्या झाडा हलकाहि वायु उपडी, तैसेंचि हें जाहलें. ७६
माझें घेउनि हें धनुष्य, चढवी दोरीस त्याच्यावरी,
त्यातें लावुनियां शरा निजकरें आकर्षणातें करीं;
ऐसें तूं करिशी तरीं समबळी जाणोनि एणेंचि बा,
झालों मी जित जाण, युद्ध मग रे कैचें सहे राघवा. ७७
किंवा हा अतितीव्रधार परशू तेजाळ माझ्या करीं,
पाहोनी कुमरा जरीं भय बहू घेशील रे अंतरीं;
झाल्या व्यर्थचि मौर्वि घांसुनि दृढा जाणें तुझ्या अंगुली,
व्हाया निर्भय, ये मला शरण तूं होवोनि बद्धांजली." ७८

[व.ति.] ऐसा भयंकर वदे जमदग्निपुत्र,
गालीं हंसोनि तंव दाशरथी पवित्र,
बोले न अक्षर परी करिं घे धनूला,
[१]तें उत्तरस्थलिच होय तया मुनीला. ७९

[शा.वि.] रामें पूर्विल जन्मिचें निज धनू हातांमधें घेतलें,
त्यायोगें सकलां शरीर पहिल्यापेक्षां दिसे चांगलें;
आकाशीं नव वारिवाह मुळचा शोभाळ जो कां असे,
त्याला इंद्रशरासनें अधिकची शोभा न कैसी दिसे. ८०

[इं.व.] भूमीवरी टेंकुनि एक टोंक, केलें तयें सज्य धनुष्य देख,
अंगार जेवीं विझतो तसाच, निस्तेज झाला नृपशत्रु साच. ८१

[स्र.] अन्योन्यांच्या समीप प्रथितगुण जगीं तिष्ठती तेथ दोघे,
एकाची कांति वाढे, गतरुचि दुसरा जाहला खेदयोगें;
संध्याकाळीं जनाला दिसति शशिरवी पूर्णिमेला नभांत,
तैसे हे राम आणी परशुधर मुनी देखिले त्या वनांत. ८२

[शा.वि.] झाला कुंठितशक्ति हा मजपुढें विख्यातकीर्ती मुनी,
ऐसें पाहुनियां द्रवे रघुपती चित्तामधें तेक्षणीं;

---

१ धनुष्य करांत घेणेंच. २ उत्तराच्या ठिकाणीं. ३ मेघ. ४ इंद्रधनुष्यानें. ५ परशराम. ६ चंद्रसूर्य.

हा आहे अनुकंप्य, आणि शर हा नोहेचि माझा वृथा,
हें चिंतूनि विशाखसा प्रभु वदे लक्षूनि तो सत्पथा. ८३
"आहेसी अपकारकारक तरी तूं विप्र या हेतुनें
मातें शस्त्र तुझ्यावरी न धरवे हें निर्दयेंही मनें;
आतां बंद करूं त्वदीय गतिला बाणें यया सत्वर,
किंवा नासुं तुझ्या मखार्जित फला ? वा शीघ्र दे उत्तर."८४
दे प्रत्युत्तर तो ययावरि मुनी, "आहेस तूं ईश्वर,
हें मी जाणतसें, जनावन करूं आलास ह्या भूवर;
पाहावें तव धाम वैष्णव इथें हें आणुनीयां मनीं,
तूतें कोपविलें असे प्रभुवरा, म्या आजि वा जाणुनी. ८५

[स्र.] बापाचे वैरि सारे निजबलदहनें जाळुनी भस्म केले,
सत्पात्रां विप्रवर्यां बघुनि सजलधिक्षोणितें अर्पियेलें;
आतां हा जो परेशा परिभव घडला आज माझ्या बलाचा,
तो ही विश्वेशं हस्तें तव, ह्मणुनि मला वाटतो श्लाघ्य साचा.८६

[शा.वि.] पुण्यक्षेत्र पवित्र तीर्थगण जो राहे प्रभो भूतलीं,
तद्यात्रा करण्यास वा गति मला जी पाहिजे ते भली;
ती रक्षी, मग देवलोकगतिही केली जरी नाहिंसी,
वाटेना मज दुःख, कारण, नसे भोग स्पृहा मानसीं." ८७

[शि.] "बरें आहे" ऐसें वदुनि रघुनाथ द्विजवरा,
त्यजी तो प्रागास्य प्रभुवर उभा राहुनि शरा;
महा पुण्यात्मा तो मुनि तरिहि तत्स्वर्गगतिला,
तई झाला मोठा स्थिरपरिघ दुर्लंघ्य मुनिला. ८८

[शा.वि.] श्रीराम प्रभु पर्शुराममुनिच्या, तैं पादपद्मीं शिरा,
ठेवोनी विनयें वदे, "द्विजवरा स्वामी, क्षमेतें करा;
लोकामाजि बलाढ्य मानव रणीं जिंकोनि ही शत्रुला,
सद्भावें नमिती तरी नमन तें देतें बहू कीर्तिला. ८९

---

१ करुणापात्र. २ षडाननासारिखा. ३ यज्ञांनीं संपादित जें फल त्यास. ४ जनाचें रक्षण. ५ स्वबलरूप अग्नीनें. ६ समुद्रासहित पृथ्वीतें. ७ हें संबोधन. ८ तुझ्या (हस्तें). ९ पूर्वाभिमुख. १० न हालणारा (परिघ).

[व.ति.] मात्रंशे[1] राजसपणा मम घालवीला,
पित्रंशे[2] सात्विकपणा मज अर्पियेला,
हा निग्रहस्फुट तुवां जरि थोर केला,
माझ्यावरी शुभ अनुग्रहरूप झाला. ९०

[शा.वि.] येतों मी रघुनायका, तव असे जें कार्य देवेप्सित[3],
विघ्नांवांचुनि तें समाप्तिस विभो, जावो सदा निश्चित;"
ऐसें बोलुनियां सलक्ष्मण अशा श्रीरामचंद्राप्रती,
झाला तेक्षणि गुप्त भार्गवमुनी जाणे जयाला क्षिती[4]. ९१

तो गेल्यावरि, भूप रामविजया देखोनि संतोषला,
आलिंगोनि तया ह्मणे, "तनय हा माझा पुन्हा जन्मला;"
येई जों वणवा समीप तरुच्या, तों वृष्टि होते जशी,
मोठें विघ्न टळोनि, भूमिपतिची झाली अवस्था तशी. ९२

सौधें सुंदर थोर थोर रचिलीं जेथें अशा सत्पथीं,
कांहीं काढुनि काळ शंभुसम तो ये पत्तनीं[5] भूपती;
तेव्हां ज्या खिडक्यांमधूनि बघती सीतेस पौरांगना,
तन्नेत्रें कुमुदेंचि हीं उगवलीं तेथें, गमे हें जनां. ९३

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशनामक महाकाव्य प्रयत्नें महा
केलें प्राकृत, त्यांतलाचि अकरावा सर्ग हाही पहा. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा सीताविवाहवर्णननामक एकादश सर्ग समाप्त झाला असे.

---

१ मातेचा अंश. २ पित्याचा अंश. ३ देवांनीं इच्छिलेलें. ४ पृथ्वी ( जाणते ). ५ अयोध्येस. 'स्वा पुरा' असें पाठांतर जाणावें.

# सर्ग बारावा.

## साक्या.

विषयस्नेहा यथेष्ट रीत्या भोगुनियां चिरकाळ,
दशावसानाप्रती पावला दशरथ भूमीपाळ;
निर्वाणाचा समय निकट तें असे पातला त्यास,
वाटे ह्मणुनि प्रभात दीपासमान तो लोकांस. १
कैकेयीच्या भयें जैरा जणुं लागुनियां कानांसीं,
पलितव्याजें वदे नृपाला, "राज्य देइ रामासीं." २
श्रीरामाच्या अभिषेकाची वार्ता ती लोकांस,
पाट जसा वृक्षांस, तसा दे तोप प्रत्येकास. ३
अभिषेकाच्या संभाराला कैकेयी ती क्रूर,
भूपाळाच्या शोकाश्रूंनीं दूषित करि तें फार. ४
पर्जन्यानें भिजूनि भूमी बिळांतील सर्पास,
जसी लोटिते वरतीं सत्वर बाहेरी जायास;
पतिनें आश्वासितां तसी ती पूर्वींचे वैर दोन,
मनांत होते त्यां बाहेरी काढी तोंडांतून. ५

---

१ दशरथपक्षीं विषय म्हणजे रूपरसादिक हेच स्नेह यांचा; दीपपक्षीं विषय म्ह० देश अर्थात् पात्र त्यांतील स्नेह म्ह० तैल त्याचा. २ दशरथपक्षीं दशा म्ह० वयोवस्था तिच्या अवसानाप्रत म्ह० वृद्धत्वाप्रत; दीपपक्षीं दशा म्ह० वात तिच्या अवसानाप्रत. ३ दशरथपक्षीं निर्वाणाचा म्ह० मरणाचा; दीपपक्षीं निर्वाणाचा म्ह० मालवण्याचा. ४ या पद्यांत विषयस्नेहोपभोग, दशावसानप्राप्ति आणि निर्वाणसमयनिकटता या धर्मांनीं श्लेषेंकरून दशरथाचें व प्रातःकाळच्या दीपाचें साम्य वर्णिलें आहे. ५ पलित म्ह० केशादिकांला जरेमुळें पांढरेपणा येतो तें त्या पलिताच्या व्याजें म्ह० मिषानें. ६ आपली वृद्धावस्था झाली, आतां राज्य रामाच्या स्वाधीन करावें असें दशरथास वाटलें त्यावर, जरेनेंच पलितमिषानें कैकयीच्या शंकेनें कानांशीं येऊन असें करायास सांगितलें काय अशी उत्प्रेक्षा केली. ७ कैकेयीवर दशरथ राजा संतुष्ट होऊन तिला दोन वर देऊं लागला तेव्हां मला गरज पडेल तेव्हां ते मी घेईन असें तिनें राजास सांगितलें. ते दोन वर तिनें रामाभिषेककालीं दशरथापासून मागून घेतले. त्यांत एकानें भरतास राज्य व दुसऱ्यानें रामास चौदा वर्षें वनवास असें मागून घेतलें.

दोहोंपैकीं एकवरानें लावी ती रामाला,
चौदावर्षें गहनकाननामध्यें हिंडायाला;
दुजे वरानें राज्य आपुल्या पुत्रासाठीं मागे,
वैधव्याचें दुःख तयेला झालें ज्याच्या योगें. ६
पूर्वी तातें दिली मेदिनी साश्रुमुखें तो घेई,
वनवासाची आज्ञा ऐकुनि तुष्ट मनीं तो होई! ७
मंगलवस्त्रांपरी वल्कलें धारण करितां त्यास,
समान वृत्ती पाहुनि विस्मय झाला फार जनास. ८
लक्ष्मण आणिक जनकनंदिनी यांस घेउनी संगें,
राम दंडकारण्यि[1] जाय तो ताताज्ञेनें वेगें;
अशा कृतीनें रामें ताता सत्यपथीं राखीलें,
जाणुनियां हें सर्वहि सज्जन तुष्ट मानसीं झाले. ९
राजाला सुतविरह सोसण्यापेक्षां मुनि शापाची,
देहत्यागें योग्य वाटली तदा निष्कृती साची. १०
कुमार देशांतरीं, भूपती स्वर्गालागीं गेला,
राज्यावरती हात घालण्या संधि मिळे वैऱ्याला. ११
मातुलगेहा[2] अमात्यवर्गें धाडुनि कुलीन दूत,
कळूं न देतां वृत्त आणिला भरत नम्र अत्यंत. १२
जनकमृत्युचा[3] प्रकार परिसुनि केवळ नचि जननीचा,
तिरस्कार करि, परी करी तो तसाच राज्यश्रीचा[4]. १३
ससैन्य रामाकडे जाय तों वसतिद्रुम[5] रामाचे,
वनचरदर्शित[6] देखुनि पाणी ये नेत्रीं भरताचे. १४
चित्रकूटगिरिवनांत[7] राही, रामचंद्र जो त्याला,
पितृमरणाचें वृत्त सकळही भरत कळविता झाला;

---

१ दंडकारण्यांत. २ भरताचा मामा युधाजित म्हणून होता त्याच्या घरीं त्या वेळेस भरत होता म्हणून तेथें आणायास पाठविलें. ३ बापाच्या मरणाचा. ४ राज्यलक्ष्मीचा. ५ राहाण्याच्या ठिकाणचीं झाडें. ६ किरातांनीं दाखविलेले (वसति द्रुम). ७ प्रयागापासून दाहा कोसांच्या अंतरावर हा पर्वत आहे. याच्या उत्तरेकडे मंदाकिनी नदी आहे.

अननुभूत लक्ष्मीच्या द्वारें विनवी तो रामास,
कीं "भोगाया हिला चलावें शीघ्र तुवां नगरास. १५
ज्येष्ठबंधुच्या पूर्वी करितां राज्यश्रीस्वीकार,
परिवेत्ता[1] मी होइन" ऐसें मानि भरत साचार. १६
स्वर्गत गुरुच्या आज्ञेपासुन रामा परतविण्याला,
कैकेयीचा नंदन तेव्हां भरत न समर्थ झाला;
खिन्न मानसीं होउनि मग तो जोडुनि करयुगुलास,
ह्मणे "पादुका तरी मला द्या राज्यीं स्थापायास." १७
स्वीकारोनी वचन तयाचें रामानें भरताला,
निरोप दिधला तेव्हां तेथुनि तोही मागें आला;
पुरीं न जातां विरक्तचित्तीं नंदिग्रामीं[2] राही,
ठेवा जैसा संभाळावा तसें राज्य तो पाही. १८
ज्येष्ठाची तो फार भक्ति करि, राज्यभोग टाकून,
मातृपातक प्रायश्चित्ता[3] करि जणुं तो जाणून! १९
बंधु स्त्री यांसवें रामही धरोनि शांती चित्तीं,
मूलफलें भक्षुनि राहिला वनामधें मुनिवृत्ती,
इक्ष्वाकूचे वंशज धरिते झाले वृत्ती वैन्य[4]
वृद्धपणीं, परि रामचंद्र हा तरुणपणांतचि धन्य. २०
निजप्रभावें स्थिरा करुनियां छाया तरुची एका,
त्याचे खालीं एके दिवसीं बसलीं दोघें देखा;
अंगीं थोडा श्रम झाल्याचा भाव दावुनी तो कीं,
राम निजे ठेवूनि मस्तका तें सीतेच्या अंकीं. २१
इंद्रपुत्र[5] कावळा येउनी सीतेच्या स्तनभागा,
दुष्ट आपुल्या नखें खरवडी निर्दय तेथिल जागा;

---

१ ज्येष्ठ बंधूच्या आधीं जो लग्न करितो त्यास परिवेत्ता म्हणतात. २ अयोध्येच्या जवळ नंदिग्राम म्हणून गांव होता. ३ आईनें केलेल्या पापाचें प्रायश्चित्त (करि जणुं). ऋषीप्रमाणें वृत्ती धरून. ४ वन्य वृत्ती (वनवास). ५ या कावळ्याला ऐंद्रकाक इंद्रपुत्र असें म्हटलें आहे. यानें सीतेच्या स्तनप्रदेशास उपद्रव केला असें म्हणतात.

रामाचीं नखचिन्हें जीं कां पूर्वी तेथें होतीं,
स्वबुद्धिनें तो सदोष मानुनि खोडी। वाटे चित्तीं. २२
सीता जागें करी तई [1]तो टाकि इषीकास्त्रास[2],
एक अक्षिच्या[3] व्ययें रक्षि तो पैंक्षी[4] तें अपणास. २३
"जवळ रहातों ह्मणुनि कदाचित् भरत पुन्हां येईल,
यावें नगराप्रती ह्मणोनी मला अणिक विनवील;"
ऐसी शंका मनीं आणुनी चित्रकूट सोडोनी,
जाई, तेथिल मृगांस मोठी उत्कंठा देवोनी. २४
अतिथीविषयीं साधु असे जे मुनी वसति रानांत,
तदाश्रमीं राहात चालिला दक्षिणदिग्भागांत;
पर्जन्याच्या नक्षत्रांत प्रवेशूनि ओघानें,
जाय दक्षिणे सूर्य तसें हें केलें तंव रामानें. २५
रामाला अनुसरोनि विलसे तई जानकी तैसी,
कैकेयी[5] वारितही शोभे गुणलुब्धश्री जैसी. २६
अनसूया[6] दे सुगंधशाली अंगराग सीतेला,
भृंगसंघ वनि पुष्पांवरला जेणें चंचल केला. २७
संध्याभ्रापरि पिंगट राक्षस विराध[7] नावें त्याला,
चंद्राला राहुसा, अकस्मात् मार्गी अडवा आला. २८
श्रावणभाद्रामधें दृष्टिला हरितो[8]वग्रह[9] जैसा,
रामलक्ष्मणामधें जनकजे हरी निशाचर तैसा. २९
त्या दोघांनीं मारुनि त्याला, दुर्गंधें पृथ्वीतें,
दूषिल यास्तव पुरुनि टाकिलें भूमीमध्यें त्यातें. ३०

---

१ राम. २ इषीका म्हणून एक जातीचें तृण आहे त्याची काडी अभिमंत्रित करून कावळ्यावर टाकिली तें इषीकास्त्र. ३ त्या अस्त्रापासून त्या कावळ्याचा एक डोळा फुटला, मेला नाहीं असा अर्थ. ( एथें क्ष अक्षराचा अनुप्रास साधला आहे.) ४ तो कावळा. ५ कैकेयीनें निषिद्ध केलेली अशी ही गुणलुब्ध श्री म्हणजे राजलक्ष्मी ती. जशी रामाला अनुसरून शोभली तसीच जानकी ही रामाला अनुसरून शोभती झाली असा अर्थ. ६ अत्रि ऋषीची स्त्री अनुसूया होय. ही महापतिव्रता अशी हिची ख्याति आहे. तिनें सीतेला बाधा न व्हावी म्हणून एक प्रकारचा अंगराग म्हणजे उटणें दिलें होतें. ७ विराध नांवाचा एक राक्षस. ८ रामाला. ९ अवर्षणकारक योग.

मर्यादेच्या स्थितींत पूर्वीं विंध्याद्री कां जैसा,
पंचवटीमधिं राम राहिला अगस्तिवचनें तैसा. ३१
उष्णार्ता नागिणी चंदना, शूर्पणखा ही तैसी,
कामव्यग्रा तेथ पातली लक्षुनियां रामासीं. ३२
सीता सन्निध असतांनाही प्रार्थी रामाला ती,
काम माजला स्त्रीचा मग त्या काळवेळ ह्या नसती, ३३
"मला बायको असे, सुंदरी, वर तूं मम अनुजास,"
रामें कथिलें तईं असें त्या कामुक शूर्पणखेस. ३४
पूर्वीं ज्येष्ठाकडे जाय ती ह्मणोनि लक्ष्मण तीतें
नकारि, तेव्हां पुनश्च रामाकडे पातली स्त्री ते;
उभयतटाका धरुनि चालते नदीच वर्षाकाळीं,
शूर्पणखेची तसी अवस्था संप्रति होती झाली. ३५
हें देखुनियां हंसे जानकी त्या हास्यानें तीस,
जरी सौम्य पळमात्र असे तरि नेलें संक्षोभास;
वायू नसल्यामुळें क्षणभरी शांत जलधिची वेला,
चंद्रोदय होतांच जशी कां पावे संक्षोभाला. ३६
"हंसे व्याघ्रिला हरिणी तैसें तुझें कृत्य हें साचें,

---

१ विंध्याद्री पर्वत वाढत असून सूर्यादिकांच्या गतीस रुद्ध करिता झाला, तेव्हां त्याचा गुरु अगस्ति ऋषि याची देवादिकांनीं प्रार्थना केल्यावरून त्यानें या पर्वताकडे येणें केलें, त्यास पाहून पर्वतानें दंडवत नमस्कार घातला, तेव्हां 'मी परत येईपर्यंत तूं असाच रहा' असें सांगून अगस्ति ऋषि दक्षिणेस आला; या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. २ अगस्ति किंवा अगस्त्य हा ऋषि प्रसिद्ध आहे. यानें एके चुळानें समुद्रास पिवून टाकिलें, तसेच आतापी वातापी आणि दुसरेही बहुत राक्षस यानें मारिले. हा कुंभापासून झाला म्हणून यास कुंभयोनि असेंही नांव आहे. विंध्याद्री आकाशांत वाढत असतां हा देवादिकांच्या प्रार्थनेवरून त्याजपाशीं येतांच तो दंडवत् पडला. तेव्हां यानें त्यास परत येईपर्यंत असेंच दंडवत् राहण्यास सांगितलें. त्यावरून तो पर्वत तसाच अद्यापि आहे असें वर्णन आहे. याच ऋषीच्या बायकोचें नांव लोपामुद्रा. ३ उष्णानें आर्त म्हणजे व्याकुळ झालेली जी नागीण म्हणजे सर्पीण ती जशी चंदनाला लक्षून जाते, तशी कामातुर शूर्पणखा रामाला लक्षून तेथें आली असा अर्थ. ४ शूर्पणखा नांवाची राक्षसी ही रावणाची बहीण होती.

अगे, शीघ्र पावशील फल तूं माझ्या उपहासाचें." ३७
तइँ जनकनंदिनी पाउनी मनीं थोर भीती कीं,
मिठी घालुनी गच्च बैसली रामाच्या ती अंकीं;
शूर्पणखा ही असें बोलुनी वचन तयेला क्रूर,
स्वकीय नामा योग्य असें ती दावि रूप अति घोर. ३८
पहिल्यानें कोकिळेपरी ये मंजुळ रव ऐकाया,
मागुनि कोल्हीपरी ऐकिला भयदायक हृदयाला;
अशावरुनियां सौमित्री तो कल्पी चित्तामाजी,
कीं ही कोणींतरी राक्षसी असे पातली आजी ! ३९
तीक्ष्णधार खड्ग उपसुनि तो घेउनि निजहातांत,
येइ सुमित्रानंदन तेव्हां शीघ्र पर्णशालेंत;
तेथें कापुनि नाक कान घे लक्ष्मण शूर्पणखेचें,
त्या योगानें द्विगुणित विकृत स्वरूप झालें तीचें. ४०
वेणूचे परि कर्कश पर्वें नखहि वक्र जिस थोर,
ह्मणुनि अंकुशापरी जयेचा असे उग्र आकार;
तये अंगुलीकरोनि दोघाजणांस धिक्कारोनी,
होय चालती व्योमपथें ती शूर्पणखा तेथोनी. ४१
रामें राक्षसपराभवाचा क्रम जो आरंभीला,
तसा लक्ष्मणें नासाकर्णच्छेद आपुला केला;
इत्यादी सकला वृत्ता ती खरादिकां आप्तांस,
कथिती झाली त्वरें येउनी तइँ जनस्थानास. ४२
निशाचरी ती छिन्ननासिका केली आघाडीस,

---

१ " हंसे व्याघ्रिला " इत्यादि ( ३७ वें जें पद्य तद्रूप ) वचन तयेला ( सीतेला ) बोलून. असा अर्थ. २ सीता. ३ ( आपल्या शूर्पणखा ( सुपासारिखीं जीचीं नखें ) या नांवास योग्य असें रूप अर्थात् आपलें राक्षसीरूप ). ४ वेळूच्या पेऱ्यांप्रमाणें ज्या अंगुलीचीं पर्वें म्ह० पेरीं कर्कश, व जीचें नखही वांकडें म्हणून जी अंकुशाचे आकाराची होती त्या अंगुलीनें दोघां ( रामलक्ष्मणांस ) धिक्कारून आकाशमार्गें शूर्पणखा गेली असा अर्थ. ५ खरदूषण इत्यादिक आप्तांस ( खरादि राक्षसांस ). चौदा हजार राक्षस बरोबर देऊन खर दूषण व त्रिशिरा अशा तीन राक्षसांस ( दंडकारण्यांत ) पंचवटीजवळ रावणानें ठेविलें होतें.

रामावरती जातां झालें हेंचि अमंगल त्यांस. ४३
नाना परिचीं तीक्ष्ण आयुधें घेउन अपुले हातीं,
मत्त खरादिक राक्षस आंगावरती चालुन येती;
असें पाहुनी सीतारक्षणकामीं सौमित्रीला
योजुनि, राम स्वयें झुंझण्या सचाप जाता झाला. ४४
राम एकटा, निशाचरांची संख्या फारच होती,
परी तयांना अपुल्या इतक्या दिसल्या त्याच्या मूर्ती. ४५
जसें दुर्जनी दिल्या दूषणा कधीं सुजन साहीना,
तसा राम हा रणीं दूषणा[1] पळ राहों देईना. ४६
दूषण खर व त्रिशिरा यांना क्रमें मारिले बाण,
एकदाचि ते धनूपासुनी निघतां दिसती जाण. ४७
तनू भेदुनी जाति पार परि रक्त न माखे[2] त्यांस,
ते पीती प्राणास तिघांच्या, पक्षी तद्रक्तास. ४८
रामशरांनीं सर्व तोडिलें जेव्हां राक्षससैन्य,
रणीं कबंधांवांचुन कोणी तई उठेना अन्य. ४९
निशाचरांची सेना मोठी युद्ध करी रामाशीं,
जाणें तिजवर रणीं वर्षिलें अपार शरवृंदासी;
असें युद्ध ती करोनि निजली गृध्रच्छायेखालीं,[3]
जिचा न होई नाश अशी तें निद्रा[4] घेती झाली. ५०
रामें वधिले राक्षस ऐसी दुर्वार्ता लंकेस,
शूर्पणखा एकलीच येउनि कळवी दशवक्त्रास. ५१
भगिनीनिग्रह[5] आप्तवर्गवध, ऐकुनि दशवदनानें,
मानियलें कीं दशही मस्तकिं पाय दिला रामानें. ५२
मृगरूपी मारीचाकरवीं[6] फसवुनि सानुज रामा,

---

१ या नांवाचा राक्षस. २ रामाचे बाण इतके वेगानें गेले कीं, त्यांस रक्त देखिल लागले नाहीं; त्यांनीं त्या तिघां राक्षसांचे प्राण घेतले; रक्तपान पक्ष्यांनीं केलें. ३ गिधाड्याच्या छायेखालीं. ४ मरणरूप निद्रा. ५ बहिणीला केलेला दंड. ६ मारीच म्हणून राक्षस होता त्याला सुवर्णमृगाचें रूप देऊन तो सीतेच्या दृष्टीस पाडिला त्यास पाहून 'हा मला आणून द्या' असें सीतेनें रामास म्हटल्यावरून राम त्याचे मागें लागला ह.

मार्गी जातां अडवा आला पक्षी जटायुनामा;
कांहिं वेळ युद्धास करोनी पराभवोनी त्यास,
वैदेहीला हारुनि नेई रावण निजनगरास. ५३

सीताशुद्धी करूं लागले दोघे बंधू जेव्हां,
मार्गी पडला जटायु पक्षी तिहीं देखिला तेव्हां;
छिन्नपक्ष होउनियां लोळे व्यय केला प्राणाचा,
अशा प्रकारें अनृणी झाला तो दशरथराजाचा. ५४

रावण सीता घेउनि गेला हें अपुल्या वाणीनें,
त्याशीं केलें घोर युद्ध तें तनुच्या व्रणयोगानें;
ऐशीं दोन्हीं दोन रितीनें निवेदोनि रामाला,
जटायु पक्षी तनु त्यजोनी स्वर्गी जाता झाला. ५५

पितृमरणाच्या ऐसा त्यांना फार शोक होवोनी,
पित्यापरी त्याचेंही केलें उत्तरकार्य तयांनीं. ५६

रामशरानें मरोनि झाला कैबंध शापविमुक्त,
त्याच्या वचनें होय रामही सुग्रीवीं अनुरक्त;
राम आणि सुग्रीव उभयतां समान दुःखी होते,
त्या योगानें सख्य तयाचें पावे बहु वृद्धीतें. ५७

---

सतां त्याच्या माग रावणानें रामाच्या पर्णकुटींत येऊन सीतेला तापसवेषानें उचलून आकाशपंथें लंकेस घेऊन चालिला असतां जटायु पक्षी आडवा आला त्यास मारून लंकेस जाऊन तेथें सीतेला अशोक वनांत ठेविलें अशी कथा आहे.

१ जटायू हा गृध्रजातीचा पक्षी होता. त्याचें दशरथराजाबरोबर बंधूप्रमाणें सख्य होतें. त्यानें रावण सीतेला लंकेंत नेत असतां त्यास मार्गांत आडविलें तेव्हां रावणानें याशीं युद्ध करून त्याचे पंख उपटून त्याला लोळा करून आपण सीतेला घेऊन लंकेस गेला. जटायूचे भावाचें नांव संपाती. २ वाणीच्या योगानें ( सीताहरण सांगीतलें ). ३ घायांच्या योगानें ( युद्ध सांगीतलें ). ४ हा कबंध राक्षस मुळचा गंधर्व होता त्यास ऋषिशापानें राक्षसयोनि प्राप्त झाली होती. याचे बाहु चार चार कोस लांब होते त्यांत जें सांपडे तें भक्षून तो दंडकारण्यांत राहिला होता. त्याचें मस्तक इंद्राचें वज्र लागून हृदयप्रदेशांत शिरल्यामुळें याचा देह कबंध म्हणजे मस्तकरहित दिसत असे ह्मणून त्यास हें नांव पडलें.

*बली वालि मारुनियां राम स्थापी त्याचे स्थानीं,
धातुस्थानीं आदेशापरि, सुग्रीवालागोनी. ५८
सुग्रीवानें प्रेरित वानर इकडे तिकडे तैसे,
सीतान्वेषण करों लागले, राममनोरथ जैसे. ५९
संपातीच्या वचनें लागे सीताशुद्धि तयांस,
संसारा निर्ममसा तरला मारुति तोयनिधीस. ६०
निशाचरीवेष्टिता जनकजा लंकेमाजी तैसी,
हनुमंतें पाहिली, विपलतावृता महौषधि जैसी. ६१
भर्त्यानें जी खूण ह्मणोनी मुद्री अर्पिली होती,
तीच तईं हनुमंतें दिधली वैदेहीच्या हातीं;
आनंदाश्रू शीतल येती नेत्राब्जांतुनि तीचे,

---

१ किष्किंधा नगर याचा राजा वाली नांवाचा वानर होता त्याचा भाऊ सुग्रीव नांवाचा वानर, याची बायको वालीनें बळकावून त्यास हुसकून दिलें होतें. तेव्हां तो सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर राहत असे कारण त्या पर्वतावर वालीला शापामुळें जाववत नव्हतें. सुग्रीवाचा मंत्री हनूमान वानर होता तो वायुपासून झाला म्हणून त्याला वायुपुत्र म्हणतात. २ संस्कृत व्याकरणांत धातूचे ठिकाणीं आदेश होत असतो तद्वत्.

* अथवा ( वरील अर्थाचीच दुसरी साकी)—

बली वालि जो त्यातें मारुनि रामें त्याचें स्थान,
चिरकालेप्सित जाणुनि दिधलें सुग्रीवालागोन;
एके धातुस्थानीं दुसऱ्या धातूचा आदेश,
कीजे तैसा प्रकार झाला प्रस्तुत सुग्रीवास. ५८

३ संपाती हा जटायूचा भाऊ, जातीचा गृध्र पक्षी होता, त्यानें वानरांस सीतेचें लंकेतील ठिकाण सांगीतलें. ४ निर्मम ह्मा० विरक्त पुरुष जसा संसाराला तरतो तसा मारुती तोयनिधीस म्ह० समुद्रास तरला. ५ विषलतांनीं आवृत म्ह० वेष्टित अशी महौषधी म्ह० अमृतवल्ली दिसते तशी निशाचरींनीं म्ह० राक्षसस्त्रियांनीं वेष्टित अशी जानकी हनुमंतानें पाहिली. ६ अंजनी वानरीला केसरी वानरापासून झालेला महा पराक्रमी वानर याचें नांव हनुमंत. यानेंच शंभर योजनें समुद्र तरून लंकेंत जाऊन सीतेची भेट घेऊन अशोक वन व लंका पुच्छाग्नीनें जाळून रामाकडे येऊन सीतेचें कुशळ कळविलें, हा मोठा रामभक्त आहे. जेथें राममूर्ती तेथें हनुमंताची मूर्ती असते. हा वायूच्या प्रसादामुळें झाला म्हणून यास वायुपुत्र असें म्हणतात. याचें मारुती हें नांव प्रसिद्ध आहे. ७ हनुमंत हा सुग्रीवाचा मंत्री व रामाचा महाभक्त वानर प्रसिद्ध आहे.

सामोरे ते येति मुदीला ऐसें भासे साचें. ६२
पतिसंदेशा सांगुनि तोषित करोनि वैदेहीला,
रावणपुत्रा मारुनि अक्षा चित्तीं उद्धत झाला;
इंद्रजिताच्या अस्त्रामध्यें क्षणभरि होउनि बद्ध,
पुच्छाग्नीनें सारी लंका करी मारुती दग्ध. ६३
येउनि रामाकडे शिरोगत रत्न अर्पि तो त्यास,
जणुं सीतेचें हृदय मूर्त हें असे गमे रामास. ६४
धरी उरीं तो रत्न तयाच्या स्पर्शें मोहित झाला,
पयोधरांवांचून पावला प्रियाश्लेषसौख्याला. ६५
प्रियावृत्त ऐकोनि राम हा अत्युत्सुक होवोनी,
महार्णवा लंकेच्या परिखाऐसें अल्पचि मानी. ६६
शत्रु वधाया राम निघाला घेवोनी कपिसेना,
न भूतलीं परि नभींहि झाली दाटि तिची जातांना. ६७
महार्णवाच्या तीरीं आले राम आणि कपिसैन्य,
येई बिभीषण तेव्हां त्याचें दर्शन घ्याया धन्य;
स्नेहानें जणुं राक्षसलक्ष्मी त्याला सन्मति सांगे,
म्हणोनि रामाकडे येउनी तो आश्वासन मागे. ६८
राक्षसपतिची सर्व संपदा तुलाच देइन बापा,
बोले त्याशीं रामचंद्र हा तई अशा संकल्पा;
योग्यकाळिं जरि बीज पेरिलें सन्नीतीचें लोकीं,
फलनिष्पत्ती अवश्य होते त्यायोगें अवलोकीं. ६९
जलधीमध्यें सेतु बांधिला रामें भासे लोकां,

---

१ इंद्रजित् हा रावणाचा पुत्र. हा मोठा पराक्रमी होता यानें इंद्रास जिंकिलें म्हणून यास इंद्रजित् नांव पडलें. याचें मूळचें नांव मेघनाद आहे. यानें हनुमंताला ब्रह्मास्त्रांत बद्ध केलें होतें. यास लक्ष्मणानें मारिलें. याच्या स्त्रीचें नांव सुलोचना. २ डोईंत घालायाचें. ३ स्तनावांचून. ४ स्त्रीच्या आलिंगनाचे सुखास. ५ 'येइ बिभीषण शरण तयाला राक्षस होउनि धन्य' असें एथें पाठांतर जाणावें. ६ बिभीषण हा रावणाचा धाकटा भाऊ होता. त्याला रावणाचें कृत्य न आवडून तो रामपक्षास येऊन मिळाला.

विष्णूच्या शयनार्थ शेष जणुं वरती आला देखा. ७०
सेतुपथें वानरां घेउनी जाउनि परतीरास,
रामें वेढा दिधला त्यांचा तैं लंकानगरास;
पीतवर्ण ते वानर जेव्हां उभे राहिले दाट,
हेमघटित तैं भासे दुसरा लंकेभंवता कोट. ७१
वानर राक्षस यांचें चालू झालें तैं रण घोर,
ते[2] दिग्व्यापी शब्दें करिती निजनिज जयजयकार. ७२
[3]परिघलागीं कधी तोडिती हाणुनि मोठीं झाडें,
लोहघटितमुद्गरां फोडिती फेंकुनि त्यांवर धोंडे;
शस्त्रांचें बल तीक्ष्णनखांच्या पुढें न कांहीं चाले,
पर्वतराशीपुढें निशाचरैंदंति पराजित झाले. ७३
छिन्न रामशिर देखुनि येई जंव मूर्छा सीतेस,
माया ही हें सांगुनि सावध करि तैं त्रिजटी तीस. ७४
जिवंत पति हें ऐकुनि शोका टाकी जरि नृपबाळी,
मरण सत्य भासुनि हि न मेलें ह्मणुनि लाजती झाली. ७५
इंद्रजितानें भुजंगपाशीं निजवैऱ्यां बांधीलें;
गरुडानें तें बंधन तोडुनि त्यास मोकळें केलें;
भुजगास्त्रानें क्लेश राघवप्रतीतिला जे आले,
क्षणामधें सारे ते स्वप्नापरी नाहिंसे झाले. ७६
लक्ष्मणवक्षस्थलीं मारिली शक्ति दशग्रीवानें,
आघाताविण रामहृदय तैं विदारिलें शोकानें; ७७

---

१ शेष हा सर्प पाताळांत असतो त्याच्या आकृतीचा सेतु दिसूं लागला म्हणून त्यावर ही उत्प्रेक्षा केली. २ ते वानर व राक्षस दिग्व्यापी म्ह० दिशांस व्यापणारा असा मोठा जो शब्द ह्म० ध्वनी तेणेकरून आपआपला जयजयकार करिते झाले असा अर्थ. ३ हीं आयुधें आहेत. ४ राक्षसांचे हत्ती. ५ या नांवाची राक्षसी. ६ आपला पती जिवंत आहे असें जाणून सीतेचा शोक दूर झाला खरा; परंतु त्याच्या नाशाचें वर्तमान पूर्वीं कळलें होतें तेव्हां जरी तें सत्य वाटलें तरी मी मरण पावलें नाहीं! असें म्हणून तिला लज्जा उत्पन्न झाली.

हनुमंतानें द्रोणगिरीला[1] आणुनि अतिशयवेगें,
सौमित्रीला जिवंत केलें महौषधीच्या योगें;
उठोनि लक्ष्मण अणिक लागला माराया बाणांस,
पुन्हां लावि तो रडावयाला लंकेंतिल बायांस. ७८

शरत्काल मेघांच्या नादा इंद्रधनुष्यालागीं,
नष्ट करुनि टाकितो सर्वथा घेउनि अपुल्या वेगीं;
इंद्रायुधसम तदीयचापा[2] आणि मेघनादास,[3]
सौमित्री हा तशाप्रकारें धाडी यमसदनास. ७९

सुग्रीवानें घटकर्णाचे[4] नाककान कापोनी,
केलें त्याचें स्वरूप त्यानें तद्भगिनीच्या वाणी;[5]
टांकीनें फोडोनि टाकिजे ज्यावरचा मनशीळ,
तया गिरीपरि अडवा आला रामाला तो स्थूळ. ८०

निद्राप्रिय हा, व्यर्थ अकालीं उठवी बंधू यास,
असें ह्मणुनि जणुं अखंडनिद्रा[6] राघव देई त्यास. ८१

इतरहि राक्षस वानरयूथीं मग्न होउनी मेले,
त्यांच्या रक्तनद्यांमधिं जैसें रज समरोत्थ[7] बुडालें. ८२

* रावण अथवा राम ययांतुनि मरेल अजि रे एक,
अशा निश्चयें पुनश्च रावण युद्धा आला देख. ८३

---

१ द्रोणगिरी हा एक पर्वत आहे. याच्यावर नानाप्रकारच्या औषधी असतात, त्यांत मृतसंजीवनी म्हणून एक औषधी जीच्या योगानें मेलेला प्राणी जीवंत होतो ती होती. तिच्याकरितां हनुमंतानें तो पर्वतच उचलून लंकेंत समरांगणीं आणिला. २ इंद्रजिताच्या चापाला. ३ इंद्रजितास. ४ घटकर्ण म्ह० कुंभकर्ण हा रावणाचा धाकटा भाऊ याचें शरीर अत्यंत मोठें व भयंकर होतें. यानें मोठी तपश्चर्या करून ब्रह्मदेवापाशीं इंद्रपद मागायाचें तें चुकून निद्रापदच मागीतलें. या प्रसंगीं देवांनीं याचे जिव्हेवर सरस्वती बसवून असा वर मागविला अशी कथा आहे याला रामानें मारिलें. हा सहा महिने निद्रा घेऊन एकदा उठत असे त्या वेळेस याला भक्षायाला बहुत मांस वगैरे लागत असे. ५ शूर्पणखेपरी. ६ मृत्यू. ७ समरांत उत्पन्न झालेलें. ( रज ).

* अथवा ( वरील अर्थाचीच दुसरी साकी.)—

मरेन वा अजि मारिन वैरी नेम असा चित्तांत,
करुनि दशानन घरोनि आला झुंझाया समरांत. ८३.

रथीं बैसला रावण तैसा चाले राम पदानें,
देखुनि ऐसें स्वर्गींहुनि रथ पाठविला इंद्रानें. ८४

स्वर्गींचा लागुनि वारा ध्वजा फडाडी भारी,
ज्यांत बसुनि इंद्रानें वधिले लक्षावधि दैत्यारि;
असा जैत्र जो स्यंदन त्यावरि धरुनि हात सूताचा,
रामचंद्र तैं चढता झाला कैवारी भक्तांचा. ८५

सुरवैऱ्यांचीं प्रबलहि अस्त्रें कुंठित ज्यावर होती,
असें कवच रामाला घाली मातलि अपुल्या हातीं. ८६

रामदशानन रणांगणीं ते अन्योन्या देखोन,
स्वकीय विक्रम दावाया हें बहुतांदिवसीं स्थान
योग्य मिळालें, असें ह्मणूनी युद्धा आरंभीलें
त्यांहीं, त्यायोगानें त्यांचें रण जणुं सार्थक झालें. ८७

निशाचरांचा वर्ग सकलही रामें विनष्ट केला,
ह्मणुनि दशानन रणभूमीवरि एकटाचि राहीला;
तरी भुजा मस्तकें पादही बहुत होते त्यास,
यासाठीं राक्षसीं वेढिला असा दिसे लोकांस. ८८

दिक्पालांचा जेता जो कां, कैलासा जो झेली,
जेणें अपुल्या शिरकमळांनीं श्रीशिवपूजा केली,
असा शूर अतिबलाढ्य शत्रू रणीं मजपुढें आला,
आज बहुत हें योग्यचि झालें गमे असें रामाला. ८९

सीतासंगमसूचक दक्षिणबाहुस्फुरणा त्याच्या,
देखुनि रावण शरास तेथें हणी भरें कोपाच्या. ९०

रामबाणही उरा रिपूच्या भेदुनि पाताळांत,
गेला जणुं तो कळवायाला सर्पा प्रिय वृत्तांत. ९१

सभेंत वादी बैसुनि जैसे जिंकाया अन्योन्या,
कोट्यावरतीं कोट्या करिती युक्तीनें बुधमान्या;

---

१ राक्षस. २ जिंकणारा. ३ सारथ्याचा. ४ इंद्रसारथी. ५ पंडितांस मान्य अशा कोट्यांवर कोट्या.

परस्परांतें हटवायाला रणांत संप्रति तैसे,
अस्त्रांवर अस्त्रांस टाकिती हे दोघे आवेशें. ९२
मत्त मतंगज वीर्यबळानें झुंझति अन्योन्याशीं,
त्या दोघांच्यामधें सामयिक[1] भिंत उभी कां जैसी;
रामदशानन बलाढ्य दोघे यांच्या ही युद्धांत,
तसी जयश्री बसे ठेउनी दोहिं तडींवर हात. ९३
रावण राघव लाघव[2] देखुन सर्व असुर अणि देव
हर्ष पावुनी त्यांवर करिती क्रमें पुष्पवर्षाव;
परस्परांची पुष्पवृष्टि तैं परस्परांच्या बाणा,
न साहून ते अडवुनि धरिती वरचेवरतीं जाणा. ९४
आणी जिंकुनि यमा तीचें जणुं लोहकंटकीं युक्त,
त्यजी शतघ्नी रामावर तो रावण कोपासक्त. ९५
केळीचे परि सहज तोडिली पथीं शतघ्नी त्यानें,
असुराशेच्या[4] सवें अर्धविधुमुखीं[5] शरीं रामानें. ९६
कांताहृदयीं शोकशल्य जें त्यातें उपटायास,
चापीं लावी राम अमोघा अंतीं ब्रह्मास्त्रास[6]. ९७
नभीं पसरुनी मुखें तयांचीं दिसती तेजःशाली,
महा भयंकर देखुनि वाटे शेषफणांची आली[7]. ९८
त्या अस्त्रानें होउं न देतां व्रणव्यथा अणुमात्र,
तोडुनि पाडी क्षणांत रावणशिरांस दशरथपुत्र. ९९
बालार्काचें बिंब वीचिंनी[8] जळांत बहुविध जेवीं,
कंठच्छेदस्थलें अरीचीं तईं शोभती तेंवी. १००
शिरें तोडिलीं तरी पुन्हा तीं जडतिल कीं देहास,

---

१ सामाईक. २ रावण व राम यांचें कौशल्य. ३ ज्या शतघ्नीनामक शक्तीच्या योगानें रावणानें यमाला पूर्वी जिंकिलें होतें तीच शक्ती जाणों तो रामावर टाकिता झाला. ४ असुर म्ह० राक्षस यांच्या आशेसहित तोडिली ह्मणजे तिच्या बरोबर आशेचा भंग केला. असा एथें सहोक्ति अलंकार झाला. ५ अर्धचंद्रमुख. ६ ब्रह्मास्त्र या नांवाचें एक अस्त्र प्रसिद्ध आहे. तें रामचंद्र अर्जुन अशा प्रतीचे मोठ्या पराक्रमी वीरांसच माहित असे. जेव्हां दुसरा उपाय नाहीं अशा प्रसंगींच याचा प्रयोग करीत असत हें मोठें भयंकर व ज्वाळामय असें वर्णिलें आहे. ७ पंक्ती. ८ लाटांनीं.

अशा भयें देवानां पुरता वाटेना विश्वास. १०१
दिक्पालांच्या गजगंडस्थलदानजलें जड झाले,
मधुकर सौरभ्याच्या लोभें गंडा सोडुनि आले;
ज्यांच्या वरती, अशा नंदनोद्भवाफुलांची वृष्टी,
करिती निर्जर राममस्तकीं मनीं पावुनी तुष्टी;
जया राममस्तकास मणिबंधाचा योग पुढें कीं,
लौकर राज्याभिषेकसमयीं व्हायाचा अवलोकी. १०२
ऐसें तें सुरकार्य अटपल्यावरी राम दोरीला
तो चापाच्या कोटीवरुनी शीघ्र सोडिता झाला;
ध्वजास ज्याच्या रावणनामांकितशर रुपले फार,
वाजि हजारों ज्यास जुंपिती असा इंद्ररथ थोर;
घेउनियां मातली राघवा विचारोनि विनयानें,
अमरनाथनगरीप्रति जाता झाला उर्ध्वपंथानें. १०३
रघुपति करि मग अग्निविशुद्धा सीतेचा स्वीकार,
बिभीपणाला साऱ्या लंकाश्रीचा दे अधिकार;
सौमित्री सुग्रीव बिभीषण यांसह पुष्पकयानीं,
बैसुनि साकेतास यावया निघे राम परतोनी. १०४

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्या हि ती,
त्यानें जें रघुवंशकाव्य रचिलें मोठ्या श्रमें प्राकृतीं
त्याचा द्वादश सर्ग देख विबुधा हा प्रीतिनें संमती. ॥ १॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा रावणवधनामक बारावा सर्ग समाप्त झाला असे.

---

१ गंडस्थलास. २ भ्रमर. ३ हत्तींच्या गंडस्थलसंबंधी मदजलानें. ४ नंदन वनांत झालेल्या. ५ देव. ६ रत्नांचे सरांचा ( ज्या राम मस्तकाला या उपर लौकर राज्याभिषेक होऊन रत्नांच्या सरांचा योग होणार त्यावर आतां पुष्पवृष्टि केली असा अन्वय ). ७ देवांचें कार्य. ८ अमरावतीप्रत. ९ आकाशमार्गानें. १० पुष्पकविमानांत. ११ अयोध्येप्रत ( परतोन यावया निघे ).

# सर्ग तेरावा.

### श्लोक.

[शा.वि.] सांगातें जनकात्मजेसं[1] अपुल्या घेवोनियां सत्वरी,
जाई व्योमपथें[2] विमानिं बसुनी श्रीरामनामा हरी[3];
तें रत्नाकर[4] पारशून्य[5] सहसा पाहोनियां खालता,
एकांतीं दयितेस[6] तो गुणनिधी झाला असें बोलता. १

" हा पाहें[7] मम सेतुनें जलनिधी झाला द्विधा मैथिली,
लाटा या मलयावधी[8] उसळती, तैशाच फेनावली;
तारांचे गण जेथ शोभति शरत्कालीं बहू निर्मळ,
त्या छायापथ[10] जेवि भेदि गगना[9], तैसा दिसे सोज्वळ." २

" पूर्वीं जें सगर[11] क्रतूस[12] करिता झाला, तई सुंदरी,
अश्वाला कपिल स्वयें हरुनि तो पाताळि[13]ने सत्वरी;
तच्छोधार्थ[14], वसुंधरा[15] खणिलि तत्पुत्रीं[16] खनित्रीं[17] महा,
केला वर्धित पूर्वजीं मम असा सिंधू प्रिये हा पहा." ३

" याचें घेउनि अंबु[18] वृष्टि करिती अंशू[19] रवीचे जनीं[20],
होती चंद्र[21]सुखी अमोलिक असे पोटांत याच्या मणी;
अंभोभक्षक वाडवाग्निहि[22] जलीं यानेंच गे पोशिला,
लोकानंद[23]न चंद्रमाहि सखये यापासुनी जन्मला. ४

विष्णूची स्थिति भिन्नभिन्न असते तेवीच याची असे,
जेवीं व्यापक विष्णु तेवि दयिते दिग्व्यापि हाही दिसे;

---

१ सीतेस. २ आकाशमार्गे. ३ विष्णु. ४ समुद्र. ५ ज्याला पार नाहीं असा (रत्नाकर). ६ प्रियेस ( सीतेस ). ७ हे सीते. ८ मलयपर्वतापर्यंत. ९ (त्या गगना छायापथ जेवि भेदि असा अन्वय ). १० ( शरत्कालीं आकाशमंडळाच्या मध्यभागीं शुभ्रवर्ण असा एक लांब आडवा पट्टा दिसतो त्यास छायापथ असें म्हणतात ). ११ सगर नांवाचा राजा. १२ यज्ञास. १३ नेता झाला. १४ अश्वशोधार्थ. १५ पृथ्वी. १६ सगर पुत्रांनीं. १७ खणण्याच्या हत्यारांनीं. १८ उदक. १९ किरण. २० सूर्य किरणांनीं समुद्राचें उदक आकर्षित होऊन त्यांपासून पाऊस पडतो. या सिद्धांताकडे या स्थलीं लक्ष्य आहे. २१ (हें संबोधन). २२ समुद्रांत राहून त्याचें जल शोषण करणारा असा एक अग्नी पुराणांत वर्णिला आहे. २३ लोकांस आनंद देणारा.

यासाठीं निजरूप अंबुनिधिचें विस्तीर्णताही खरी
विष्णूचे परि, जानकी, न समजे कोणासही भूवरी. ५

ज्याच्या नाभिसरोरुहीं बसुनियां ब्रह्मा स्तुतीतें करी,
शक्तीनें सकलां जगांस उदरीं जो आवरोनी धरी;
शेषाच्या शयनावरी निजसुखें श्रीपुंडरीकाक्ष गे,
कल्पांतीं जलधींत या निजुनियां तो योगनिद्रेस घे. ६

पक्ष[1]च्छेद करोनियां सुरवरें[2] हारीस ज्यां[3] आणिलें,
ते अब्धींत शतावधी [4]गिरि सुखें येवोनियां राहिले;
शत्रूंनीं अतिपीडित क्षिति[5]पती ते जेंवि धर्मान्विता[6],
मध्यस्था नृपतीस आश्रिति, तसें हेंही दिसे पाहतां. ७

साधी [7]उद्वहनक्रिया कृतयुगीं कोलावतारी[8] हरी,
तेव्हां ह्या जलधींतुनी [9]वसुमती ती शीघ्र येई वरी;
कल्पांतीं उसळे बळें जळ बहू याचेंचि तें [10]भ्वानना,
झालें कीं मुखवस्त्र तें क्षणभरी, वाटे असें गे मना. ८

अर्पायास मुखास सिद्ध असती धृष्टा नद्या सत्वर,
तैसा फारचि दक्ष तोयधि असे घ्याया तरंगाधरें[11];
सिंधूंच्या[12] वदनासपी पिववि ही त्यांना सुखें स्वाधरा,
ऐसा सागर हाचि एक चतुर स्त्रीभोगकर्मीं खरा. ९

लांबी शंभर योजनें, बघ शिरीं राहे जयांच्या बिळ,
ज्याचें नांव [13]तिमी अशा जलचरीं हा अंबुधी संकुल[14];
हे मासे नदिच्या मुखीं जमलिया सप्राणि[15] तोया पिती,
डोळ्यांला मिटुनी, बिळांतुनि वरी पाणी त्वरें झोंकिती. १०

---

१ पंखांचा छेद. २ इंद्रानें. ३ (ज्या गिरीतें). ४ पर्वत. ५ राजे. ६ धर्मयुक्ता ( मध्यस्था ). ७ वर उचलणें श्लेषानें विवाहकर्म. ८ वराह अवतारी विष्णु. ९ पृथ्वी. १० पृथ्वीच्या मुखाला ( मुखवस्त्र म्हणजे राजस्त्रियांचा मुखावर घेण्याचा बुरखा असतो तसें झालें ). ११ तरंगरूप अधर. १२ नद्यांच्या. १३ या नांवाचे मोठमोठे शंभर योजने लांबीचे मासे समुद्रांत असतात ते डोळे मिटून जलजंतूंसहित पाणी पितात. व त्यांच्या मस्तकाला एक मोठें छिद्र असतें त्यांतून पाणी वर उडवितात. १४ व्याप्त. १५ प्राणियुक्त ( तोया ).

मातंगाकृति[1] नक्र या जलनिधीमध्यें उड्या मारिती,
तेणें फेनगिरी[2] फुटोनि तुकडे होवोनि नानारिती;
तेही उंच उडोनि कर्णयुगुला नक्राचिया लागती,
पाहातां नयनीं जना क्षणभरी हे चामरें भासती. ११
येती सर्प वरी बिळांमधुनि हे वेलानिलां[3] प्यावया,
या लाटाच असा जनां ग्रह[4] मुळीं होतो बघूनी ययां;
सूर्याचे किरणव्रजें[5] चमकती जेव्हां फणांचे मणी,
तेव्हां निश्चय होय कीं, पसरले आहेत एथें फणी[6]. १२
ओष्ठाचे परि रक्तविद्रुम[7] तुझ्या[8] आहेत, त्यांच्या वरी,
लाटा लागुनि शंख[9] येउनि पहा हे ठेपती सत्वरी;
त्यांचे[10] अंकुर तें मुखांत शिरती शंखांचिया सुंदरी,
त्यांतें सोडुनि जावयास सखये, हे कष्टती अंतरीं. १३
आकाशांतिल मेघ सिंधुसलिला[11] प्यायास ओणावला,
पाण्याच्या भ्रमणामुळें गरगरां तेथें फिरों लागला;
त्याला पाहुनियां मनांत वनिते येतें असें संप्रती,
कीं हा मंदरशैल[12] या घुसळितो सिंधूप्रती[13] मागुती. १४
हे वैदेहि[14] दुरून सिंधु दिसतो हा लोहचक्राकृती,
त्या भोंतील तमालवृक्षनिकरीं कृष्णा[15] विराजे क्षिती;
एथोनी बहुदूर वास्तव दिसे ती फार सूक्ष्मा तसी,
चाकाच्या भंवतील काळि दिसते रेखा मळाची जसी. १५
ऐसा उत्सुक जाहलों त्वदधरा चुंबावया तत्वतां,
कीं [16]भूषेमधि काल जाय मजला तोही न सोसे अतां;

---

१ हत्तीसारिखे ( नक्र ). २ फेसाचे पर्वत. ३ मर्यादवेले संबंधी वायूस. ४ बोध. ५ किरणाच्या समुदायानें. ६ सर्प. ७ तांबड्यां पोंवळीं. ८ ( तुझ्या ओष्ठाचेपरी तांबड्यां पोंवळीं असा अन्वय ). ९ शंख नांवाचे जलचर प्राणी आहेत. तेही तुझ्या अधरोष्ठतुल्य रक्तविद्रुमांकुरास मुखापासून सोडण्यास कष्टी होतात तर प्रत्यक्ष तुझ्या अधरवियोगीं माझी स्थिति कशी व्हावी असा रामाभिप्राय यांत व्यंग्य दिसतो. १० पोंवळ्याचें. ११ समुद्राचे पाण्यास ( प्राशावया ). १२ मंदर नांवाचा पर्वत. १३ समुद्रास ( मागुती घुसळितो ). १४ हें संबोधन. १५ कृष्णवर्ण. १६ ( भूषणें घालण्यांत जो काळ जातो तोही मला सोसेना इतका मी तुझ्या अधरपानाविषयीं उत्सुक झालों असा अन्वयार्थ).

जाणों हें समजोनि केतकर जें घेवोनियां निर्मळ,
सीते त्वद्वदनास लावित असे हा मंद वेलानिल. १६

शुक्ती भंगुनि सैकतीं विखुरल्या मुक्तावळी शोभती,
जेथें नारळि पोफळीहि लवल्या भारें फळांच्या अती;
ऐशा सिंधुतटीं विमानगतिनें अत्यल्पकालें पहा,
आलों आपण इंदुसुंदरमुखी आश्चर्य वाटे महा. १७

[व.ति.] मागें वळोनि बघ कामिनि तूं पथाला,
अंभोनिधी हळु हळू बहु दूर गेला,
त्यापासुनी सविपिना सकला धराही,
जाणों निघे शशिमुखि क्षणमात्र पाही ! १८

[शा.] केव्हां मार्गें जातसे हे सुरांच्या, केव्हां केव्हां पाखरांच्या घनांच्या,
जैसी मातें वासना होय जाण, तैसें तैसें चालतें हें विमान. १९

[शा.वि.] इंद्रैरावतमस्तकोद्भवमदें आमोद जाला असे,
गंगातोयसमागमें अतिशयें शीतत्व जेथें वसे;
तो हा व्योमसमीर आननिं तुझ्या मध्यान्हि उष्णोत्थिता,
घर्माच्या कणिकांस शुष्क करितो हे जानकी तत्वतां. २०

[व.ति.] सीते गवाक्षवदनांतुनि बाह्य देशीं,
तूं कौतुकें जलदसन्निध हस्त नेशी,
विद्युल्लता तव कराजवळी प्रकाशे,
ती वर्तुलाकृति बघूनि मनास भासे,
कीं तोयद प्रकट हा अपुल्या करानें,
घाली दुजें वलय हस्ति तुझ्या त्वरेनें. २१

[शा.वि.] विघ्नें सर्व निरस्त देखुनि जनस्थानीं पुन्हा हे मुनी,
पूर्वीं जीं त्यजिलीं निजाश्रमपदें आतां तिथें येउनी;
ज्याची शक्ति जशी तशींच उटजें बांधोनियां ते स्वयें,
आनंदें करिती निवास दयिते, टाकोनि सारीं भयें. २२

---

१ केवड्यांतील पराग. २ वेलेसंबंधी वायु. ३ वनासहित. ४ हें संबोधन. ५ मेघांच्या. ६ आकाशवायू. ७ उष्म्यामुळें उत्पन्न झालेल्या. ८ खिडकीचे तोंडांतून. ९ मेघासमीप. १० पर्णशाला.

त्वच्छुद्धीस वनीं करीत असतां शोकाचिया निर्भरीं,
कांते नूपुर एक म्यां निरखिला दैवें धरित्रीवरी;
तो त्वत्पादवियोगदुःखित जणूं बोलेच ना दुर्बळ,
ऐसें वृत्त घडे, जिथें जनकजे तें हेंचि पाहें स्थळ. २३

ज्या मार्गें तुजला निशाचरपती नेई बळें सुंदरी,
त्या मार्गा वचनेंकरूनि वदण्या शक्ती नसे ज्यां बरी;
वाताकम्पितपल्लवांगुलिवशें त्या ह्या लतांनीं मला,
सीते घोरवनीं दयार्द्रहृदयें पंथा तुझा दाविला. २४

लागेना तव शोध यास्तव बहू मी व्यग्र हें अंतरीं,
जाणोनी हरिणी तृणां त्यजुनि ह्या तोंडा करोनी वरी;
दृष्टी फेंकुनि दक्षिणेस अपुली त्यांनीं मला सूचना,
केली कीं, बघ या दिशेसचि असे बापा तुझी अंगना. २५

[स्र.] आतां हें अग्रभागीं हिमकरवदने माल्यवान् पर्वताचें,
आकाशस्पर्शि ऐसें शिखर बघ दिसूं लागलें थोर साचें;
जेथें येकेच काळीं विमल नव जला सोडिलें शीघ्र मेघें,
तैसें बाष्पोदकातें व्यथित बहुत म्यां होउनी त्वद्वियोगें. २६

जो सीते गंध चाले भिजुनि नवजलें मृत्तिका पल्वलांची,
वाणी सुस्निग्ध मेघागममुदित अशा तैं मयूरव्रजाची;
नीपांच्या रम्यपुष्पांतिल मृदुल असे तंतु बाहेर येती;
या गोष्टी याच शृंगीं मज तव विरहें दुःसहा फार होती. २७

[शा.वि.] एथें ऐकुनियां सरोजनयने मेघांचिया गर्जिता,
ज्याचा थोर उठे प्रतिध्वनि गुहेमाजी सखे तत्वतां;
* ऐसे वेळि मिठी गळ्या मम तुवां गे घालिजे साध्वसें,
तें येवोनि मनीं श्रमें दिवस ते म्यां काढिले राजसे. २८

---

१ वायूनें कांपणाऱ्या ज्या पल्लवरूप अंगुली तीहींकरून. २ (ह्या हरिणी). ३ हें संबोधन. ४ (मेघें जला व त्वद्विरहें म्यां बाष्पोदका एकदाच सोडिलें असा अन्वय). ५ मेघागमानें हर्षित. ६ मोरांचा समुदाय. ७ वृक्षविशेष यांच्या. * 'कंठीं यासमयीं मिठी मम तुवां गे घालिजे साध्वसें' (असें पाठांतर).

रक्तें कंदलिचीं फुलें उमललीं जें काननीं चांगलीं,
पर्जन्यें भिजुनी क्षिती बहु तिची ती वाफ त्यां लागली,
तीं पाहोनि विवाहकालिक तुझीं धूमारुणें लोचनें,
चित्तीं आठवुनी मला श्रम इथें झाले मृगांकानने. २९
ज्यांच्या भोंवतिं फार दाट विलसे हें वेतसीचें कुळ,
तैसे सारस पक्षि देख दिसती लांबोनि किंचिच्चळ,
त्या पंपासलिलां दुरून बघुनी ये खालतीं धावुनी,
श्रांता होउनि दृष्टि ही मम सखे पीतेचे वाटे मनीं. ३०
या पंपेवर चक्रवाक मिथुनें होतीं सुखें बैसलीं,
ज्यांनीं उत्पल केसरें नवनवीं अन्योन्यतुंडीं दिलीं;
ऐसीं भीरु तुझा वियोग असतां तीं जोडपीं पाहिलीं,
तेव्हां त्वत्स्मरणें मदीय तनुची झाली बहू काहली. ३१
तीरीं ही विलसे अशोकलतिका, जीचे स्तनाचेपरी,
गुच्छां पाहुनि पीनें, तूंच सखये आहेस हें अंतरीं
भासोनी मज, जाइं जों झटकरी आलिंगण्याला तिला
वारी लक्ष्मण, ही लता ह्मणुनि, तों येई रडें गे मला. ३२
[शि.] विमानाला घंटा असति लघु ह्या हेमघटिता,
तयांपासोनी हा मधु रव निघे यान करितां;
तयाला ऐकोनी वरि उडति हीं सारसकुलें,
जणूं सामोरें तीं तुज जिवलगे, येति सकलें. ३३
[शा.वि.] जेथें आम्रतरू तुवां घटजलें मोठ्या श्रमें पोशिले,
तोंडें ऊर्ध्व करोनि धांवति जवें जेथें मृगांचीं कुलें;
ती ही पंचवटी अजी बहुदिनीं संप्राप्त झाली असे,
जीतें पाहुनियां मदीय हृदया आनंद गे होतसे. ३४

१ वनस्पतिविशेष. २ हें संबोधन. ३ दुरून. ४ ऋष्यमूक पर्वताजवळचें एक सरोवर त्याचें नांव पंपा, ५ (त्याच्या सलिला ह्या० जलास श्रांत झालेली माझी दृष्टी जशी काय पीतेच) असा अन्वय. ६ हें संबोधन. ७ पुष्ट. ८ निवारण करी. ९ गमन करितां. १० सारस पक्ष्यांचीं कुलें. ११ पंचवटी हें स्थल नाशिकाजवळ गोदावरी नदीच्या उत्तर तीरीं आहे. वनवासांत असतां रामचंद्र एथें राहिला होता. त्यानें खर दूषण त्रिशिरा हे राक्षस एथें असतांच मारिले. रावणानें सीताहरण एथेंच केलें.

गोदातीरवनीं करूनि मृगया आल्यावरी सुंदरी,
वेताच्या सदनीं इथें शिर तुझ्या ठेवूनि अंकावरी;
विश्रांत्यर्थ निजें, तईं झुळझुळां वाहोनि वायू भला,
होई सौख्य अपार जें समयिं त्या, तें आठवे गे मला! ३५
ज्यीणें तो नहुषाख्य भूप पृथिवीमाजी बहु उद्धत,
भ्रूभंगें सहसा महेंद्रपदवीपासोनि केला च्युत;
येतां जो उदयास पंकिल जलें होती अती निर्मळें,
पाहें आश्रम त्या अगस्त्यमुनिचा हा भूवरी सोज्वळ. ३६
त्याच्या अग्निगृहांतुनी इथवरी हा धूम कीं चालिला,
त्या योगें दयिते, विमानपथ हा चोहींकडे व्यापिला;
त्याला येइ मनोज्ञ गंध हविचा, त्या हुंगितां म्यां स्वतां,
जावोनी रज चित्त होउनि लघू भासे बहू शुद्धता. ३७
[व.ति.] ही शातकर्णि मुनिची जलकेलि भू कीं,
पंचाप्सर प्रथित नाम हिचें विलोकीं;
मेघामधूनि दिसतें विधुबिंब जैसें,
झाडींत अंधुक दिसे स्थळ दूर तैसें. ३८
[शि.] मृगांच्या संगें हा वनिं फिरतसे भक्षुनि तृणा,
विलोकूनी यांचें तप, भय सुटे वासवमना;
तईं धाडी इंद्र प्रकृतिसुभगा पांच युवती,
तयाला त्या एणापरि निजबळें बद्ध करिती. ३९
[शा.वि.] सौधा बांधुनियां जलांत वसतो हा एथ रात्रंदिनीं,

१ गोदातीरीं वनांत. २ ज्या अगस्तिमुनीनें. ३ नहुष या नांवाचा मोठा पराक्रमी राजा झाला. इंद्राला ब्रह्महत्या लागून तो जलांत बसला असतां त्याच्या पदावर देवांनीं नहुषाची योजना केली. त्यानें इंद्राचे स्त्रीकडे जाण्याकरितां वाहनाला मोठाले ऋषी लाविले त्यांत अगस्त्य ऋषि होता. त्यानें याच्या उन्मत्तपणावरून याला शाप देऊन स्वर्गावरून खालीं पाडिलें. ४ इंद्रपदापासून. ५ अगस्ती. ६ आकाशांत अगस्त्य ऋषीचें नक्षत्र आहे. त्याचा उदय झाला म्हणजे पावसाळ्यांत उदकें गढूळ असतात तीं स्वच्छ होतात. ७ जलक्रीडेची जागा. ८ या शातकर्णि मुनीच्या क्रीडास्थानाचें नांव पंचाप्सर असें आहे. कारण या मुनीच्या तपोभंगार्थ इंद्रानें पांच अप्सरा पाठविल्या होत्या त्यांनीं एथें त्यास वश करून ठेविलें. ९ इंद्राच्या मनाला. १० स्वतः सुंदर. ११ हरिणापरी.

उल्हासें परिसे मृदंगमुख जीं वाद्यें तयांचे ध्वनी;
त्यांचा हा प्रतिशब्द होउनि नभामाजी, यया पुष्पकीं,
झाला फारचि संप्रती गलबला, देखें प्रिये जानकी. ४०

[व.ति.] चोंहींकडे ज्वलन पेटवुनी दुपारीं,
माथ्यावरी तपतसे जंव सूर्य भारी;
बैसोनियां मुनि सुतीक्ष्ण ह्मणोनि हा कीं,
पंचाग्निसाधन करी अबले, विलोकीं,
नावेंचि हा विदित लोकिं सुतीक्ष्ण पाहे,
हे जानकी प्रकृतिनें तरि सौम्य आहे,
नांवावरोनि न कधीं करिजे परीक्षा,
लक्षांत ठेवि सखये मम ही सुशिक्षा. ४१

[शा.वि.] याच्या पाहुनियां विलक्षण तपा पावोनि चित्तीं भया,
धाडी तें युवती सुरेंद्र मुनिला रंभादि मोहावया,
डोळे घालिति, मंद हास्य करिती, त्या मेखला दाविति,
त्यांचे आंगिकभाव हे न अगदीं याच्या पुढें चालती. ४२

[शा.] रुद्राक्षांची शोभते ज्यास माला, ज्याच्या योगें खाजवी तो मृगाला;
जेणें छेदी दर्भ, ऐसा ययाचा, देखें सीते, ऊजवा हस्त साचा;
त्या हस्तानें एकल्यानें मुनी तो, आतां माझ्या सत्कृतीला करीतो;
डावा बाहू ऊर्ध्व ज्याचा सदाही, काष्ठाऐसा जाहला, त्यास पाहीं. ४३

[शा.वि.] हा मौनी ह्मणुनी मम प्रणतिला अत्यादरें ध्यावया,
किंचिन्मस्तक डोलवूनि करुनी प्रत्युक्तिची सत्क्रिया;
गेलें जैं निघुनी विमान मधुनी व्योमांत एकीकडे,
तेव्हां लावि मुनी पुनश्च अपुल्या दृष्टीस सूर्याकडे. ४४

आहे हा शरभंगनाम मुनिचा संशुद्ध गे आश्रम,
जेथें दीन जनास सौख्य मिळतें अद्यापि सर्वोत्तम;
ज्यानें अध्वरिं फार होम करुनी अग्नीस संतर्पिलें,
शेवीं आत्मतनूसही शुचिमनें अग्नीमधें होमिलें. ४५

१ मृदंगादिक. २ सुतीक्ष्ण नांवाचा. ३ इंद्र (धाडी). ४ (त्या ऋषीला मोहावया असा अन्वय). ५ हावभाव. ६ प्रत्युत्तराची. ७ सत्कार. ८ अंतीं.

पांथांच्या बहुला श्रमास हरिती देवोनियां सावली,
क्षुद्बाधा हरिताति तेंवि विपुलीं जे आपुल्या सत्फलीं;
वृक्षांच्या असल्या गणां अतिथिचा सोंपून पूजाविधी,
सत्पुत्रास पिता तसा, त्यजि निजा देहा तपांचा निधी. ४६

[भु.प्र.] दरीरूप ज्याचें असे तोंड थोर, निघे सर्वदा ज्यांतुनी शब्द घोर,
असे शृंगलग्ना[2] महा मेघराजी[3], जणूं टक्करा मारितां पंक, यीं[4] जी;
असे माखला, या अशा चित्रकूटा[5], सखे देख तूं जो असे उंच मोठा;
वृषाचें[6] बहू साम्य साजे यया जी, निघेना यया सोडुनी दृष्टि माझी. ४७

[शा.वि.] वाहे निर्मळ आणि सुस्थिर बहू पाणी जयेचें असे,
एथोनि बहुदूर यास्तव लघू तो ओघ जीचा दिसे;
आहे ही तटिनी[7] समीप गिरिच्या मंदाकिनीनामिका[8],
मोत्यांचा जणुं हार हा पृथिविच्या कंठांत शोभे निका. ४८

एथें हा गिरिच्या शिरीं जिवलगे, देखें तमालद्रुम,
याचा पल्लव घेतला खुडुनि मी ज्या गंध ये उत्तम;
हे वैदेहि, तईं मनोहर असा कानावरी खोंविला,
ईषत्पांडु यवांकुरापरि[9] तुझ्या वक्रीं बहू शोभला. ४९

शिक्षेवांचुनि शांत जंतु असती जेथें स्वतां सत्तम,
पुष्पावांचुनि पादपांस[10] नियमें येती फळें उत्तम;
ऐशा चित्तचमत्कृतीस करितो जेथील सीते, क्रम,
तो हा साधन सत्तपास वनिते, उद्दाम अत्र्याश्रम[11]. ५०

---

१ पिता जसा सत्पुत्राला सोंपितो. २ शिखराला लागलेली. ३ मेघपंक्ती. ४ या पर्वतशृंगाला ( पंक इ० चिखल माखला जणू ). ५ हा चित्रकूट पर्वत यावर रामचंद्र वनवासारंभीं राहिले होते. हा प्रयागाच्या जवळच आहे. ६ वृषभाचें. ७ नदी. ८ ही नदी चित्रकूटाजवळ आहे. ९ किंचित् पांढरे यवांकुर. १० झाडांस. ११ अत्रीचा आश्रम.

*गंगास्नान तसीं पवित्र कुसुमें हीं योग्य पूजाक्रमीं,
हें जाणोनि महासती सुरनदी आणी स्वकीयाश्रमीं;
प्रातःकाळिं उठोनियां सुविधिनें स्नानास संसाधिती,
सप्तर्षी स्वकरें सुवर्णकमलें तोडोनि आराधिती. ५१
ध्याताती हृदयीं परेश विभुला वीरासनीं बैसुनी,
जैसे शोभति योगि अत्रिमुनिच्या शाखीहि तैसे वनीं;
जे वेद्यासनिं बैसुनी विलसती आरूढ योग्यांपरी,
एकांतीं तनुकंपशून्य अगदीं आहेत हे सुंदरी. ५२
पूर्वी श्याम असा प्रसिद्ध पृथिवीमाजी तुवां अर्चिला,
हस्ता जोडुनियां व्रतीं पतिशुभासाठीं बहु प्रार्थिला;
पाहे तो वट हा महा फलभरें सर्वांगिं वेंटाळला,
सद्गारुत्मतपद्मरागमणिच्या राशीपरी शोभला. ५३
मुक्तायष्टिच इंद्रनीळमणिनीं शोभे जशी वेढिली,
किंवा शुभ्र सरोजपंक्ति खचिली इंदीवेरांनीं भली, ५४
श्वेता हंसतती जसी मिसळतां कादंबकांच्या गणीं,
वा कृष्णागुरुमिश्र पत्ररचना भूँची दिसे चांदँनी; ५५
छायेमाजि दडोनि राहि तम जें तेणें जशी चंद्रिका,
रात्रीं वेगळि वेगळी दिसतसे ती पाहतां जेवि कां;
किंवा शारद मेघराजि गगनीं तीच्या स्वरंध्रांतुनी,
आकाश स्फुट कृष्णवर्ण दिसतें जैसें सखे, लोचनीं. ५६
किंवा शुभ्र विभूतिनें शिवतनू जी कां दिसे पांढरी,
ती ही कृष्णभुजंगभूषणगणीं होते जसी साजरी,

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक )—
सप्तर्षी कमळें सुवर्णघटितें जीच्यांतलीं तोडिती,
मालेचेपरि चंद्रशेखरशिरीं जी कां बहू शोभती;
ऐशा देवतरंगिणीस अनुसूया एथ विख्यात ती,
साधू स्नान करोत ईंत म्हणुनी ती जाहली आणिती. ५१

१ वेदीरूप आसनीं. २ चांगले पाचमणी. ३ मोत्यांची छडीच. ४ काळ्या कमळांनीं. ५ ( गंगायमुनामिश्रणाचें हें वर्णन ५७ वे श्लोकापर्यंत आहे ). ६ पृथ्वीची. ७ चंदनाची ( पत्ररचना ).

तैसा जन्हुसुताप्रवाह दिसतो गे पांढरा शुभ्र हा,
त्याला हा यमुनौघ कृष्ण मिळुनि वाहे कसा तो पहा;
जी कां सुंदर शुभ्रवर्ण विलसे गंगा जगत्पावनी,
कालिंदी बहु कृष्णवर्णाहि तसी विख्यात जी कां जनीं,
त्यांचें मेलन होउनी स्थिति दिसे जी भिन्नाभिन्न स्थळीं,
ती हे देउनि दाखले विविध गे सुव्यक्त केली भली. ५७
गंगा सूर्यसुता नद्या उभयतां यांच्या महासंगमीं,
स्नाना जे करितात ते शुचिमनें प्राणाचिया निर्गमीं;
जीवात्मैक्यविभावना न करितां मोक्षास जाती त्वरें,
त्यांचें मागुति या जगांत तनुला घेवोनि येणें सरे. ५८
पाहे ही नगरी गुहाख्य अमुचा जो मित्र त्याची, प्रिये,
एथें मस्तकभूषणा त्यजुनियां बांधीं जटा मी स्वयें;
तेव्हां तो सुमती सुमंत्र रडुनी ऐसें मुखें बोलला,
कीं "गे केकयकन्यके, अजि तुझा इष्टार्थ आला फला". ५९
ब्रह्म्याचें सर मानसाख्य सखये, विख्यात पृथ्वीवरी,
जेथें यक्षवधूगण प्रतिदिनीं पांनीयकेली करी;
त्यापासोनि निघे पवित्र सरयूनामें नदी ही तसी,
अव्यक्तांतुनि बुद्धि जेंवि निघते हें सांगताती ऋषी. ६०
यज्ञस्तंभ विशाल ह्या सरयुच्या तीरीं बहू शोभती,
साकेताजवळोनि निर्मळ जळें हीचीं पहा वाहती;
इक्ष्वाकुक्षितिपाळ हे अवभृथस्नाना सेवांतीं जळीं,
पूतात्मे करिती ह्मणोनिच अती संशुद्ध ती जाहली. ६१
हीच्या उत्तरकोशलेश पुलिनोत्संगीं सुखें खेळले,
तैसें पुष्कळ आणि निर्मळ पया प्राशोनियां पोसले;

१ यमुना. २ गुह म्हणून एक किरात होता. तो रामाचा फार मित्र असे. त्यानेंच राम वनवासास जाऊं लागला तेव्हां आपल्या नौकेंत बसवून भागीरथीचे पार उतरून दिला. रामाचा आदर सत्कार या वेळेस त्यानें फारच केला तेणेंकरून रामास फार समाधान वाटलें. ३ सरोवर. ४ जलक्रीडा. ५ यज्ञाच्या अंतीं. ६ या सरयूच्या ( पुलिनोत्संगीं ). ७ उत्तर कोशल देशचे राजे. ८ वाळवंटरूप मांडीवर.

या हेतूस्तव वाटतें मम मनीं, कीं, ही नदी निश्चयें,
त्यांची एकचि सर्वही मिळुनियां माता असे हे प्रिये. ६२
मातेच्या परि ही वियुक्तचि असे मान्यें नृपानें धुनी,
मी आलों वनवास भोगुनि असें ती मानसीं जाणुनी;
वातें शीत तरंगरूप कर जे त्यांनींच आलिंगिते,
जाणों ही मजला, सुधांशुवदने, ऐसें मला भासतें. ६३
संध्या रक्त जशी तशीं अवनिचीं मोठीं उडालीं रजें,
त्यांतें पाहुनि, वाटतें मम मनीं कीं संभ्रमें वायुजें;
नंदिग्रामिं महोत्सवें कळविला वृत्तांत माझा बरा,
ऐकोनी भरत त्वरें मजकडे येण्या निघाला खरा !. ६४
मारोनी खरदूषणादि रिपुंला येतां फिरोनी सखे,
रक्षूनी तुज लक्ष्मणें मम करीं जैसें दिलें कीं सुखें;
आलों तातकृता खरी करुनि मी आज्ञा तसी मागुती,
लक्ष्मी रक्षित केलि ती भरत हा देईल माझ्या हतीं ! ६५
मागें ठेवुनि सर्व सैन्य अपुल्या अग्रीं गुरूला करी,
तैसा वृद्ध अमात्यवर्ग अवघा घे जो सवें सुंदरी;
पूजापात्रहि यत्करांत विलसे जो वल्कलें नेसला,
तो पाहे भरत, प्रिये, मजकडे पायींच येतो भला. ६६
बापानें दिधली ह्मणोनि कँरगा श्री यास होऊन ही,
माझ्यासाठिंच भोगिना तरुण ही हें जाणती सर्वही;
चौदा वत्सर हा हिच्या सह जणूं हें आसिधारव्रत,
मोठें दुर्घट आचरी भरत, हें वाटे मला निश्चित." ६७

१ नदी. २ हें संबोधन. ३ हनुमंतानें. ४ खरदूषणादि राक्षसांस मारून परत आलों असतां लक्ष्मणानें तुझें रक्षण करून तुला माझ्या स्वाधीन केलें तसा सांप्रत हा भरतही मी ताताज्ञा संपादून आलों आतां संभाळून ठेविलेली राज्यलक्ष्मीही माझ्या स्वाधीन करील, असा अर्थ. ५ बापानें केलेली. ६ प्रधानमंडळी. ७ हस्तगत. ८ तरुण पुरुष आपली तरुण स्त्री जवळ असतांही तिचा समागम न करितां मनोनिग्रह करून वागतो तें आसिधाराव्रत होय. हें तरवारीच्या धारेवर चालण्याप्रमाणें परम दुष्कर होय म्हणून यास आसिधाराव्रत म्हणतात.

ऐसें बोलुनि रामचंद्र विरमे[1] तों तें विमान स्वयें,
त्याचें जाणुनियां मनोगत तईं खालिं नभांतोनि ये;
तेव्हां देखुनि पुष्पकास भरतासंगें अलेल्या प्रजा,
झाल्या विस्मित आणि तुष्ट मनिंची टाकोनि सारी रुजा.[2] ६८
सर्वांच्याहि पुढें बिभीषण असे, त्यानें स्वयें दाविला,
तैसा जो स्फटिकीं मनोज्ञ रचिला त्या दिव्यमार्गें भला;
सुग्रीवें विनयें दिल्या निजकरां आलंबुनी तो बळी,
श्रीराम प्रभु उत्सवें उतरला यानांतुनीं भूतळीं. ६९
तेव्हां वंशगुरू वसिष्ठमुनि जो त्याला नमूनी अधीं,
स्वीकारी भरतें समर्पित अशा अर्घ्यादिकातें सुधी;
बंधूसाठिच तातदत्तहि[3] न घे राज्यास ऐशा तया,
आलिंगी भरतास साश्रु हृदयीं, हुंगी शिरा त्याचिया. ७०
पारंब्या बहु वाढुनी वटतरू ते दीसती कां जसे,
श्मश्रू वाढुनियां विरूप दिसती ते वृद्धमंत्री तसे;
त्यांचे घेउनि तो प्रणाम विभु त्यां पाहे कृपादृष्टिनें,
त्यांचें तेवि विचारुनी कुशलही संतोषवी वाणिनें, ७१
'हा माझ्या व्यसनीं सहाय भरता सुग्रीवनामा हरी,[4]
तैसा हा दुसरा बिभीषण, रणा सर्वांपुढें जो करी;'
ऐसें सादर रामवाक्य भरतें ऐकोनि दोघांजणा,
तो वंदी प्रथम स्वतां सुविनयें टाकोनियां लक्ष्मणा. ७२
तो सौमित्रिकडे वळे मग, पडे तोही[5] पदीं त्याचिया,[6]
हातानें उठवोनियां भरतही आलिंगि तेव्हां तया;
घावा इंद्रजितें[7] कृता[8] सुकठिना सौमित्रिवक्षःस्थळीं,[9]
आलेल्या खपल्या खुपोनि भरता पीडा बहू जाहली. ७३
[मं.क्रां.] रामाज्ञेनें मनुजतनुला घेउनी वानरेश,[10]

---

१ विराम पावे. २ चिंता. ३ बापानें दिलेलेंही (राज्यास). ४ वानर. ५ लक्ष्मणही. ६ भरताच्या. ७ इंद्रजितानें. ८ केलेल्या ( घायां ). ९ लक्ष्मणाच्या उर:स्थळीं. १० मुख्यमुख्य वानर.

ज्यांच्या गंडामधुनि निघती दानधारा विशेष;
त्या हत्तींच्या त्वरित वरतीं बैसती ते सुखानें,
आतां आहों गिरिवरि असें मानिती तें मनानें. ७४

[शा.वि.] संकल्पें रचिले यथेच्छ रथ जे मायाबलें राक्षसीं,
त्यांपेक्षांहि विशेष सुंदर असे जे निर्मिले मानुषीं;
ते आणोनि तिथें विशाळ भरतें सोत्साह हो त्यां रथीं,
रामाच्या वचनें बिभीषणमुख क्रैव्याद ते बैसती. ७५

[द्रु.वि.] भरत लक्ष्मण यांसह राम कीं, पुनरपी बसला प्रभु पुष्पकीं,
बहुत सुंदर आणि सुदीर्घ ज्या, फडफडी असली विलसे ध्वजा;

[शा.वि.] सायंकाळि जयांत वीज चमके ऐशा पयोदावरी,
शोभे संस्थित चंद्रमा बुधगुरू यांहीं जसा अंबरीं;
तैसा हा प्रभुरामचंद्र अपुल्या बंधूंसवें पुष्पकीं,
उत्साहें स्थित देखती सकल ही त्यातें प्रजा कौतुकी. ७६

क्षोणीला प्रलयोदकांतुनि जसा वाराहरूपी हरी,
कांतीला विधुच्या शरत् घनगणा सारूनि जेवी दुरी;
रामें रावणसंकटांतुनि तसें उद्धारिलें जीस ती,
वंदीली भरतें प्रसन्नहृदया यानस्थ सीता सती. ७७

वंदी रावण मस्तकें तरि तया धिःकारिजे हें व्रत,
ज्याचें वास्तव वंद्य तें पद असे वैदेहिचें निश्चित;
तैसा अग्रज बंधुसाठिच जटा ज्याच्या वरी शोभती,
कैकेयीसुतशीर्ष यापरि ह्मणोनी पूत ज्यां मानिती;

[शा.] त्यां दोहोंचा वंदनीं योग झाला, पाहोनी त्या वाटलें तें जनाला;
एकेठायीं होउनी येच रीती, अन्योन्याही शुद्ध जाणो करीती. ७८

[शा.वि.] अग्रीं चालति लोक, पुष्पक तयां मागें हळू चाललें,
ऐसें येउनि अर्धकोस नगरोद्यानीं उभें राहिलें;

१ बिभीषणादिक. २ राक्षस. ३ मेघावर. ४ बुध व गुरु या ग्रहांनीं युक्त. ५ वराह अवतार धारण करणारा विष्णु. ६ शरत्काळ (कर्ता). ७ मेघसमुदायास (दूर सारुनि). ८ भरताचें मस्तक. ९ पवित्र. १० भरतशीर्षा. ११ सीतापाद आणि भरतमस्तक यांचा.

शत्रुघ्नें पटमंदिरें रचियलीं होतीं जिथें तें महा,
तेथें जाउनि मंडळीसह सुखें राही प्रभू राम हा. ७९

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंश काव्य रचिलें मोठ्या श्रमें प्राकृती
त्याचा सर्ग असा त्रयोदशहि हा देखा तुम्ही संप्रती. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा रामचंद्रअयोध्यागमननामक त्रयोदश सर्ग समाप्त झाला असे.

---

## सर्ग चवदावा.

श्लोक.

[शा.वि.] साकेतोपवनांत लक्ष्मण तसा श्रीराम दोघेजण,
पाहाती जननीस, होय तंव तें उद्विग्न त्यांचें मन;
कांकीं, भर्तृवियोग होउनि बहुक्लेशार्त झाल्या तशा,
होतां आश्रयवृक्ष भग्न सुकती उद्यानवल्ली जशा. १
ज्यांनीं शत्रुस जिंकिलें भुजबळें जे विक्रमें शोभले,
दोघांनींहि तिहीं क्रमें निजनिजे मातेप्रती वंदिलें;
तेव्हां अश्रुमुळें दिसे न नयनां मातांचिया चांगलें,
त्यांच्या स्पर्शसुखेंचि त्या वळखिती कीं पुत्र हे आपले. २
आनंदाश्रु सुशीत मातृनयनीं आले; तिहीं सत्वर,
पूर्वीच्या बहुतीक्ष्ण शोकजजला तत्काळ केलें दुर;
ग्रीष्मीं जन्हुसुता तसीच सरयू यांच्या सुतप्ता जळा,
शीतादिस्थित निर्झरोदक जसें दे शीतता त्याजला. ३

---

१ अयोध्येजवळील बागांत. २ आश्रयभूत झाड. ३ पुत्रांच्या. ४ त्या माता. ५ शोकानें उत्पन्न झालेलें ( जळ ). ६ भागीरथी. ७ हिमालयांतील झऱ्यांचें पाणी. ८ देतें.

पुत्रांगीं व्रण राक्ष[1]सास्त्रकृत ते ओलेच पाहूनियां,
मातांच्या हृदयांत फारचि तईं उत्पन्न झाली दया;
जो कां [2]क्षात्रवधूस वीरजन[3]नी हा शब्द मोठा प्रिय,
युद्धक्लेश मनांत येउनि तयां [4]तोही गमे अप्रिय. ४
" [5]भर्तृक्लेशकरी कुलक्षण असी मी सासुबाई सुन,
सीतानामक तूमच्या करितसें पादांबुजा वंदन; "
ऐसें बोलुनि जानकी सुविनयें सख्या व सावत्र यां,
[6]साम्यें दोनहि सासवांस करिती झाली प्रणामक्रिया. ५
" आतां ऊठ मुली ! तुझ्याच सुकृतें हे बंधु दोघेजण
मोठा दुस्तर दुःखसिंधु तरले यामाजि संदेह न !"
ऐसें भाषण गोड आणिक खरें सीतिप्रती तेधवां,
प्रेमार्द्रें हृदयें सुयुक्त करिती दोघी तिच्या सासवा. ६
रामाचें अभिषेककार्य ज[7]ननीसानंदनेत्रांबुनीं,
केलें चालु, पुढें महोत्सवभरें [8]वृद्धाप्त सन्मंत्रिनीं
सोन्याचे घट शेंकडो करयुगीं घेवोनि तीर्थांचिया
तोयानें तव शेवटास विधिनें नेलें प्रमोदें [9]तैया. ७
तीर्थें सिंधु नद्या सरें असति जीं जावोनि तेथें त्वरें,
जीं कां [10]वांनरराक्षसीं अणियलीं हर्षाचिया निर्भरें;
तीं पुण्यें विमलें जळें पडलि तैं रामाचिया मस्तकीं,
[11]जैसें विंध्यशिरोग्रभागिं पडिजे कीं स्वच्छ मेघोदकीं. ८
[उ.जा.] तपस्विवेषें बहु शोभलासे, तो शोभला फाराचि राजवेषें;
शोभा असी त्यास चढे विशेष, [12]तीतेंचि आला पुनरुक्त दोष. ९
[शा.वि.] मोठा [13]स्यंदन उन्नतध्वज तईं होता बहू चांगला,
त्यामाजी प्रभुरामचंद्र विनयें स्वर्णासनीं बैसला;

---

१ राक्षसांच्या शस्त्रांनीं झालेले. २ क्षत्रियस्त्रियांस. ३ वीराची माता. ४ तो वीरजननी हा शब्द. ५ भर्त्याला कष्ट देणारी. ६ बरोबर. ७ मातांच्या आनंदयुक्त अश्रुनीं ( चालू केलें ). ८ म्हातारे आप्त साधु मंत्री यांनीं ( संतोषानें शेवटास नेलें ). ९ अभिषेककार्यी. १० वानर आणि राक्षस यांनीं. ११ विंध्याद्रीवर जसा पाऊस पडतो तसी. १२ त्या शोभेलाच ( पुनरुक्त दोष आला म्ह० द्विगुणित झाली ). १३ ( हें दोन श्लोकांचे मिळून भाषांतर आहे ).

शत्रुघ्नें सहलक्ष्मणें धरियेली माथ्यावरी चामरें,
छत्रातें धरिलें स्वतांचि भरतें सौहार्दयुक्तांतरें;
गंभीरध्वनि दुंदुभिप्रमुख तें वाद्यें बहू वाजती,
सेना मंत्रि कपींद्र राक्षस सुहृत् मागेंपुढें चालती,
ऐसा राघव बंधुयुक्त नगरीमाजी प्रवेशा करी,
सामादी चवघे उपायचि भले लोकां गमे अंतरीं;
तेव्हां पौरवधू सुसौधशिखरीं हर्षें उभ्या राहती,
श्रीरामप्रभुच्या शिरीं करयुगें लाह्या त्वरें टाकिती;
मार्गीं बांधुनि तोरणें जन सुखें त्या उत्सवा पाहती,
झाला हर्ष मनास जो नचि असे, त्या पाहतांना मिती. १०.१

[उ.जा.] कृष्णागरू जाळिति राजगेहीं, ती धूमलेखा गगनांत जाई;
तेथें तिला थोर समीर लागे, तत्काळ ती फांकुनियां दुभागे
वेणी जशी ती पुरिचीच काळी, येवोनि रानांतुनि तेचिकाळीं
रामें स्वहस्तें जणुं मुक्त केली, बुद्धी अशी लोकमनांत झाली. १

[शा.वि.] आनंदें तंव सासुवा निजकरें जीलागिं शृंगारिती,
तैसी जी लघुशा रथांत बसली, जी राघवाची सती,
ती आली समजोनियां झटकरी प्रासादवातायनीं
हातां जोडुनियां प्रणाम करिती त्या नागरी कामिनी. १
फांके कांति सदा कधीं न बिघडे ऐशा सती अत्रिची,
देई ज्या अनुलेपनास, धरि त्या अंगीं सुता भूमिची;
त्यायोगें जणुं अग्निशुद्धि करुनी जैसी पुन्हा काढिली
तैसी दाखवितां पुरीस पतिनें ती जानकी शोभली. १
सौजन्यांबुधि रामचंद्र अपुल्या मित्रास अत्यादरें,
राहाया सदनें समृद्ध सुखदें विस्तीर्ण देई त्वरें;
तांताचें मग चित्र मात्र उरलें जेथें अशा मंदिरीं,

१ स्नेहयुक्त मनानें. २ इयत्ता. ३ धुराची पंक्ती. ४ वाड्यांच्या खिडक्यांत. ५ श
रांतील बायका. ६ ऐशा अनुलेपना. ७ अत्रिऋषीची सती म्ह० अनसूया ( तिनें स
तेला अनुलेपन अंगास लावण्यास दिलें होतें त्यायोगें तिची अंगकांति फार शो
होती ). ८ अनुलेपनास. ९ भूमीची सुता ( सीता ).

तो डोळ्यांतुनि अश्रु गाळित बहुक्लेशें प्रवेशा करी. १५

[शि.] "प्रतिज्ञा ताताची जननि, अवघी पार पडली,
ह्मणोनीयां अंतीं सुगतिहि तयालागिं घडली
पहातां हें सारें तवचि सुकृतें अंबे घडलें!"
असें कैकेयीला कर जुळुनि रामें विनविलें,

[उ.जा.] अशा प्रकारें रघुनायकानें, जावोनि सौधीं परमादरानें;
सांत्वोनियां कैकयकन्यकेला, संकोच चित्तांतिल दूर केला. १६

[शा.वि.] जी जी वस्तु जया अपेक्षित असे ती ती तया चांगली,
व्हावी प्राप्त सुशीघ्र, राघव अशी ठेवी व्यवस्था भली;
हें सुग्रीव बिभीषणादि अवघे पाहोनियां पाहुणे,
होती विस्मित फार; त्यांस अणुही तेथें पडेना उणें. १७

रामाच्या अभिनंदनार्थ मुनि जे आले, तयांपासुनी,
तो जन्मादिक सर्व वृत्त रिपुचें साद्यंत घे ऐकुनी;
त्याच्या विक्रमवर्णनावरुनियां ज्यानें तया जिंकिलें,
त्याचें अद्भुत वीर्य सूचित कथेमाजी स्वयें जाहलें, १८

पूजा घेउनि तापसेंद्र सकल स्वस्थानिं गेल्यावरी,
जाई पक्ष सुखांत तो न कळला ज्यांना मनोभ्यंतरीं;
भूपा देववि जानकी करि तयां देई निरोपा कृती,
गेले ते कपिराक्षसेंद्र अवघे तुष्ट स्वदेशाप्रती. १९

इच्छेला अनुलक्षुनि गति सदा ज्या व्योमयाना असे,
त्याला रावणजीवितासह पुरीं नेलें निजेच्छावशें;
यक्षेशोद्वहनार्थ मागुति तया आज्ञापिलें राघवें,

---

१ हें संबोधन. २ वाड्यांत. ३ समाधान करून. ४ पंधरा दिवस ( पंधरवडा ). ५ सत्कार. ६ सुग्रीव व बिभीषण. ७ पुष्पक विमान हें कुबेराचें होतें तें रावणानें त्याजपासून जिंकून लंकेंत आणिलें होतें. रावण मारल्यावर सीतेसहवर्तमान राम त्यांतच बसून परत अयोध्येप्रत आला. त्या विमानांत बसलें असतां जिकडे जाण्याची इच्छा करावी तिकडे त्यानें जावें असा त्यांत गुण होता. मोठी तपश्चर्या करून कुबेरानें हें संपादिलें होतें. राम अयोध्येस आल्यावर त्यानें त्यास कुबेराकडे परत जाण्याची आज्ञा केली. ८ कुबेरास वाहण्यास.

स्वर्गालंकृतिभूत, पुष्पक हि तें जाया निघालें जवें. २०

[शा.] ताताज्ञेनें भोगुनी वन्यवास, राज्यश्रीही पावला तो अशेष;
धर्मीं अर्थीं आणि कामींहि तेवी, तुल्या वृत्ती बंधुवर्गीं हि ठेवी. २१

[शा.वि.] सर्वांही जननींवरी रघुपती प्रीती करी सारिखी,
सत्कारा करुनी समानाचि सदा राखी तयांना सुखी;
सोही स्वीयमुखीं पयोधरभवा क्षीरीं पिवोनी गुहें,
कीजे ज्यापरि कृत्तिका सकळिका संतुष्ट तैसेंचि हें. २२

होता फार उदार यास्तव बहू संपन्न झाल्या प्रजा,
विघ्नातें निरसी ह्मणोनि करिती यज्ञादि कर्मा निजा;
न्यायें वागवितो सदैव ह्मणुनी वाटे तयांना पिता,
शोका दूर करी, ह्मणोनि सुतसा तो भासला तत्वतां. २३

तेव्हां राघव राज्यकार्य अवघें कालीं स्वयें पाहुनी,
होई तो रममाण भूमितनयेलागीं सवें घेउनी;
लक्ष्मीभोग करावया मनिं बहू उत्कंठ झाली असे,
ती सीताकृति घेउनी अवतरे लोकांस भासे असें. २४

जेथें तें वनवास वृत्त लिहिलें भिंतीवरी सुस्थित,
त्या गेहीं हृदयानुकूल विषया सेवोनियां संतत;
सीता आणिक राम या उभयतां ती वन्य दुःखस्थिती,
चित्तीं आठउनी सुखावह बहू झाली तयां संप्रती. २५

झालीं स्निग्ध विलोचनें, बहु तसें धौवल्य गालां अलें,

---

१ वेगें. २ आपुल्या साहाही मुखांनीं. ३ स्तनांतील. ४ दुग्धा. ५ षडाननानें. ६ शिवाचें वीर्य अग्नीनें धारण केलें. तें सहन होईना म्हणून त्यानें तें ब्रह्मदेवाच्या सांगीवरून गंगेला दिलें. गंगेनें कांहीं दिवस उदरांत धारण करून तो गर्भ शरवण या नांवाच्या वनांत टाकिला. तो कृत्तिकांनीं घेतला. त्या साहाजणी होत्या म्हणून त्या गर्भास साहा मुखें होऊन त्या साहाही कृत्तिकांचे स्तनपान एकदम केलें. अशीं त्याला साहा-मुखें झालीं म्हणून त्याचें नांव षण्मुख पडलें. कृत्तिकांनीं वाढविलें म्हणून कार्तिकेय, व गुहेंत राही म्हणून गुह, व गंगेच्या उदरीं होता म्हणून गांगेय, अग्नीनें धारण केला म्हणून अग्निभू, देवांचा सेनापति झाला म्हणून सेनानी, अशा प्रकारचीं अनेक नावें त्यास पडलीं. ७ लोकसमुदाय. ८ यथाकालीं. ९ पांढरेपणा.

ऐसें [1]भूमिसुतेस लक्षण तया सुस्पष्ट तें जाहलें;
[2]तेणें ती, " मज होति दोहद बरें ! गर्भार मी हो खरी,"
हें [3]शब्दाविण सूचवूनि पतिला संतुष्ट सीता करी. २६
झाली फार कृशा विदेह[4]तनया त्या गर्भयोगामुळें,
तें [5]वक्षोजयुगाग्रभागिं सुभगीं कृष्णत्व ये आगळें;
होती लज्जित ती, तथापि तिजला घेवोनि अंकीं पुसे,
एकांतीं [6]रघुनाथ, 'काय सखये चित्तांत इच्छा असे ?' २७
'जेथें पक्षि व भिक्षु यांजकरितां [7]नीवारधान्यें मुनी,
जीं कां ठेविति, त्यांस [8]हिंस्र पशुही ते चाविती येउनी;
जेथें राहति मैत्रिणी ऋषिसुता, भूमीहि [9]दर्भान्विता,
ऐशीं शांत तपोवनें विलसती गंगातटीं तत्वतां;
[उ.जा.] तपोवना त्याचि पुनश्च जावें, असें मना वाटतसे स्वभावें;'
ऐशापरी तें [10]जनकात्मजा ते, सांगे तया [11]पंक्तिरथात्मजातें. २८
[शा.वि.] 'संपादीन तुझें अभीप्सित,' असें सीतेप्रती बोलुनी,
तत्कालोचित भृत्यवर्ग अपुल्या संगें प्रभू घेउनी;
तें [12]अत्युन्नत सौधभागिं चढुनी तेथूनि सीतापती,
पाहे लाउनि सूक्ष्म दृष्टि अपुली सानंद [13]पौरस्थिती. २९
[स्र.] मोठाल्या राजमार्गीं बहुविध बसलीं, तैं समृद्धें दुकानें,
वस्तूंनीं थोर नौका सरयुंत भरल्या चालताती जवानें,
बागामध्यें विलासी जन करिति तईं क्रीडना हर्षयोगें,
ऐसी ती पत्तनाची स्थिति तंव विभुच्या मानसा गोड लागे. ३०
[शा.वि.] वक्त्यांमाजि वरिष्ठ आणि समरीं ज्याणें रिपू जिंकिले,
[14]नागेशापरि लंबमान सुभुजद्वंद्वप्रभें शोभलें;

---

१ सीतेस. २ त्या चिन्हांच्या योगानें ( ती (सीता) मला डोहळे होतात मी गर्भिणी आहें हें शब्दानें न बोलतां पतिला सूचवून संतुष्ट करी असा अन्वय ). ३ बोलल्यावांचून सूचवी म्हणजे नेत्र स्निग्धता व मुखधावल्य हें लक्षण पाहूनच रामाला ही गर्भिणी आहे असें समजून संतोष झाला असा भावार्थ. ४ सीता. ५ स्तनांच्या मुखांस. ६ राम. ७ ऋषिधान्यें. ८ घातुक. ९ दर्भयुक्त. १० सीता. ११ रामातें (सांगे स्वनाथा रघुनायकातें ) असें पाठांतर. १२ वाड्याच्या उंच भागावर. १३ शहरांतील लोकांची स्थिती. १४ सर्पराजाप्रमाणें.

ज्याचें पूत चरित्र, तो रघुपती भद्राख्यदूता पुसे,
कीं 'सांगें नगरींतले जन मला हे मानिती रे कसे?' ३१
रामाच्या बहु आग्रहास बघुनी, तो भद्रनामा चर
सांगे, श्रीरघुनायकास नगरीवृत्तांत तैं सादर;
कीं 'रक्षःपतिसद्मसंस्थित असी स्त्री आणिली ही गृहीं,'
यावांचोनि समग्र कृत्य तुमचें वाखाणिती सर्वही. ३२

[शि.] कलत्राच्या दोषास्तव सकल निंदेस करिती,
अशी वार्त्ता जेव्हां श्रवण करि राजा रघुपती,
सुतप्ता लोहाचा दृढघनवशें गोलक जसा,
तसें त्याचें झालें हृदय शतधा भग्न सहसा. ३३
'उपेक्षावें लज्जा त्यजुनि जननिंदेसचि अतां,'
त्यजावी वा भार्या वनिं अगदिं निर्दोष असतां!
अशा चिंतेमाजी रघुपतिमनाची स्थिति तसी,
जहाली हिंदोळ्यावरि बसुनि होते चल जसी. ३४

[शा.वि.] लोकांचा अपवाद दूर करण्या नाहीं उपायांतर,
भार्यात्यागचि तो सुनिश्चित करी तैं जानकीचा वर!
ज्यांना स्वीयतनूहुनीहि गमते कीर्तीच मोठी असी,
ऐशा कीर्तिधनां उदार पुरुषां भार्याकथा कायशी. ३५
एकांतीं मग राघवें स्वभवनीं बंधूंस बोलाविलें,
ग्लाना तद्वदना विलोकुनि मनीं खेदास जे पावले;
निंदा जी नगरींत लोक करिती ती त्यांस सांगोनियां
श्रीराम प्रभु खिन्न होउनि तईं हें वाक्य बोले तयां. ३६
"ज्याचें मूळ सहस्ररश्मि असला राजर्षिचा वंश हा,
शुद्धा ही मजपासुनी अतिशयें दोषी जहाला पहा!
मेघापासुनि येतसे सजल जो वायू तयें दर्पणा,
मालिन्य स्फुट ये, अतां मम तशी ही गोष्ट झाली ह्मणा. ३७

१ (दूताचें नांव भद्र होतें). २ रावणाच्या घरीं राहिलेली. ३ शंभर तुकडे झाले. ४ आपल्या देहाहून. ५ कीर्ती हेंच ज्यांचें धन अशा. ६ सूर्य. ७ मी स्वतां शुद्ध असूनही माझ्या योगानें सूर्यवंश दोषी म्हणजे कलंकयुक्त झाला. ८ येतें.

तेलाचा अतिसूक्ष्म बिंदु उदकीं विस्तीर्ण होतो जसा,
भ्रात्यांनो, पसरे दिनानुदिन हा आक्षेप[1] लोकीं तसा;
आलानाभिध[2] खांब राजसदनीं सोसे न दंतावला[3],
तैसा हा अपवाद आज पहिला सोसे न जाणा मला. ३८
तोकाचा[4] जरि लाभ सन्निध दिसे, तत्रापि ही जानकी,
टाकीतों अपवाद दूर करण्यासाठीं अतां मी निकी;
गर्भीं रत्नसमुच्चय स्थित असे जीच्या असी चांगली,
ताताच्या वचनावरोनि पृथिवी पूर्वीं जसी टाकिली. ३९
सीता शुद्ध ह्मणोनि निश्चय जरी माझा असे जाहला,
तत्रापी अपवाद हाचि बलवान् तो मान्य आहे मला;
आहे वास्तव चंद्र निर्मळ परी त्याच्यावरी सावली,
भूमीची असुनी कलंक ह्मणुनी लोकीं खरी मानिली. ४०
युद्धीं राक्षस मारिले सकळ ही दावोनि मी विक्रम,
तेणें वैरविशुद्धि होय ह्मणुनी न व्यर्थ माझे श्रम;
पुच्छीं पाय पडे तईं उलटुनी पायां अही झोंबतो,
सांगा क्रोधभरेंचि तें करितसे, वा, रक्तपानार्थ तो ? ४१
[स्र.] टाकावी जानकी, हा नियम दृढचि म्यां धारिलासे मनानें,
याला येऊं नका हो किमपिहि अडवे बांधवांनो दयेनें;
जावोनी शल्य माझें बहुत दिवस मी वांचिजे वासना जी,
ऐसी चित्तांत आहे खरि जरि तुमच्या, ही करा गोष्ट माझी. ४२
[शा.वि.] सीतेच्या विषयीं प्रसिद्ध विभुचा अत्यंत उग्राग्रह[5]
पाहोनी, सहजांस[6] त्या सकळिकां झाला जरी दुःसह,
तत्रापि प्रभुच्या पुढें न शकला बोलावया एकही,
कीं "सीतेस वनांत टाक, अथवा निभ्रांत ठेवी गृहीं." ४३
बोले सत्य तसाचि गीतयश[7] जो तो रामचंद्र स्वयें,
आहे लक्ष्मण कार्यकारि बरवा जाणोनि हें निश्चयें;
बंधूपासुनियां तयासचि तईं नेवोनि एकीकडे,

१ अपवाद. २ आलान या नांवाचा. ३ हत्तीला. ४ तोकाचा म्हणजे अपत्याचा. ५ क्रूर आग्रह. ६ बंधूंस. ७ गाइलें आहे यश ज्याचें.

"वत्सा, ऐक," ह्मणोनि राघव तया सांगे असें रोकडें. ४४

"तुझी भावजई हिणें कळविलें स्वीया प्रिया दोहदा,
कीं गंगोपवनींच वास बरवा वाटे असावा सदा;
तस्मात् दोहदहेतुनें निजरथीं घालोनियां तत्वतां,
श्रीवाल्मीकिवनांत नेउनि तिला सोडून द्यावें स्वतां." ४५

बंधूच्या वचना तशा परिसुनी, पूर्वी अरातीपरी
केला घावचि भार्गवें पितृवचें तत्काळ मातेवरी;
गुर्वाज्ञेविषयीं विचार करणें नाहींच ऐसी प्रथा,
आहे ती अनुलक्षुनी रघुवरें स्वीकारिलें त्या पथा. ४६

इष्टार्थश्रवणें तिचें मन बहू संतुष्ट कीं जाहलें,
वाजी चार हुशार निर्भय असे पाहोनि ज्या जुंपिले,
सारथ्यास सुमंत्र फार चतुर प्रख्यात तो नेमिला,
ऐशा थोर रथीं तिला बसवुनी सौमित्रि तैं चालिला. ४७

सीतेनें अटविप्रदेश रुचिर प्रत्यक्ष जैं पाहिले,
तैं "माझा पति मत्प्रियास करितो" ऐसें तिला वाटलें;
भर्ता संप्रति कल्पवृक्षसमता टाकोनि खड्गच्छदा
वृक्षाची समता धरी, न समजे हें जानकीला तदा. ४८

आतां दुर्लभदर्शन प्रियपती झाला असे ज्याजला,
तो तैं जानकिचा सवेग उजवा डोळा लवूं लागला;
जें कां लक्ष्मण गुप्त ठेवि हृदयीं सांगे न मार्गी तिला,
तें भावी गुरु दुःख नेत्रचि तिचा हा सांगता जाहला. ४९

ऐशा दुःशकुना विदेहतनया कष्टप्रदा देखुनी,
झाली म्लानमुखांबुजा तंव बहू मोठी व्यथा पावुनी;
"देवा, मत्पति सर्वदा सुखि असो सद्बंधुवर्गासह!"
प्रार्थी हेंचि पुनःपुन्हा निजमनीं भर्त्यास सौख्यावह. ५०

[शा.] ज्येष्ठाज्ञेनें लक्ष्मणें जानकीला, गंगातीरीं सोडितांना तयाला;
"बापा, आहे कर्म हें दुष्ट भारी," गंगा ऐसें वीचिहस्तें निवारी! ५१

---

१ वैन्याप्रमाणें. २ वनप्रदेश. ३ खड्गच्छद या नांवाच्या. ४ प्रियपती ज्याला दुर्लभदर्शन झाला तो ( डोळा ) असा अन्वय.

[शा.वि.] सूतें आकळुनी हयांस पुलिनीं केलें उभें स्यंदना,
तेव्हां त्यांतुनि खालतीं उतरली श्रीरामचंद्रांगना;
आणी नाव किरात जींत बसुनी तीच्या सवें तो निजं-
संधा आणिक जान्हवी तरुनियां गेला सुमित्रात्मज. ९२

आला दाटुनि कंठ फार न निघे कांहींच तोंडांतुनी,
तत्रापी अवरोनि तें वदतसे शब्दा बळें योजुनी;
अश्म्यातें घन थोर वर्षत असे उत्पातकाळीं तसा,
जोरानें धडकावि एकदम तो संदेश तें वज्रसा. ९३

जी स्वीयाभिभवानिलें बहुजवें अत्यंत संताडिली,
तेव्हां भूषणरूप दिव्य कुसुमें जीचीं गळूं लागलीं;
ती सीता अतिदुःखिता पडतसे तत्काळ भूमीवरी,
रम्या कुंदलता निचेष्ट पडते जैसी वनाभ्यंतरीं. ९४

"ज्याचें वृत्त पवित्र, भास्करमहावंशांत जो जन्मला,
तो मानी पति हेतुवांचुनि सये टाकील कैसा तुला?"
ऐसा संशय घेउनी जणुं तिची माता स्वतां मेदिनी,
पोटीं आपुलिया न घे जनकजादेहास ती तत्क्षणीं. ९५

जेव्हां मूर्छित ती पडे तंव तिला पीडा न कांहीं कळे,
ये शुद्धीवर ती तईं मन तिचें तापाप्रती पावलें,
केलें सावध लक्ष्मणें जरि तिला मोठ्या प्रयासें तरी,
मूर्छेहूनिहि तो प्रबोधचि तिला दुःखास दे अंतरीं. ९६

कांहीं दोष नसोनि घोर विपिनीं जो कां तिला पाठवी,
ऐशाही पतिलागिं दुष्ट वचनें निंदी न ती पार्थिवी;
"आहें पापिण मीच, यास्तव अशीं दुःखें मला पातलीं,"
वारंवार अशी सती जनकजा निंदा करी आपुली. ९७

---

१ ( निजसंधा म्हणजे प्रतिज्ञा व जान्हवी दोनही तरून गेला असा अन्वय ). २ लक्ष्मण. ३ पाषाणातें. ४ एकदम धडकावून सांगे. ५ आपुल्या तिरस्काररूप वायूनें. ६ सीतेच्या शरीरास. ७ सीता. ८ जागृती. ९ सीता.

आश्वासोनि सतीस बोधवचनें त्या वाल्मीकीच्या गृहीं,
जाण्याचा पथ दावि लक्ष्मण, व तो उक्ती वदे तीस हीं;
"हे देवी, करि गे क्षमा, सकलही आज्ञा प्रभूची असे !
मी तों सेवक," हें वदोनि चरणीं माथ्यास ठेवीतसे. ५८
वैदेही उठवोनि शीघ्र वदली हें वाक्य त्यातें तदा,
"झालें तुष्ट तुझ्यावरी, बहुत मी वांचोनि पावे मुदा;
इंद्राधीन उपेंद्र यास्तव जनीं त्याची करीती स्तुती,
ज्येष्ठाच्या वचनांत वागसि सदा तूंही तसा बा कृती. ५९
सांगोनी मम सासवांप्रति नमस्कारा यथानुक्रमें,
विज्ञप्ती सकळा निवेदित करी, तूं भक्तिच्या संभ्रमें;
कीं माझ्या उदरांत गर्भ तुमच्या झाला सुतापासुनी,
हें जाणोनि तुह्मी तया अनुदिनीं कल्याण चिंता मनीं. ६०
माझें वाचिक हें नृपा कळविजे वत्सा तुवां आदरें,
अग्नीमाजि विशुद्ध होउनि पुन्हा बाहेर आलें बरें !
हें पाहोनि समक्षही करिसि तूं त्यागास माझ्या स्वतां,

१ वाल्मीकि ऋषि हा मुळीं आईबापांनीं वनांत टाकलेलें बाल होतें तें किरातांनीं वाढवून मोठें केलें. त्यांतच याचें लग्न होऊन संतति झाली त्यांच्या पोषणार्थ हा वाटेंत लोकांस लुटून द्रव्य मिळवी. एके समयीं कोणी महर्षीस लुबाडीत असतां "ज्यां करितां हें पाप करितोस तो स्त्रीपुत्रादि परिवार या पापाचा विभागी होण्यास इच्छितो किंवा नाहीं" हें पुसण्यास सांगीतल्यावरून त्यानें त्यांस तें पुसतांच "आम्ही द्रव्याचे विभागी, पापाचे नव्हे" असें त्यांचें उत्तर ऐकतांच तो पश्चात्ताप पावून त्या महर्षीस शरण आल्यावरून त्यानें त्यास 'मरा' असा राम या पदाचीं उलटीं अक्षरें सांगून जप करायास सांगीतल्याप्रमाणें जप करीत बहुत काळ बसला. तेव्हां त्याच्या आंगावर वल्मीक ( वारुळें ) वाढलीं म्हणून त्यास पुढें वाल्मीक असें नांव पडून तो महर्षींमध्यें गणला गेला. त्यानेंच रामायण म्हणून रामकथेवर काव्य केलें. त्यास वाल्मीकिरामायण असें म्हणतात. तो तमसा नदीजवळ आश्रम करून राहिला. त्याचेच आश्रमांत सीता प्रसूत होऊन तिला लव व कुश असे दोन पुत्र झाले. त्यांस यानें रामायण काव्य गावयास शिकविलें तेंच त्यांनीं रामाच्या सभेंत गाइलें असें म्हणतात. रामायण हें आद्य काव्य आणि त्याचा कर्ता वाल्मीकि ऋषी हा आद्य कवि होय असें म्हटलें आहे. २ इंद्राचा धाकटा भाऊ. ( विष्णु ). ३ राजाला ( रामाला ).

आहे हें उचित प्रभो सुविदिता वंशास कीं तत्वतां? ६१
किंवा नीतिपथेंचि वर्तसि सदा केव्हां न इच्छावशें,
त्यागाचा मम पाहतां तुजकडे तो दोष कांहीं नसे;
केलीं दुस्तर पातकें विविध जीं म्या पूर्वजन्मांतरीं,
त्यांचा दुःसह पाक वज्रसम हा, ही गोष्ट आहे खरी! ६२
झाली प्राप्त तुला स्वयें सकलही लक्ष्मी, तरी तूं तिला,
टाकोनी, विपिनांत जासि नृपते घेवोनि संगें मला;
आतां त्वद्भवनीं तुझ्यासह मला देखोनियां सुस्थित,
क्रोधानें बहुतप्त होउनि तिला सोसे न हें निश्चित. ६३
केले पीडित राक्षसीं मुनि असें देखोनि त्यांच्या स्त्रिया,
आहें दक्ष तुझ्या रूपें ह्मणुनि त्या येती मदीयाश्रया;
आतां तूं प्रभु जागरूक असतां कोण्या तपस्व्याकडे,
जाऊं मीं निजरक्षणार्थ मज हें मोठें दिसे सांकडें. ६४
किंवा त्वद्विरहामुळें अफल हें जीवित्व झालें असे,
वाटे फारचि तुच्छ यास्तव मला आशा ययाची नसे;
पोटीं त्वद्भव गर्भ हाचि अडवा येतो ह्मणोनी स्वतां,
सोडाया भय वाटतें प्रभुवरा, अन्नोदका तत्वतां. ६५
झाल्यानंतर मी प्रसूत रविच्या बिंबाकडे लावुनी
दृष्टी, दुस्तर गा तपास करिजे आहे असें मन्मनीं;
जेणें तूंचि पती मला मिळशिल प्राणप्रिया आणखी,
भावी जन्मिंहि, तेवि त्या अविरहें राहीन भूपा सुखी. ६६
सद्वर्णाश्रमपालन प्रभुवरा हा धर्म राजाप्रती,
आहे वास्तव उक्त थोर मनुनें, तूं जाणसी निश्चितीं;
आहें संप्रति मी जरी त्यजियली नाथा महा काननीं,
तत्रापि क्षितिनायका मज तपस्व्यांच्या गणीं तूं गणी." ६७

१ "किंवा श्रुता?" असें पाठांतर जाणावें. २ त्या लक्ष्मीला (न सोसे). ३ (माझ्या आश्रयाला येत असत). ४ रामचंद्र. ५ पुढील जन्मीं. ६ वियोग न होतांना. ७ तपस्व्यांत मला गणिली ह्मणजे त्यांच्या बरोबर अर्थात् माझेंही रक्षण तुझ्या हातून घडेल.

[शा.] ऐसे तीचें ऐकुनी वाक्य पूर्ण, माघारें तो जाय सौमित्रि तूर्ण,
भेणें जैसी कूररी तेविं आतां, शोकावेगें ओरडे फार सीता. ६८

[शा.वि.] वृक्षांनीं कुसुमें, तसींच शिखिनीं नृत्यें तईं सोडिलीं,
भक्षाया धरिलीं तृणें मृगगणें तोंडांतुनीं टाकिलीं;
ऐशी जानकिच्या समान घडली अत्यंत दुःखस्थिती,
एणें त्या विपिनींहि रोदन बहू तें चाललें संप्रती. ६९

क्रौंचाला वधितां नदीतटिं शरें त्या देखुनी लुब्धका,
ज्याच्या शोकवशें मुखांतुनि निघे वाणीच काव्यात्मिका;
आणाया वनिं जाय दर्भ समिधा वाल्मीकिनामा मुनी,
सीतारोदन ऐकुनी जवळ ये तो तैं दया येउनी. ७०

तेव्हां ती निजनेत्रतोय पुसुनी, टाकोनियां रोदना,
सीता तत्क्षणिं त्या सती मुनिचिया पादा करी वंदना;
तीचें जाणुनि गर्भचिन्ह मनिं "हा होईल गे सद्गुणी,
तूतें पुत्र," असें वदूनि तिजला बोले असें तो मुनी. ७१

"रामानें अपवादहेतु वरुनी तूतें स्वगेहांतुनी
रानीं पाठविलें, असें समजलें ध्यानें मला गे मनीं;
आतां शोक करूं नको अगदिंही आहेस देशांतरीं
बापाच्याच गृहीं, असें समजुनी माझ्या वसे मंदिरीं. ७२

[व.ति.] त्रैलोक्यकंटक असा पति राक्षसांचा,
मारोनियां करितसे जन हा सुखाचा,
सत्यप्रतिज्ञ रणशूरहि जो न सांगे,
लोकांत आत्ममहती, बहुनम्र वागे;
ऐसा गुणी तरि अकारण गे वनांत,

---

१ शीघ्र. २ कुररी पक्षीण ही भयानें व्याकूळ झाली असतां जशी फार ओरडते तशी सीता ओरडूं लागली. ३ वाल्मीकि मुनि एकेसमयीं नदीतीरीं स्नानार्थ गेला असतां क्रौंचपक्ष्याचा जोडा झाडावर बसला असतां व्याधानें येऊन त्या दोघांपैकीं एक काममोहित असतां मारिलें तें पाहून वाल्मिकाला शोक होऊन त्या भरांत त्याच्या मुखांतून "मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः । यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम्" अशी छंदोबद्ध वाणी निघाली. या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे.

टाकी तुला धरुनि निष्ठुरता मनांत !
एणें त्वदीय पतिचा मज राग आला,
सीते अयोग्य कृति ही न रुचे मनाला. ७३

[शा.वि.] ज्याची कीर्ति विशाळ तो श्वशुरही होताचि माझा सखा,
तैसा बाप तुझा विदेहनृप जो वेदांतवक्ता निका;
सीते तूंहि पतिव्रता समुदयीं अग्रेसरा संमत,
यासाठीं अनुकंपनीय मजला तूं सर्वथा निश्चित. ७४

संबंधें मुनिच्या सुशांत असती प्राणी अशा या वनीं,
राहें तूं चिरकाळ मैथिलसुते सारीं भयें सोडुनी;
सीतें येथ तुझा सुखप्रसवही होईल तैत्संस्कृती,
आह्मी सद्विधिनें करूं सकळही हें जाण गे निश्चितीं. ७५

या पुण्या तमसा नदींत विधिनें नेमें करी आँप्लव,
तत्तीरीं उटजें अनेक असती जेथें सदा उत्सव;
सांगोपांग सुरार्चनास सुमनें तूं वाळवंटीं करी,
तेणें भूमिसुते प्रसाद तुझिया होईल गे अंतरीं. ७६

तत्तत्कालसमुद्भवें सुकुसुमें पूजोपयोगी फळें,
नीवारादिक धान्य जें उगवतें रानीं स्वयें चांगलें;
त्यांतें आणुनियां वनांतुनि तुला देतील विप्रात्मजा,
त्यांच्या गोष्टिहि ऐकुनी सुख सये होईल चित्ता तुझ्या.७७

वृक्षांचीं लघु आश्रमांत असती रोपें तयांना पया,
घालोनी स्वबलानुरूप कैलशें वाढीव यत्नें तयां;
झाला नाहिं अजून पुत्र तुजला, प्रीती तयाची तरी,
येईल स्फुट ती तुझ्या अनुभवा हें जाण तूं अंतरीं." ७८

[शि.] "कृपा ही ताताची मजवरि" वदे यापरि सती,
तिला सायंकाळीं निज उटजि ने तो कुँलपती;

१ जनक ( हाही माझा सखा आहे ). २ पतिव्रतांच्या समुदायांत. ३ त्याचे जातकर्मादि संस्कार. ४ स्नान. ५ पर्णशाळा. ६ चांगल्या मनानें. ७ विप्रकन्या. ८ त्या कन्यांच्या गोष्टी ऐकून सुख वाटेल असा अन्वय. ९ घटानें ( पया घालोनि वाढीव ). १० वाल्मीकि ऋषी.

जिथें वेदीपाशीं अभय बसलीं होतिं हरिणें,
तसे बाहेरीही पशु चरति शांतप्रकृतिनें. ७९

[शा.वि.] आली येथ विदेहजा म्हणुनियां संतोषल्या तापसी,
त्यांच्या स्वाधिन शोककर्शित अशा सीते करी तो ऋषी;
भक्षूनी पितरीं उरे विधुकळा सूक्ष्मा तयेलागिं तो,
मासींमासिं जसा वनस्पतिगणादर्श स्वयें अर्पितो. ८०

पूजेनंतर तापसीहि वसतीसाठीं नवीनोटज
देती तीस दिनावसानिं अवघे झाडोनि त्याचे रंज;
शय्या आंत पवित्र भव्य आजिना घालून केली भली,
तैलें तींचिच इंगुदीफलभवें तें दीपिका लाविली. ८१

प्रातःस्नान करोनि ती मुनिवनीं नेसे नवीं वल्कलें,
आलेल्या अतिथीस अर्चुन सती देई मुळें सत्फळें;
वैदेही पतिचा सुवंश अपुल्या राहो सुखें शाश्वत,
यासाठीं फलशाक भक्षुनि तनू रक्षीतसे संतत. ८२

"पश्चात्ताप अतां तरी प्रभुवरा होईल कीं राघवा,"
ऐसा तर्क मनांत साहजिक ये सौमित्रिच्या तेधवां;
यासाठीं अपुल्या समक्ष विपिनीं जें वृत्त तें जाहलें,
तें सीतापरिदेवनांत अवघें रामास सांगीतलें. ८३

त्यावृत्ता परिसोनि राम नयनांतूनी त्यजी जीवन,
पौषामाजि जसा निशाकर [11]निशीं वर्षे दवालागुन;
निंदेला भिउनी बळें रघुवरें रागें स्वगेहांतुनी,
सीता काढियली जरी, तरिहि तो काढी न चित्तांतुनी. ८४

जो वर्णाश्रमपालनीं रघुपती राहे सदा उद्यत,

---

१ सीता. २ शोकानें कृश. ३ तो दर्श. ४ प्रतिमहिन्यांत. पितरांनीं प्राशून उरलेल्या चंद्राच्या कलेस दर्श हा वनस्पतींप्रत देतो तशी शोकानें कृश झालेली जानकी हिला तापसींच्या स्वाधीन वाल्मिकऋषीनें केली. तात्पर्य चंद्रकलेप्रमाणें ती कृश असून आल्हादकारक होती. तिच्या योगानें चंद्रकलेपासून दर्शसमयीं जसें औषधीस तसें तापसींस सौख्य झालें असा भाव. ५ नवीन पर्णशाला. ६ त्या उटजांतील. ७ केर. ८ हिंगणबेटीचे तेलानें. ९ दिवली. १० सीतेनें शोक केला तेथपर्यंत. ११ रात्रीं.

ज्याचें चित्त रजोगुणें युत नसे, सत्वें असे संयुत,
शोका आवरुनी स्वबुद्धिविभवें राज्य स्वयें तो करी,
ऐश्वर्या उपभोगिना बहु परी भोगी स्वबंधूपरी. ८५

स्त्री एका व पतिव्रता तरि तिला लोकापवादामुळें
ज्या श्रीरामसमाव्हय प्रभुवरें[1] रानामधें टाकिलें;
त्याच्या भव्य उरःस्थलीं बहु सुखें लक्ष्मी विराजे तसी,
लोकीं जीस नसे सपत्नि[2] युवती, ती हर्ष पावे जसी. ८६

पूर्वस्त्री जरि टाकिली तरि दुजी रामें वरीली नसे,
सीतेची प्रतिमा करोनि नृपती यज्ञार्थ साधीतसे;
ऐसें बोलति वृत्त तें परिसुनी कांहीं सुखा पावुनी,
सोसी ती पतिच्या वियोगजनिता दुःखा तईं काननीं. ८७

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंशकाव्य रचिलें मोठ्या श्रमें प्राकृतीं
त्याचा सर्ग असा चतुर्दशहि हा देखा तुह्मी संप्रती. ॥१॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा सीतापरित्यागनामक चतुर्दश सर्ग समाप्त झाला असे.

---

## सर्ग पंधरावा.

### आर्या.

सीतात्यागानंतर, रत्नाकररूप मेखला जीला;
श्रीरामचंद्र नृपती, भोगी त्या एकल्यांनि भूमीला. १

---

१ श्रीरामनामक प्रभुवरानें. २ सवत. ( जीला सवत नाहीं ती स्त्री जसी हर्ष पावते तसी असा अन्वय ). ३ स्त्री. ४ यज्ञरूप अर्थ ( यज्ञकार्य साधी ). ५ समुद्र (हें हेतुगर्भ विशेषण, मेखलेला रत्नें असतात ). ६ ज्या भूमीला. ७ राजा हा पृथ्वीचा व पत्नीचा उपभोग करितो, रामानें पत्नी त्यागिली म्हणून तो एकल्या पृथ्वीचाच उपभोग करूं लागला.

लवणाख्य राक्षसानें, पीडित निजयज्ञकर्म पाहून;
यमुनातीरस्थ मुनी, रामाप्रति येति शरण जाणून. २
रक्षक राम विलोकुनि, न शापिती राक्षसा मुनी सुकृती[2];
त्राता नसतां शापायुध, लोकीं वेंचिती तपास कृती. ३
लवणा वधितों ऐसी, वदे प्रतिज्ञा विभू तया मुनिला;
धर्मावन[3] हाचि असे, अवतरण्या हेतु लोकिं यॉं हरिलों. ४
दुर्जय[6] शूल धरी जंव, ह्मणुनि नसे शूल तों तया गांठीं,
ऐसा मुनि वदति तया, उपाय हा त्याचिया वधासाठीं. ५
शत्रुघ्नाला धाडी, माराया दुष्ट राक्षसा त्वरित;
जाणों यथार्थ अभिधा, त्याची तो रिपुवधें असे करित. ६
सामान्या अपवादक, शास्त्र तसा एकलाच नर वहिला;
यःकश्चित् रघुवंशज, बाधाया शक्त होय तो अरिला. ७
रामें दत्ताशी[11] तो, शत्रुघ्न निघे तंई प्रसन्न मनें;
पाहात जाय मार्गीं, सुगंध पुष्पान्वितें मनोज्ञ वनें. ८
मागुनि राम प्रेषित, सेना साह्या करी तयास तसें;
अध्ययनवाचि[12] धातुस, अधि हा उपसर्ग भाषणांत जसें. ९

---

१ रक्षणकरणारा असें जाणून. २ पुण्यवान्. ३ धर्मांचें रक्षण. ४ या लोकीं. ५ विष्णूला. ६ जिंकण्यास अशक्य ( जोंवर हा शूल धारण करितो तोंवर अजिंक्य आहे म्हणून जों याच्या हातीं शूल नाहीं तों त्याला गांठ असा अर्थ ). ७ ऐसा उपाय. ८ (शत्रुघ्न म्ह० शत्रूस मारणारा ही अभिधा रिपुवधें यथार्थकरी असा अन्वय). ९ हा शास्त्रीय न्याय आहे. सामान्य म्हणजे औत्सर्गिक एक शास्त्र ( विधि ) असतें त्याचा अपवाद विशेष शास्त्र करितें. जसें, " सर्व ब्राम्हणांला दहीं वाढा आणि कौंडिण्याला ताक वाढा. " एथें सर्वांबरोबर कौंडिण्यालाही दहीं प्राप्त असतां ताकाच्या विशेष विधीनें त्याचा बाध केला. या न्यायास तक्रकौंडिण्य न्याय असें म्हणतात. व्याकरण शास्त्रांत हा प्रकार बहुत आढळतो. जसें संस्कृत व्याकरणांत 'कर्मण्यण्' असा सामान्य नियम आहे याचा बाध 'आतोऽनुपसर्गे कः' या अपवादरूप विशेष नियमानें होतो. १० ( अरिला बाधाया शक्त होय असा अन्वय ). ११ ज्याला आशीर्वाद दिला असा शत्रुघ्न. १२ संस्कृत भाषेत ' इङ् अध्ययने ' असा इङ् हा धातु अध्ययनार्थक आहे. त्याला अधि हा उपसर्ग लागला तरी त्याच्या साह्यानें धातूला कांहीं विशेष अर्थाचा लाभ होत नाहीं. केवळ त्या उपसर्गाचा योग मात्र होतो. तद्वत् शत्रुघ्नानें आपल्या बाहुबळानेंच शत्रूंचा पराजय केला, म्हणून रामानें जी सेना त्याच्या साहाय्यार्थ पाठविली, ती केवळ शोभार्थ झाली, प्रकृत कार्याला तिची गरजच पडली नाहीं.

शत्रुघ्नाचा चाले, रथ ज्याच्या अग्रभागिं मुनिवर्ग;
गमन करी दावित तो, दशरथपुत्रास त्या सुधा मार्ग,
तेजःपुंज रघूद्वह, रथीं दिसे युक्त मुनिगणें तैसा;
गगनांत वालखिल्य[1] व्रजयुक्तस्यंदनस्थ रवि जैसा. १०

रथरव[2] ऐकुनि जेथें, उर्ध्व गळे करुनि पाहती हरिण;
मार्गी जातां राहे, त्या वाल्मिक्याश्रमांत एक दिन. ११

तो वाल्मीकि मुनी, निजतपोबलें सिद्ध वस्तु ज्या भारी;
तीहीं श्रांताश्व[3] अशा, नृपतनयालागिं फार सत्कारी. १२

त्या रात्रींच प्रसवे, सुतद्वया भावजय तयाची ती;
संपन्न कोशदंडां, जनीं प्रसवते क्षिती[4] जशा रीती. १३

भ्रात्याला सुत झाले, परिसुनि सानंद तो सकाळीं रे;
सविनय पुसुनि मुनीला, बसुनि रथीं जाय युक्त दळभारें. १४

घ्नोत्तर मधूप नामें[5], लवणाचें पुर असे प्रसिद्ध खरें;
तेथें निज सेनेसह, येई शत्रुघ्न वीरमुख्य[6] बरें,
गेला होता रानीं, तोही मारोनि सत्वराशीतें[7],
आला इतक्यांत जणुं, घेउनियां कर निजा पुराशीं ते[8]. १५

धूमाचेपरि धूसर, गंध वसेचा जया कचज्वाला[9];
क्रव्याद्गणावृत[10] तो, राक्षस जंगम[11] चिताग्निसा गमला. १६

---

१ वालखिल्य म्हणून अंगुष्ठमात्रप्रमाण अशा साठहजार ऋषींचा समुदाय सूर्याच्या रथाबरोबर असून ते ऋषि त्याची स्तुति करीत असतात असें पुराणांत वर्णिलें आहे. २ रथाचा शब्द. ३ दमले आहेत घोडे ज्याचे अशा. ४ क्षिति म्ह० राज्य हें प्राप्त झालें म्हणजे कोश ( अर्थ ) आणि दंड (शासन) हे दोन्ही अर्थात् प्राप्त होतात म्हणून क्षिति यांस प्रसवते असें म्हणून तिचा दृष्टांत सीतेला दिला. ५ घ्नोत्तरमधूपनामें म्हणजे घ्न हें अक्षर ज्याच्या उत्तर म्हणजे पुढें आहे असा जो मधूप हा शब्द म्हणजे " मधूपघ्न " या नामेंकरून लवण राक्षसाचें पुर होतें. ' मधूपघ्न ' हें पद स्वरूपेंकरून म्हणजे जशाचें तसें आर्येत घालतां येईना म्हणून अशा संकेतानें घातलें. ६ वीरश्रेष्ठ. ७ प्राण्यांचे समुदायास. ८ ते ( सत्वराशी ). ९ कच म्ह० केश ( त्याच ज्वाळा ). १० राक्षसगणवेष्टित. ११ चालणारा चिताग्नीच जसा. कारण धूमवर्ण, वसागंध, केशात्मक ज्वाला, राक्षसांचा वेढा हे चिताग्नीचे धर्म त्यास होते.

शूलरहित गांठुनि त्या, लवणा शत्रुघ्न आडवा झाला;
छिद्रा पाहुनि हणिती, होते जयसिद्धि संमुखी त्यांला. १७
" पोटापुरतें प्राप्त न, भक्ष्य ह्मणुनि जणुं भयातुरें विधिनें;
पाठविलें एथ तुला, " ऐसें निर्भर्त्सिलें तया लवणें. १८
मग त्या वधावयास्तव, घेई उपडोनि उंच वृक्षास;
[1]अक्लेश मनुज घेतो, उपडुनि सहजें जसा लव्हाळ्यास. १९
लवणप्रेरित तरू तो, जातां शरभिन्न होउनी वेगें
पडला, तंव शत्रुघ्ना, केवळ पुष्पांतलेंचि रज लागे. २०
तरु मोडला निरखुनी, फेंकी वैऱ्यावरी तंई लवण;
[2]अंतकमुष्टिपृथक्[3]स्थित, जणुं ऐसा अति विशाल पाषाण. २१
शत्रुघ्नें वज्रास्त्रें, जंव तो पाषाण शीघ्र ताडियला;
तंव त्याचा वाळुहुनी, बहु बारिक तत्क्षणीं चुरा झाला. २२
तालाचा तरु एकचि, ज्याच्या वरि उंच दिसतसे भारी;
औत्पातिक वायुवशें, जो कां लोटत फिरे विशाल गिरी,
त्या गिरिच्या ऐसा तो, दक्षिण भुज वर करोनियां लवण,
धांवे शत्रुघ्नावरि, वेगें तें शीघ्र घ्यावया प्राण. २३
वैष्णवबाणवशें तो, भिन्नहृदय पडतसे धडाडोन;
[4]आश्रमवास्यांचा तो, घेउनि [5]दे कंप भूमिलागोन. २४
पक्ष्यांच्या झुंडि तंई, पडल्या त्या लवणमस्तकीं घोर;
शत्रुघ्नाच्या शीर्षीं, दिव्यकुसुमवृष्टि जाहली थोर. २५
लवणा वधुनि ह्मणे तो, इंद्रजितां[6] मारित्या महौजाचा[7];
सोदर्य लक्ष्मणाचा, झालों मी आज भूतलीं साचा. २६
झालें स्वकार्य ह्मणुनी, स्तविति मुनी, तंव सलज्ज होवोन,
खालीं करी परी [8]जें, पराक्रमें उन्नतचि असे वदन. २७
यमुना तीरीं निर्मी, एक पुरी तो नवीन रम्यतरा[9];

---

१ क्लेशावांचून. २ यमाची मुष्टीच. ३ यमापासून वेगळी झालेली जणूं यममुष्टीच काय असा पाषाण. ४ या षष्ठीचा संबंध कंपाशीं ( आश्रमस्थ जनाचा कंप घेऊन भूमीला दे म्हणजे भू कांपली). ५ देताझाला. ६ इंद्रजिताला मारणाऱ्या अशा लक्ष्मणाचा. ७ (महातेजस्व्याचा हें लक्ष्मणाचा याचें विशेषण). ८ वदन. ९ विशेष रमणीय.

निस्पृह पौरुषभूषित, सौमित्री नाम दे तिला मथुरा. २८
राजा उत्तम ह्मणुनी, जेथिल संपन्न असति फार जन;
त्या नगरींत वसविले, जाणों स्वर्गस्थ लोक आणवुन. २९
यमुनातीरीं सौधीं, बैसुनि शत्रुघ्न पाहि जों यमुना;
तंव तीचा कृष्ण जलप्रवाह देखोनि हर्ष होय मना,
चक्रावृता नदीला, जेव्हां तो फार रम्य अवलोकी;
स्वर्णालंकृतिमति ही, भूची वेणी असेंचि तो शंकी. ३०
दशरथ व जनक यांचा, सखा मुनी तो ह्मणोनि संस्कार;
प्रेमें करि सीतेच्या, तनयांचे सविधि तोषुनी फार. ३१
कुशयोगें लवयोगें, गर्भोपद्रव हरे तिचा ह्मणुनी;
कुशलव ऐसीं त्यांचीं, नांवें ठेवी क्रमेंकरूनि मुनी. ३२
कांहीं मोठे झाले, तंव शिकवुनि सांग वेद आद्य कवी;
निजकृत पहिलें काव्यचि, रामायण लवकुशांस तो शिकवी. ३३
मधुरा रामकथा ती, सुस्वर मातेपुढें मुलें गाती;
विरह व्यथा तयानें, सीतेच्या कांहिंशा कमी होती. ३४
त्रेत्यापरि तेजस्वी, भरतादिक ते तिघेजण भ्राते;
त्यांतोनी प्रत्येका, झाले सुत दोन दोन ते त्यांतें. ३५
होता सुबाहु ह्मणुनी, रिपुघातक एक सुत रिपुघ्नाचा;
तैसा दुजा बहुश्रुत, लौकिक ज्याचा असे बहुगुणाचा,
मथुरा एकास तशी, विदिशा नगरी दुजास देवोनी;
ज्येष्ठ प्रिय शत्रुघ्न, ज्येष्ठा भेटावयास इच्छि मनीं. ३६
कुशलवसुस्वरगीतें, निश्चल होताति जेथले हरिण;
ऐशा वाल्मीक्याश्रमि, जाउनि संतुष्ट होति पांथजन,
पुनरपि तेथें गेलों, तरि त्याच्या व्यय तपास होइल कीं;
यास्तव त्यांत न जातां, साकेता जाय तो अतिविवेकी. ३७
लवणप्राणांतक [१०] तो, येतो जाणोनि नगरचे लोक;

१ पराक्रमानें शोभणारा. २ चक्रवाकपक्ष्यांनीं वेष्टिलेल्या नदीला. ३ शत्रुघ्न. ४ शंका पावता झाला. ५ दर्भांच्या योगानें. ६ गोपुच्छलोमांच्या योगानें. ७ अग्नित्रयापरी. ८ शत्रुघ्नाचा. ९ लवणराक्षसाचा हंता. १० शत्रुघ्न.

सर्वहि मार्गीं जेथें, उभारिती तोरणें गुढ्या देख,
त्या साकेताख्य पुरीं, प्रवेश शत्रुघ्न करितसे जेव्हां;
अत्यंत गौरवानें पुरवासी जन विलोकि त्या तेव्हां ३८
सभ्यांचा समुदाय, प्रेमें सेवीतसे जया वहिला;
लोके व्यवहाराला, पाहाया जो स्वयें असे बसला,
सीता त्यागास्तव जो, भूमीचा मात्र पति असे राम;
अवलोकिला रिपुघ्नें, सादर तो प्रभु सभेंत अभिराम. ३९
ये कालनेमि मारुनि, उपेंद्र त्या इंद्र तेंवि लवणांस;
वधितां नमी पदीं तंव, अभिनंदी तोषुनी प्रभू त्यास. ४०
रामें पुसल्यावरुनी, विस्तारें करुनि वर्त्तमानास;
शत्रुघ्न कथी सर्वहि, अपुल्या तो प्रीतियुक्त भावांस;
'अवसर पाहुनि अर्पिन, मीच ययां,' यापरी मुनी वदला,
यास्तव सुतवृत्तांत, प्रभुला त्यानें न लेशही कथिला. ४१
एके दिवसीं कोणी, ब्राह्मण मृतबालकास घेवोन
मांडीवरि, रामाच्या दारीं शोकामुळें करी रुदन. ४२
"हे भूमिके, दशरथापासुनि आलीस रामचंद्रकरीं;
तों पहिल्याहुनि, शिव शिव! दुःखें आलीं विशेष तूजवरी." ४३
सुतशोकें रडतो हा, जाणुनि हें लाज झालि रामास;
राज्यीं इक्ष्वाकूंच्या, अकालमृत्यू न येचि कोणास. ४४
"क्षणभर धीर धरा जी," ऐसें आश्वासुनी द्विजेंद्रास;
अंतक जिंकायास्तव, स्मरे प्रभू त्या कुबेर यानास. ४५
शस्त्रें घेउनि संगें, निघे प्रभू बैसुनी तया यानीं;
तंव अग्रभागिं त्याच्या, एकाएकीं वदे नभोवाणी. ४६
राजा धर्मव्यतिकर, राज्यामध्यें तुझ्या असे झाला;
शोधुनि हरिशिल जरि त्या, होइल तव सत्य सिद्ध हेतु भला. ४७

---

१ ( लोकांचे वादविवाद मनास आणून त्यांचा न्याय करण्यास ). २ जो राम. ३ उपेंद्रा (इंद्र तेंवीं). ४ लवणराक्षसाचा वधिता. (शत्रुघ्न). ५ यमाला जिंकण्याकरितां. ६ पुष्पकविमानास. ७ आकाशवाणी. ८ हें संबोधन.

आप्तवचन ऐकुनि हें, शोधाया भूमि, चालवी यांना;
इतक्या अतिशयवेगें, कीं, त्याचा दीर्घ केतु हालेना. ४८

झाडाच्या फांदीला, टांगुनि खालीं करोनियां स्वमुख;
आरक्तनेत्र धूमें, करितो तप देखिला असा एक. ४९

"कोणाचा कोण" असें, पुसतां "शंबुक ह्मणोनि शूद्र असें;
स्वर्गार्थ तपा करितों," वदला रामास तो तपस्वि असें. ५०

नसतां अधिकार करी, तपा ह्मणुनियां जनापकारक हा;
वध्य असे जाणुनि हें, घेइ करीं भूमिपाळ शस्त्र महा. ५१

ज्याचे केसर सुकले, हिमें अशा पंकजापरी वदन;
दग्ध[1]श्मश्रु तयाचें, गळे[2]नालापासुनीच घे खुडुन. ५२

राजानें कृतदंडा, झाली सद्गति तया नरास तसी;
दुश्चर तप तें अ[3]विहित, ह्मणुनि तयानें तया न झालि तसी. ५३

तेजःपुंज अगस्त्याप्रति भेटे रामचंद्र मार्गें तसा;
निर्मळ[4]कांतिसुधांशुस, भेटतसे शारदीय समय जसा. ५४

पूर्वीं पीत[5]समुद्रें, आत्म्याचें मूल्यसाचि अर्पियला;
तो दिव्यालंकार, प्रभुला त्या कुंभ[6]संभवें दिधला. ५५

सीतालिंगनहीना, बाहुस घालूनि तो प्रभू परतें;
तंव विप्राचें मृतशिशु, त्याच्या पूर्वींच परतलें होतें. ५६

रक्षी यमाहिपासुनि, यास्तव तत्स्तुति करोनियां क्षिप्र
पूर्वकृता निंदेतें, निरं[7]सि सुत[8]प्राप्तितुष्ट तो विप्र. ५७

हयमेधा करि तो तंव, सुगळ[9] बिभीषण तसे नृपाळ दुजे;
शेतां[10]वरि जल घनसे, उपायनें वर्षले प्रभूवरि जे. ५८

नचि केवळ भूमिस्था, परि नाक्षत्राहि सोडुनी स्थाना;
चोहीं कडोनि आले, रामनिमंत्रित महामुनी नाना. ५९

---

१ ज्याच्या दाढीमिशा जळाल्या असें (वदन). २ कंठरूप नालापासून. ३ (शूद्रास विहित नव्हे असें जें तप तयानें तसी सद्गती न झाली ) ४ निर्मळ चंद्रास. ५ प्यालेल्या समुद्रानें. ६ अगस्तिऋषीनें. ७ दूर करी. ८ पुत्रप्राप्तीनें संतुष्ट झालेला. ९ सुगल म्ह० सुग्रीव. १० शेतावर जसे घन जल वर्षतात तसे राजे प्रभूवर उपायानें वर्षले.

चाऱ्ही द्वारीं जमले, महर्षि तींहीं पुरी दिसे कैसी;
तत्काळ सृष्टलोका[1], चतुर्मुखाची[2] तनूच कीं जैसी. ६०
जीची यज्ञगृहीं पति, [3]हैमी मूर्ती करोनि करि यज्ञ;
यास्तव त्या सीतेचा, स्तुत्य असे त्यागही वदति सुज्ञ. ६१
उक्ताधिक संभार, क्रतु असा चालु जाहला जेव्हां;
जे मखघातक राक्षस, तेही मखरक्षणा करिति तेव्हां. ६२
वाल्मीकिरचित रामायण नामक ते इतस्ततां काव्य;
गाती गुर्वाज्ञेनें, वैदेहीचे तनूज ते दिव्य. ६३
रामकथा हा विषय[4], प्राचेतस कवि तसेच गाणारे;
किन्नरसमस्वर[5] कुशलव, तें श्रोत्याचें कसें न मन हारे? ६४
रूपीं गानींहि मधुर, असति असे तज्ज्ञ सांगती प्रभुला;
सानुज कुतुकी विभु तंव, पाहुनि त्यां गीत ऐकता झाला. ६५
गीतें निश्चल शोभे, सभा जिच्या अश्रु चालले नयनीं;
शोभति तरु दंव पडुनी, प्रातःकाळीं जसे निर्वात[6] वनीं. ६६
केवळ वयें व वेषें, भिन्न परंतू समान इतरांशीं[7];
रामाशीं[8], त्या जाणुनि, जनें लावुनि टक पाहती[9] त्यांशीं[10]. ६७
त्यांची गानिपुणता, पाहुनि विस्मय जना न होय तसा;
देखुनि तन्निस्पृहता, रामाच्या प्रीतिदानिं[11] होय जसा. ६८
गुरु कोण असे तुमचा, कोणाचें काव्य हेंहि सांगा कीं;
ऐसें पुसतां रामें, सांगति ते गुरु[12] कवीहि वाल्मीकी. ६९

---

१ त्याचवेळीं जीनें लोक उत्पन्न केले असी. २ ब्रह्मदेवाची. ३ सुवर्णाची. ४ ज्या गाण्यांत रामाची कथा हा विषय, काव्यकर्ता वाल्मिकि मुनी व गाणारे कुशलव, मग तें गाणें ऐकून श्रोत्याचे मनाचें हरण कसें होणार नाहीं ? ५ किन्नराप्रमाणें आहे स्वर ज्यांचा असे (कुशलव). ६ वायुरहित. ७ इतर भागांत. ८ रामाशीं समान असा अन्वय. ९ (हें कर्तृपद टक लावूनि पहाती असा अन्वय). १० कुशलवांस. ११ रामचंद्र गायनानें संतुष्ट होऊन जें प्रीतिदान म्ह० बक्षीस देऊं लागला त्याविषयीं जी त्या कुशलवांची निस्पृहता ती पाहून जनाला जो विस्मय झाला तितका त्यांची गायननिपुणता पाहूनही झाला नाहीं ह्मणजे त्यांचा निस्पृहपणा म्ह० निर्लोभीपणा विलक्षण होता. १२ आमचा गुरू व या काव्याचा कवीही वाल्मीकीच होय असें सांगती.

मग सानुज[1] राम, प्रभु, वाल्मीकिमुनीकडेस जाउनियां;
" मी राम " असें वदुनी, स्वराज्य संपूर्ण तो समर्पि तया. ७०
" सीतातनूज[2] हे, तैव[3] पुत्र " असें राघवास कळवोनी;
" सीतास्वीकार तुवां कीजे " प्रार्थी असें दयालु मुनी. ७१
" अमुचे समक्ष बापा, अग्निविशुद्धा[4] विदेहजा हि जरी;
रावण दुष्ट म्हणुनि ही, गोष्ट न हे लोक मानिताति खरी. ७२
स्वाचार[5] शुद्ध ऐसा, प्रत्यय दावील ही जना जेव्हां;
आज्ञेनें तव हीतें, स्वीकारिन मी ऋषीश्वरा तेव्हां." ७३
रामें असी प्रतिज्ञा, केल्यावर जानकी स्वशिष्यकरें;
नियमें[7] स्वसिद्धिपरि, ती आश्रमिहुनि आणिली तपस्विवरें. ७४
एकेदिवसीं मग नृप, मेळउनी नगरवासिलोकांस,
प्रस्तुत कार्यासाठीं, बोलावी आदरें मुनिवरास. ७५
स्वर[8] संस्कारयुता ऋक्, तद्योगें भास्वरा रवीस जसें;
पुत्र द्वययुत सीता द्वारें रामा भजे मुनीश तसें. ७६
काषाय वस्त्र नेसलि, नम्रत्वें खालि घातली मान;
शांतवपू देखुनि, तें झालें शुद्धा म्हणूनि अनुमान. ७७
ऐसी सीता देखुनि, काढुनि दृष्टी तिच्या वरुनि देख;
सफला शालीचेपरि,[9] झाले अवघे अधोवदन लोक. ७८
आसनिं बसोनि मुनि तो, बोले, " वत्से, समक्ष या पतिच्या,
संशय दूर करी गे, त्वद्विषयीं जो मनांत लोकांच्या." ७९

---

१ बंधुसहित. २ सीतेचे पुत्र. ३ तुझे. ४ अग्निप्रवेश करून बाहेर आल्यानें तिला अग्निविशुद्धा असें म्हटलें. रावणवध झाल्यावर, सीता ही लंकेंत एकटी होती. तिजविषयीं लोक संशय घेतील म्हणून ' व्यभिचार घडला असल्यास अग्नींत जळून जाईल नाहींतर यथास्थित बाहेर येईल ' असें म्हणून सीतेकरवीं अग्निप्रवेश करविला, तेव्हां ती भस्म न होतां जशीची तशी बाहेर निघाली. असें दिव्य करून ती शुद्ध आहे असें जाणून रामानें तिचें ग्रहण करून तिला घेऊन परत अयोध्येप्रत आगमन केलें. या गोष्टीकडे एथें लक्ष्य आहे. ५ सीता. ६ आपुला आचार. ७ नियमाच्या योगें स्वसिद्धि आणावी तसी. ८ स्वर आणि संस्कार एतद्द्वययुक्त जी ऋचा तिच्या योगें जसें सूर्याचें सेवन करावें तसें पुत्रद्वययुक्त सीतायोगें मुनी रामास सेविता झाला. ९ शालींस फलोद्गत्ती झाली म्हणजे त्या अधोवदन होतात तसे लोक अधोवदन झाले.

मुनिशिष्यें आणियल्या, पुण्यें उदकें करोनि आचमना;
सीता देवी वदती, झाली सत्या अशा तईं वचना. ८०
" काया वाचा चित्तें, पतिशीं व्यभिचार मी नसे केला;
तरि हे भूदेवी तूं, अपुल्या उदरांत घेई गे मजला. " ८१
ऐसें बोले साध्वी, तों भूमीला पडोनि रंध्र पहा;
विद्युत्तुल्य तयांतुनि, तेजोमंडळ निघे सवेग महा. ८२
तेव्हां नागफणाधृत सिंहासनगा सुदिव्यमूर्तिमती,
सागररशना देवी, प्रकटे, तंव लोकलोचनें दिपती. ८३
पाहे स्वपतीस अशा, सीतेला बैसवोनि ती अंकीं;
राम निषेधि तथापि, नेई तिजला क्षणांत [3]अहिलोकीं. ८४
सीतेच्छु तो धरेवरि, कोपुनियां शीघ्र घे धनुष्याला;
अनिवार दैवगति हें, सांगुनियां शांतवी गुरू त्याला. ८५
यज्ञान्तीं मुनिवर्गा, सुहृदाही बोळवी करुनि पूजा;
प्रेमा सीतेवरि जो, तो तत्पुत्रींच ठेवि तैं राजा. ८६
[4]जनपालनरत रामें, युधाजिताचा निरोप परिसोन;
सिंधुविषय भरताला, दिधला तो योग्य फार जाणोन. ८७
तेथें गंधर्वांप्रति, जिंकुनियां भरत वीर तो समरीं;
[6]शस्त्रा टाकवि हातिच्या, केवल वीणाचि घेववी स्वकरीं. ८८
जे तक्ष पुष्कलाभिध, सुत त्यां तन्नामकांचि नगरींच्या;
राज्यीं स्थापुनि योग्यां, येई तो सन्निधानिं रामाच्या. ८९
अंगद व चंद्रकेतु हि, लक्ष्मण यां निजसुतांस रामाच्या
आज्ञेनें आरोपी, राज्यीं कारापथाख्य देशाच्या. ९०
स्वर्गीं गेल्या जननी, त्यांचें श्राद्धादि कर्म सारें ते
श्रीरामादिक अवघे, यथाविधी जाहले क्रमें करिते. ९१

---

१ सर्पांच्या फणावर सिंहासन होतें त्यावर बसून. २ भूमीदेवी ( प्रकटे ). ३ पाताळीं. ४ जनरक्षणासक्त अशा ( रामें ). ५ ( भरताचा मामा युधाजित याचा ). ६ त्यांचीं शस्त्रें हिसकून घेऊन त्यांस केवळ गावयास लाविलें असें तात्पर्य. ७ तक्ष आणि पुष्कल ज्यांस तक्षशिला व पुष्करावती असेंही म्हणतात या दोन पुरी ( शहरें ), सिंधुनदीच्या समीपभागीं होत्या असें म्हणतात.

मुनिवेषें मग अंतक[1], येउनि बोले स्वयेंचि रामास;
एकांतीं अपुल्या जो, येइल नर तूं परित्यजीं त्यास. ९२
रामें रुकार दिधला, मग स्वरूपें वदे तया काल;
ब्रह्मयाची आज्ञा कीं, बा आतां स्वःपदास[2] तूं चाल. ९३
श्रीरामदर्शनास्तव, दैवानें तेथ येइ दुर्वास;
द्वारस्थितलक्ष्मण त्या, पाहोनी निज मनांत घे त्रास[3],
शापभयें एकांतीं, जाउनि तो त्यास कळविता झाला;
सौमित्रिनें अशापरि, जाणुनि संकेतभंग तें केला. ९४
शरयूतीरीं जाउनि, योगबलें टाकुनी स्वदेहातें;
लक्ष्मण निजबंधूच्या, नेई तो शेवटा प्रतिज्ञेतें. ९५
चवथा अंशाचि[4] अपुला, लक्ष्मण गेला जइं स्वधामास;
शिथिल त्रिपाद धर्मा, ऐसा तो भूवरी करी वास. ९६
वैरिव्रातकरींद्रा[5], हटवाया बहुत तीव्र अंकुशसा;
हर्षें कुशावतीच्या[6], ठायीं स्थापूनि थोर वीर कुशा[7],
साधूंच्या नयनाला, यद्युक्ति ऐकोनि येति अश्रुलव;
तैसा शरावतीच्या, ठायीं स्थापूनि तो हि पुत्र लव. ९७
मग तो सानुज साग्निक, राम निघे उत्तरेकडे जाया;
गृहवर्ज्य[8] पुरी प्रेमें, पतिच्या संगें निघे जशी जाया[9]. ९८
भिजला कदंबकलिका[10],स्थूलीं त्यांचा[11] जनाश्रुंनीं मार्ग;
हृद्गतवेत्ते त्यांतें[12], धरिती राक्षस तसेचि कपिवर्ग[13]. ९९
आलें विमान तंव तो, भक्तदयालू नृपाळ एक घडी;
सहचरजना[14] चढाया, स्वर्गीं करि सरयुलाचि दिव्य शिडी. १००

१ काळ. २ स्वर्गास. ३ भय ( घेता झाला. ) ४ धर्माला चार पाद असतात असें वर्णन आहे ते पाद तप, शौच, दया आणि सत्य, हे होत. प्रत्येक युगांत धर्माचा एक एक पाद उणा होत जातो. चौघांबंधूंपैकीं लक्ष्मण गेल्यानें ही धर्माची उपमा योजिली आहे, कारण एका विष्णूचे हे चार अंशरूपच होते. ५ शत्रुसमूह हाच हत्ती त्यास. ६ कुशावती आणि शरावती या नांवाचीं दोन शहरें. ७ कुशनामका. ८ घरें खेरीजकरून. ९ भार्या. १० कळंबाच्या कळ्यांप्रमाणें स्थूल (असे जे जनाश्रु तींहीं). ११ रामाचा ( मार्ग). १२ त्या मार्गातें. १३ वानरसमुदाय. १४ बरोबर येणाऱ्या लोकांस.

स्नान करुनि यानिं बसा, ऐसें वदतां जनास रघुराणा;
तेथें गोप्रतरापरि, दाटी स्नानार्थ जाहली जाणा,
झालें तीर्थ तिथें तंव, सरयूमध्यें पवित्र नव एक;
गोप्रतर याचि नांवें, आहे विख्यात भूवरी देख. १०१
अंशांनीं अवतरले होते, कार्यार्थ देव नरलोकीं,
ते स्वस्वमूर्तिमध्यें, प्रविष्ट झाले फिरोनि सुरलोकीं,
जे कां नवीन आतां, देवत्वा पावले नगरवासी;
कल्पुनियां स्वर्गांतर, दिधलें श्रीराघवें नवें त्यांशीं. १०२

श्लोक.

[शा.वि.] तेव्हां उत्तरशैलिं वायुतनया लंकापतीला तसें,
स्थापी दक्षिणशैलिं दोन अपुल्या सत्कीर्तिचे स्तंभसे;
ऐसें रावणमारणात्मक विभू कार्यी सुरांच्या स्वतां,
साधोनी सकलाश्रया निजतनूमाजी प्रवेशे अतां. १०३

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें ज्या रघुवंशनाम रुचिरा काव्यास यत्नें महा
केलें प्राकृत, सर्ग त्यांतिल अतां हा पंधरावा पहा ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा स्वर्गारोहणनामक पंधरावा सर्ग समाप्त झाला असे.

---

१ गाईचा कळप एकदम जमून एकाशीं एक लागून नदींतून तरत जातो तेव्हां जशी त्यांची दाटी होते तशी यासमयीं लोकांची अतिशयित दाटी सरयूंत झाली म्हणून असा दृष्टांत दिला. आणि त्याच नांवाचें तेथें तीर्थ झालें. २ स्वर्गास. ३ जे देव भूमीवर अवतरले होते ते आपल्या आपल्या स्वर्गस्थ मूर्तींत प्रविष्ट झाले परंतु जे मुळचे देव नसून मनुष्यच होते त्यांजकरितां रामानें दुसरा स्वर्ग नेमून त्यांस राहायास दिला. ४ हिमालयपर्वतावर. ५ हनुमंतास. ६ बिभीषणाला. ७ त्रिकूटपर्वतावर.

# सर्ग सोळावा.

श्लोक.

[शा.वि.] स्वर्गीं नागरमंडळीसह[1] सुखें श्रीराम गेल्यावरी,
जन्मानें व गुणें करोनि हि कुशा ज्येष्ठत्व तेव्हां वरी;
केलें त्यासचि बंधुनीं सकलिकीं मुख्यांशभाक्[2] निश्चित,
सुभ्रातृत्व[3] कुलानुरूपचि असे, त्यांचें जनीं विश्रुत. १
संपद्वर्धक[4] ज्या विशेप असती कृष्यादि नाना रिती,
त्यायोगें धन मेळवोनि जरि हो संपन्न झाली स्थिती;
देशाच्या तरि आपुल्या न तजिती सीमेस सारे तसे,
मर्यादेस न सोडिती भरतिच्या वेळीं हि अब्धी[5] जसे. २

[व.ति.] दानप्रवृत्तियुत[6] आठ[7] असे जयांचे[8]
विख्यात मूळ पुरुप स्फुट होति साचे;
ऐसा सुवंश अति थोर कुशादिकांचा,
दिग्दंतिच्यापरि[9] सुविस्तृत होय त्यांचा[10];
वंशास यां[11] प्रथम[12] कारण विष्णु तैसा,
तो सामवेद जगिं दंतिकुलास[13] जैसा. ३

---

१ नगरच्या लोकांसहवर्तमान. २ मुख्यभागाचा धनी. ३ चांगला बंधुपणा. ४ संपत्तीला वाढविणारे. ५ समुद्र. ६ दिग्दंती पक्षीं मदजलप्रवाहयुक्त, कुशादिक पक्षीं दानकरण्याविषयीं जी प्रवृत्ति तद्युक्त. ७ ब्रह्मदेव सामगायन करीत असतांना त्याजपासून हे दिग्दन्ति म्हणजे दिग्गज निघाले ते आठ आहेत. त्यांचीं नांवें. १ ऐरावत. २ पुंडरीक, ३ वामन, ४ कुमुद, ५ अंजन, ६ पुष्पदंत, ७ सार्वभौम, आणि ८ सुप्रतीक. राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न या चौघांसही प्रत्येकाला दोन दोन याप्रमाणें एकंदर आठ पुत्र होते. याप्रमाणेंच दिग्गजही आठच म्हणून दोन्हीं वंशांचें साम्य वर्णिलें. दानप्रवृत्तियुत हें विशेपण उभयवंशाकडेही लागू पडतें. म्हणजे दान म्हणजे दान करणें याची प्रवृत्ति म्हणजे व्यापार तद्युक्त रामादिकांचा वंश होता. व दान म्ह० गजमद त्याची प्रवृत्ति म्ह० प्रवाह तद्युक्त असा दिग्गजांचा वंश होता. ८ ज्या वंशाचे. ९ जसा आठ दिग्गजांचा वंश विस्तीर्ण होऊन वाढला तसा कुशादिक जे आठ बंधू त्यांचा वंशही विस्तारानें वाढता झाला असा भाव. १० त्या कुशादिकांचा. ११ या कुशादिकांच्या वंशास. १२ मूळ ( कारण ). १३ गजांच्या कुलास ( मूळ कारण सामवेद म्हणजे सामवेद अध्ययनसमयीं हे उत्पन्न झाले होते अशी कथा आहे.

[शा.वि.] एके वासरिं अर्धरात्रसमयीं वाज्यांत दीपावळी,
झाली निश्चल, आणि सर्व निजली होती जईं मंडळी;
जागा होउनि एकला कुशचि तैं देखे नवी कामिनी,
जी कां प्रोषितभर्तृकेपरि[1] धरी वेषास खिन्ना मनीं. ४

राज्यश्री उपभोगिती सुविपुला ज्याच्या सवें सज्जन,
तेजस्वी मघवाचि[2] जो जिणियले ज्यानें रिपूंचे गण;
त्याच्या येउनि ती पुढें "जय असो राजा" असें बोलुनी,
राहे तेथ उभी सुदीनवदना[3] बद्धांजली होउनी. ५

जैसी निर्मळ दर्पणांत शिरते छाया त्वरेनें तसी,
दारें बंद असोनिही गतिभरें गेहांत आली कसी;
आश्चर्यें नरपाळ तो उठुनियां बैसोनि शय्येवर,
तेव्हां त्या वनितेप्रती वदतसे ऐसें धराधीश्वर. ६

"दारें बंद असोनि राजसदनीं आलीस कैसी बरें,
योगाचें बळ हें ह्मणूं तरि तुझ्या आंगीं दिसेना खरें;
शीत्योपद्रव होउनी कमलिनी म्लाना दिसे जी वनीं,
तैसी तूं दिसतेस आर्त, ह्मणुनी होसीन गे योगिनी[4]. ७

"कोणाची दयिता वदें कवण तूं आहेस गे कामिनी,
येण्याचें इकडे कशास्तव तुवां संधारिलेंसे मनीं;
आह्मी राघव तों जितेंद्रिय असूं, अस्मन्मनाची गती,
अन्यस्त्रीविषयीं पराङ्मुख सदा हें जाणिजे निश्चितीं." ८

तेव्हां ती युवती कुशास वदली कीं "जी पुरी संप्रती,
रामानें अपुल्यासवें सकळही नेली स्वलोकाप्रती[5];
त्या आहें अधिदेवता नगरिची मी भूपते जाण गा,
सध्या नाथ नसे मला ह्मणुनि मी झालें असी दुर्भगा. ९

पूर्वीं या नगरीमधें नरपती झाले बहू चांगले,
राजन्वत्पदवी[6] जिणें मिळविली बा[7] याच हेतुमुळें;

---

१ जीचा पती प्रवासास गेला असतो तीचेपरी. २ इंद्र. ३ आतूर. ४ योगसाधन केलेली (योगीण). ५ विष्णुलोकाप्रत. ६ ज्या देशाचा राजा उत्तम असतो त्याला राजन्वान् असें म्हणतात (ती राजन्वत्पदवी या नगरीनें पूर्वी मिळविली असा भाव). ७ हें संबोधन.

ऐश्वर्यें अलकेस मोजित नसे जी मी तिची हे कुशा,
तूं सूर्यान्वयिं पूर्ण शक्ति असतां झाली असी दुर्दशा. १०

[शा.] सौधें, वाडे, मंदिरें, चंद्रशाला, प्राकारें ही नाश यांचा जहाला,
स्वर्गालागीं जेधवां नाथ गेला, तेव्हां बापा पावलें या दशेला;
जेव्हां भानू अस्तमानास जातो, झंझावायू उग्र जेव्हां वहातो,
उद्वस्ता तैं होतसे मेघराजी, नाथामागें जाहलें मी तसी जी. ११

[शा.वि.] पादीं नूपुर वाजती खणखणा ज्यांचे बहू भास्वर,
त्या [1]जेथें अभिसारिका[2] स्मरमदें बा चालती सत्वर;
उल्का[3] तोंडि धरोनि रात्रिसमयीं त्या राजमार्गीं स्वतां,
भालू[4] शब्द करीत शोधिति नृपा बा आमिषा[5] तत्वतां. १२
नारी स्वीयकरीं करीत असतां वापीजलीं[6] ताडन,
क्रीडेच्या समयीं उठे निनद[7] तो भासे मृदंग-स्वन;
तेथें वन्यलुलाय[8] संप्रति निजें शृंगें बळें ताडिती,
ते आक्रोश कराळ थोर विहिरीमाजी सदा चालती. १३
गेले मोडुनि खांब यास्तव शिखी[9] वृक्षीं वसूं लागले,
वाद्यें बंद ह्मणोनि आवडिचिया नृत्या तिहीं सोडिलें;
त्यांचीं चित्रविचित्र सुंदर पिसें गेलीं जळूनी बरीं,
क्रीडेचेहि मयूर वन्य बनले भूमीपते यापरी ! १४
लाखेचा रस लावुनी स्वचरणा पूर्वील पौरस्त्रिया,
सोपानावरतीं मनोज्ञ[10] गमना ठेवीत होत्या तया;
आतां व्याघ्र तिथें वनीं मृगगणा मारोनियां भेसुर[11],
रक्तानें भरल्या अशा निजपदा ते स्थापिती सत्वर. १५
हत्ती आणिक हत्तिणी निजसुखें क्रीडा करीती जलीं,
देती खंडितकेसरें करिवरा तैं हत्तिणी चांगलीं;
चित्रें यापरि थोर मत्तकरिंचीं आहेत भिंतीवरी,
त्यांच्या मस्तकिं रोंविती निजनखें क्रोधें खरे केसरी. १६

---

१ ज्या राजमार्गांत. २ स्वतः नटून नायकाकडे जाणाऱ्या नायिका. ३ ज्वलत्-काष्ठें. ४ कोल्हा. ५ मांसाला ( भालू शोधिती, ) ६ विहिरींतील पाण्यांत. ७ नाद. ८ रानांतील टोणगे. ९ मोर. १० ( हें पौरस्त्रियांचें विशेष ). ११ भयंकर.

खांबाच्यावरि चित्रवर्ण पुतळ्या नानापरी शोभल्या,
त्यांचे रंग उडोनि धूसर अशा आतां दिसों लागल्या;
कांती[1] सुंदर ज्या भुजंग अपुल्या त्यांचे वरी टाकिती,
कांचोळ्यापरी त्याचि तत्स्तनयुगा आच्छादिती संप्रती. १७
काळाच्या गतिनें नृपाळ भवनीं गच्यावरींचे चुने,
काळे होउनियां तिथें उगवलीं नानापरीचीं तृणें;
मोत्यांचे सर जेंवि तेंवि धवळा ज्योत्स्ना जरी त्यांवरी,
रात्रीची पडते, तथापि नदिसे पूर्वीपरी साजरी. १८
फांद्यांना लववोनि कोमलकरें पूर्वी विलासी स्त्रिया,
होत्या नेत नवीं खुडोनि कुसुमें त्या प्रत्यहीं स्वालया[2];
आतां भिल्ल किरात वानर हि ते वेलींस मोडूनियां
जाती दुष्ट निघूनि यास्तव नृपा उद्यान गेलें लया. १९
रात्रीं ज्यांमधुनी दिवे न दिसती आंधार भारी जिथें,
नारींचीं वदनें न दृष्टि पडती पूर्वीप्रमाणें [3]जिथें;
जाळीं लागलिं थोर जेथ कृमिचीं, सौगंध्यशाली अतां,
चाले धूर न ज्यांमधून[4] खिडक्या झाल्या अशा तत्वतां. २०
[भु.प्र.] नदीच्या तटीं वाढला वेतसांचा, जेथा, गंधही येइना ऊटण्याचा;
दिसे वाळुवंटीं न पूजाप्रकार, रितें तीर-देखोनि मीं खिन्न फार. २१
[पृ.] कुशावति ह्मणोनि जी तव पुरी, तिला संप्रती,
त्यजोनि गमना करी स्वकुलराजधानीप्रती;
तुझा जनक टाकुनी मनुजमूर्तिला सत्वरी,
स्वकीय तनु वैष्णवी नृपवरा जसी तो धरी." २२
[इं.व.] ऐशा तिच्या ऐकुनि याचनेला, संतोषुनी भूप बरें ह्मणाला;
प्रसन्न होवोनि तईं स्वचित्तीं, अदृश्य झाली पुरदेवता ती. २३
[शा.वि.] प्रातःकाळि सभेंत वृत्त निशिचें सारें द्विजा अद्भुत,
सांगे भूपति, त्यास ऐकूनि मनीं ते जाहले विस्मित;

---

१ साप कांती टाकितात त्या. २ आपल्या घरीं. ३ ज्या खिडक्यांत. ४ ज्या खिडक्यांमधून. ५ समुदाय. ६ रामचंद्र. ७ प्रार्थनेला.

व्हावा तूंचि पती ह्मणोनि नगरी तूतें स्वयें बोलिली,
होसी धन्य नृपा !'' असें वदलि ती भूपाप्रती मंडळी. २४
तेव्हां शीघ्र [1]कुशावतीस विधिनें सद्ब्राह्मणा देउनी,
यात्रायोग्य[2]दिनीं सवें सकल ही अंतःपुरा घेउनी;
मेघौघासह वायुसा कुश निघे जाया अयोध्येप्रती,
ज्याच्या स्वारिसवें गजाश्वसहितें सैन्यें बहू चालती. २५
के तुझे घनदाट तीं उपवनें, जे मोठमोठे गज
क्रीडापर्वत ते रथव्रज तसे होती घरें सध्वज;
ऐसी त्या प्रभुची प्रयाणसमयीं सेनास्थिती जाहली,
वाटे सर्वजनास जंगम[3] असी ती राजधानी भली. २६
ज्यों[4]चें मंडळ फार शुभ्र असला इंदू जसा अंबरीं,
येवोनी उदयास [5]ने उदधिला [6]वेलेकडे सत्वरी;
तैसा तो धवलातपत्र कुश ने सेने अयोध्येप्रती,
[7]जी होती बहुकाळ पूर्वपितरीं अध्यासिली निश्चितीं. २७
सेना भूपतिच्या जईं दणदणा भूमीवरी चालती,
सोसेना तिस भार तो ह्मणुनियां धूलीमिषें ती क्षिती;
जाते विष्णुपदास शीघ्र दुसऱ्या जाणों असा वाटला,
तेव्हां तर्क जना, अचाट धुरळा जेव्हां नभीं दाटला. २८
[उ.व.] कुशावतीपासुनि निघतांना, पुढें मुकामावरि शीरतांना,
तशीच मार्गीतहि चालतांना, दिसे समाना नरपाळसेना;
[शा.] आदिस्थानीं सैनिकांचा अचाट, मध्यें अंतीं सर्वथा तोच थाट,
कोठें कांहीं न्यूनता ती दिसेना, ऐसी होती थोर भूपाळसेना. २९
* मोठ्या सेकें[8] हस्तिदानोदकांच्या, होती तेव्हां पंकिला भूमि साच्या;
पादाघातें घोडियांच्या पथांत, पंकाची तें धूळ होई क्षणांत. ३०

१ कुशावती नगरी ब्राह्मणास दान देऊन असा अर्थ. २ गमनास उक्त अशा दिवशीं. ३ चालणारी ( असी राजधानीच ). ४ ज्या इंदूचें. ५ नेतो. ६ मर्यादवेलेकडे. ७ जी अयोध्या.

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक )—

[रथो.] हस्तिचा मद गळे धुळींत हा, तें पथीं चिखल होतसे महा;
वाजिचें रज उडे पदें जईं, पंक सोखुनि धुळी बने तईं. ३०

८ हत्तींच्या मस्तकांतून वाहणाऱ्या उदकानें मार्गांतील धूळ भिजून चिखल होई.

[शा.वि.] विंध्याच्या अटवीमधें निजपथा शोधावया लागली,
तेव्हां भूपतिची अपार पृतना चोहींकडे फांकली;
जागोजाग विनाद वीर करिती ते नर्मदेच्यापरी,
तें त्यांचे प्रतिनाद ते पसरले दर्यांननाभ्यंतरीं. ३१

धातूंच्या खनितूनि जात असतां चाकें रथाचीं नव
झालीं फारचि लाल, आणि निघतेवेळीं गजांचे रव
होती मिश्र मृदंगवाद्यनिनदीं, ज्याच्या असा तो प्रभू,
भिल्लानीत उपायना बघत तें विंध्या वलांडी विभू. ३२

विंध्याच्या तटिनींतुनी उतरतां सेतूं गजांचा करी,
गंगा पश्चिमवाहिनी उतरला तेव्हां तयाच्या वरी;
पंखांतें हलवीत हंस उडती व्योमांत तेव्हां त्वरें,
यत्नावांचुनी जाहलीं नृपशिरीं तीं आयतीं चामरें. ३३

क्रोधानें कपिलें स्वपूर्वजगणां निःशेष ज्यां जाळिलें,
त्यांना स्वर्ग मिळो ह्मणूनिच बहू यत्नें जया आणिलें;
तें गंगोदक भक्तिपूर्वक नराधीशें कुशें वंदिलें,
ज्यांच्या अंतरिं चालती बहु तरी त्यांच्यामुळें जें हले. ३४

कित्येकीं दिवसीं क्रमूनि अवघा मार्ग क्षितीचा पती,
पाहे श्रीसरयूतटीं सुरुचिरीं यूपव्रजाची स्थिती;
जो पूर्वी बहु अध्वरांस करुनी रामादिकांनीं भला,
वेदिस्थान पवित्र जाणुनि मनीं तेथेंच संस्थापिला. ३५

[शा.] तेव्हां वृक्षां पुष्पितां हालवोनी, नद्युत्पन्नां ऊर्मिजाला शिवोनी;
उद्यानाचा वायु आला समोर, केलें तेणें भूपसैन्यास गार. ३६

[शा.वि.] रोंवी शत्रुतनूमधें निजबळें जो आपले मार्गण,
पौरांना प्रिय जो, जयांत वसती शौर्यादि नानागुण;

---

आणि घोड्यांच्या खुराघातानें उडालेला धुरळा त्या चिखलांत मिसळला म्हणजे त्या चिखलाचा शोष होऊन पुन्हा धूळ होई. म्हणजे त्याचे सैन्यांत मदमत्त हत्ती फार होते आणि जोरानें धावणारे घोडेही फार होते असा भाव होय.

१ दरीच्या मुखांत. २ भिल्लांनीं आणिलेल्या भेटी. ३ नद्यांतून. ४ पूल. ५ ज्या गंगोदकांत. ६ नौका. ७ यज्ञस्तंभगणाची. ८ यज्ञस्तंभसमुदाय. ९ हें वृक्षांचे विशेषण. १० नदींत उत्पन्न झालेल्या ( लाटांस ). ११ बाण.

ऐसा तो कुश भूमिपाळ अपुलें घेवोनि सारें दळ[1],
साकेताभिध राजधानिजवळी येवोनि देई तळ. ३७

[स्र.] जें कां साहित्य लागे सुखकर सदनें बांधण्यालागिं फार,
होतें तें सिद्ध लोहादिक सकळहि तैं ज्या नसे अंतपार;
ते घेवोनी नृपाज्ञे वरुनि रचियलीं शिल्पिवर्गें[2] त्वरेनें,
सौधें, प्रासाद, हर्म्यें अशनजलगृहें[3] मंदुरा[4], हस्तिखानें;

[उ.जा.] ऐसी पुरी फाराचि मोडलेली, नृपें नवी बांधुनि रम्य केली;
ग्रीष्मोष्मतप्तां[5] धरणी, सवेग, जलें करीतो जशि पुष्ट मेघ. ३८

[शा वि.] जे का वास्तुविधिज्ञ[6] विप्र असतीं ज्यांनीं उपास स्वयें,
केले त्यां करवीं करी नरपती तो शांति शास्त्रान्वयें;
सद्गंधाक्षत धूप दीप बरवे नाना पशूंचे बळी,
अर्पोनी नगरींतलीं सकळही तैं दैवतें पूजिलीं. ३९

कामी[7] स्त्रीहृदयीं प्रवेश करितो तैसा महामंदिरीं[8],
आधीं तो नृपती प्रवेश करुनी तेथूनि थोडीं[9] दुरी;
ज्याला जें उचित प्रशस्त हि तसें ऐसीं गृहें पाहुनी,
तैं मंत्र्यादिक मंडळीस कुश तो देई स्वयें नेमुनी. ४०

बाजारांत अनेक वस्तु विकण्यासाठीं सुध्या मांडिल्या,
खांबांला गजसंहती[10] अनुचरीं तैं ओळिनें बांधिल्या;
वाजी स्थानिं विराजती व हिंसती[11] त्या वाजिशाळेंतले,
सालंकार[12] कलत्रसें[13] नगर तैं शोभूं बहू लागलें. ४१

रामाच्यासमयीं जसी विलसली तैसी पुन्हा ही पुरी,
शोभे, जेथ कुशाख्य भूमिपति तो न्यायेंचि राज्या करी;
ऐश्वर्यें, धनसंग्रहें हि नृप तो संपन्न झाला तसा,

---

१ सैन्य. २ सुतार गंवडी वगैरेंच्या समुदायानें. ३ भोजनशाळा पानशाला. ४ अश्वशाळा. ५ रूक्ष झालेल्या जमीनीला म्ह० ग्रीष्मांतील उष्णानें उष्ण झालेल्या पृथ्वीस मेघ जसा जलानें पुष्ट म्ह० टवटवीत करितो तशी कुशानें नगरी बांधून रम्य केली असा अर्थ. ६ वास्तुविषयक विधी जाणणारे. ७ कामुक पुरुष. ८ राजमंदिरीं. ९ याचा अन्वय गृहें याशीं (थोडीं दूर गृहें). १० हत्तीचे समुदाय. ११ शब्द करिती. १२ अलंकारयुक्त. १३ स्त्रीप्रमाणें.

कीं प्रत्यक्ष सुरेश यक्षपतिही त्याच्या पुढें कायसा. ४२

[उ.जा.] जाळी जयांभोंवति मौक्तिकांची, तीं उत्तरीयें रमणीय साचीं;
कुचद्वयालंबित रत्नहार, जे स्पर्शतां लागति फार गार;
[इं.व.] वस्त्रें लघू मलमलिचीं सुरेख, जीं फुंकल्यानें उडताति देख,
वेषा अशा तूं करि बा प्रियांस, ये सांगण्या ग्रीष्म जणूं कुशास. ४३

[शा.वि.] ज्या मार्गास अगस्त्यनाम मुनिचें होतें सदा दर्शन.
त्याला सोडुनियां मला दिनपती ये भेटण्यालागुन;
ऐसें जाणुनि उत्तराभिध दिशा आनंद बाष्पापरी,
शीताद्रीमधुनी निरंतर अशी सोडी हिमाची झरी. ४४
लोंडाचा झगडा करोनि दयिता आणीक तीचा पती,
हीं रागें सरती दुरी, परि पुढें चित्तांत पस्तावती;
तैसी फार कृशा निशा, दिवसही संतप्त झाला असे,
त्याकाळीं उभयस्थिती निरखितां, त्या दंपतीशी दिसे; ४५
पाणी तें गृहवापिचें प्रतिदिनीं आटावया लागलें,
शेवाळें बहु पायऱ्यांवरि असे तें त्यामुळें वाळलें;
पद्में ही उघडीं पडोनि वरतीं तेव्हां दिसूं लागलीं,
नारींच्या कमरेबरोबर जलें वापींमधें राहिलीं. ४६
संध्याकाळिं कळ्या बऱ्या उमलती त्या मोगरीच्या वनीं,
चाले फार सुवास घेउनि तया येई अली धाउनी;
प्रत्येकावरि पाय ठेवुनि जई गुंजारवाला करी,
तेव्हां हा जणुं मोजितोचि कलिका, ऐसें गमे अंतरीं. ४७

---

१ इंद्र. २ कुबेर. ३ हलकीं. ४ त्या मार्गाला ( दक्षिणायनाला ). ५ सूर्य. ६ हिमालयांतून बर्फाचें पाणी होऊन तें ग्रीष्मकालीं वाहातें त्यावर उत्तरदिशेच्या आनंदबाष्पाचा आरोप केला. ७ ग्रीष्मकालीं रात्र कृश म्हणजे लहान असते आणि दिवस संतापयुक्त असतो या गोष्टीस लक्षून हें वर्णन आहे, त्यांत प्रणयकोपानें कृश झालेली स्त्री आणि संतप्त झालेला पुरुष यांच्या युग्माची उपमा ग्रीष्मकालीन रात्रदिवसांच्या युग्मास दिली. सारांश या काळीं ( ग्रीष्मीं ) रात्र लहान व दिवसा ताप होत असे. ८ त्या प्रणयकुपित अशा. ९ दंपतीसारिखी ( स्थिति दिसे असा अन्वय ). १० वरतीं दिसूं लागलीं असा अन्वय. ११ भ्रमर.

गालीं कामिनीच्या नखक्षत असे झालें पतीच्या करें,
त्याला ये चिकटा बहू गरमिनें घेमें जई ³तें भरे;
कानीं खोंवियलें शिरीषफुल जें भूपेपरी शोभन,
तें वेगें पडतां तयास चिकटे, खालीं न ये तेथुन. ४८

[शा.] ⁵तोयागारीं शीतला तोयधारा, कारंजाच्या ऊडती ज्या भरारा;
सद्रत्नांचीं आसनें मध्यभागीं, जेथें होतीं मांडिलीं जागजागीं.

[इं.व.] तीं चंदनाच्या धुतलीं रसानें, त्यांचे वरी ते निजती सुखानें,
ग्रीष्मर्तुचा ताप धनाढ्य लोक, अशा उपायीं हरिताति देख. ४९

[शा.वि.] न्हायाला कच मोकळे करिति जे त्या धूपवोनी स्त्रिया,
सायंकाळि भरोनि मुंद्ररफुलें त्या घालिती वेणिया;
ग्रीष्मीं दुर्बल पुष्पसायक तरी केशां तयां देखुन,
तो उत्तेजित होउनी अतिशयें वेधी जनाचें मन, ५०

आल्या अर्जुननामका तरुवरा चेतोहरा मंजऱ्या,
आरक्ता बहु धूलियोग घडुनी ज्या दीसती साजऱ्या;
जाळोनी मदना शिवें स्वनयनें तन्मौर्विही तोडिली,
तीचीं हीं शकलें अती सुरुचिरें लोकीं मनीं भाविलीं, ५१

[शि.] रसाळाचे पाले विविध कवळे मद्यहि जुनें,
उसाचें उत्कृष्ट प्रथमपरिचें मादक ¹²उणें;
गुलाबाचीं पुष्पें नवनव गुणानें अधिक तीं,
निदाघीं यांयोगें तरुण जन तापास हरिती. ५२

[शा.वि.] ग्रीष्मांच्या भडक्यांत दोन असती लोकांस फार प्रिय,
ज्यांच्या पादनिषेवणें च हरतो संतापदुःखोच्चय,
त्या माजी उदयाधिरूढ विलसे एक स्वयें तो कुश,
तैसा तो दुसरा सुधाकर हरी जो कां तमा निस्तुप. ५३

ग्रीष्मीं वाटति फार ज्या सरयुचीं लोकांस तोयें प्रियें,

---

१ झालें असे असा अन्वय. २ घामानें. ३ नखक्षत (भरे). ४ नखक्षतास. ५ जलमंदिरांत. ६ मोगरीचीं फुलें. ७ काम. ८ त्याची दोरी. ९ लोकांनीं. १० आंब्याचे. ११ पहिल्या प्रतीचें. १२ कमी मादक (असें जुनें मद्य). १३ चरणसेवेनें पक्षीं किरण सेवनानें. १४ संतापरूप दुःखें पक्षीं संताप व दुःखें. १५ चंद्र. १६ निःशेष.

ऊर्मीच्या विषयीं सतृष्ण बसती [1]जेथें [2]मेराल स्वयें;
[3]ज्यत्तीरीं फुलल्या लता हि विविधा, [4]तेथें स्त्रियांच्या सवें,
क्रीडावें असि वासना कुशमनीं मोठी तईं उद्भवे. १४.
तेजस्वी विभुनें कुशें [5]पटगृहें तीरीं तिच्या बांधुनी,
[6]कैवर्त्ताकरवीं नदींतुनि महा नक्रां दिलें काढुनी;
[7]लक्ष्मी [8]वैभव यांस योग्य असली क्रीडा करायास्तव,
केली सर्वहि सिद्धता धरुनियां चित्तीं महा उत्सव. १५
गर्दीनें जंव पायऱ्या उतरती तों कांकणें घांसती,
अन्योन्याप्रति, तोरड्याहि पदिंच्या मोठ्या स्वरें वाजती;
ऐसा तो वधुंचा अती गलबला ऐकोनियां सत्वरी,
भीतीतें तटिंचे [9]मेरालगण तें घेती [10]बहू अंतरी. १६
कांता अंजलिनीं जला उडविती त्या एकमेकींवरी,
* त्यांच्या स्नानविधीस देखुनि विभू संतोषला अंतरीं;
हातीं चामर घेउनी नृपशिरीं वारी किराती तिला,
नौकासंस्थित भूपती वचन हें बोलूं तईं लागला. १७
"ह्या पाहे [11]वनिता [12]मदीय [13]शतशां पाण्यामधें क्रीडती,
त्यायोगें उटणें सुगंध सगळें तोयीं गळालें किती !
संध्याकाळ अनेकवर्ण दिसतो मेघागमानें जसा,
आतां श्रीसरयूप्रवाह बनला आहे अगे हा तसा." १८
* जोरानें तरिच्या वरी उसळलीं वेगें नदीचीं जळें,
तेणें स्त्रीनयनांतुनी निघुनियां गेलीं त्वरें काजळें;
लाली ये नयनां जशी मदवशें तैसी जलें पातली,
गेलें शोभवितें हि काजळ तरी, तीं लालिनें शोभलीं. १९
मोठाले कुचकुंभ आणिक भल्या जाड्या नितंब[14]स्थली,

१ ज्या सरयूतीरीं. २ हंस. ३ जीच्या तीरीं. ४ त्या सरयूतीरीं. ५ डेरे राहोट्या वगैरे. ६ कोळ्यांकडून. ७ संपत्ती. ८ ऐश्वर्य. ९ हंससमुदाय. १०. बहु भीतीतें घेती असा अन्वय. * "त्यांची हौस विलोकुनी नरपती संतोषला अंतरीं" असें पाठांतर. ११ स्त्रिया. १२ माझ्या. १३ शेंकडों. * "नौकेच्या वरती बहू उसळती" असें पाठांतर. १४ कटिपश्चाद्भाग.

त्यायोगें तनु[1] दुर्वहा[2] अतिशयें [3]ज्यांची असे जाहली;
ऐशा ह्या दृढकंकणान्वित भुजीं कष्टास पावोनि ही,
पोहोंती जलिं यास हेतु तरि गे [4]यांची असे हौस ही. ६०
कानीं खोंवियलीं शिरीषकुसमें [5]कर्णावतंसापरी,
[6]तीं क्रीडा करितां सवेग पडलीं खालीं जलाभ्यंतरीं;
शैवालप्रिय मीन जे असति ते त्यांतें विलोकूनियां,
शेवाळींच असें मनीं समजुनी येती धराया तयां. ६१
क्रीडेतें करितां वधूगण करीं तोयास जैं ताडिती,
तैं मुक्ताकृति वारिबिंदु हि गळीं हारापरी शोभती;
तेव्हां मौक्तिकयुक्त हार तुटले होते जरी क्रीडनीं,
ते नाहीं तुटले असेंचि गमलें त्यां पाहतां लोचनीं. ६२
नाभीचे उपमान थोर भंवरें तोयामधें राहती,
भ्रूचेंही उपमान तेंवि उदकीं ऊर्मीच त्या ऊठती;
[7]वक्षोजां उपमान कोकमिथुनें, तींही तिथें शोभती,
ऐशा या उपमान वस्तु उपमेयापाशि गे दीसती. ६३
गीतें गाउनियां जळास [8]रमणी जैं ताडिती स्वीं करीं,
त्याचा नाद मृदंगसा शिरतसे हा रम्य कर्णांतरीं;
ज्यातें ऐकुनि तीरचीं करुनियां मोरें पिसारे वर,
[9]हर्षें शब्द करीत थैथय तईं तीं नाचती सुंदर. ६४
पाण्यानें भिजुनी बहू चिकटलीं वस्त्रें नितंबस्थला,
रंध्रामाजि भरोनि पाणि अचला झाल्या- तईं मेखला;
[10]नक्षत्र व्रज चांदिण्यामधि नभीं लोपूनियां जातसे,
[11]कांचीव्रात कटीतटीं युवतिच्या निःशब्द तैसा दिसे. ६५
क्रीडेतें करिती सवेग युवती तें एकमेकीवरी,
पाणी फेंकिति तें उडे गतिवशें वक्त्रांबुजांच्या वरी;

---

१ देह. २ जड. ३ ज्या स्त्रियांची ( तनु दुर्वहा जाहली असे असा अन्वय ). ४ या स्त्रियांची (हौस). ५ कर्णभूषणापरी. ६ शिरीषकुसुमांना. ७ स्तनांचें (उपमान). ८ स्त्रिया. ९ पिसारे वर करुनियां थयथय नाचती असा अन्वय. १० नक्षत्रसमूह. ११ कांचीचा समुदाय.

होती केश भिजोनियां सरळ तद्वारें[1] गळे तें जळ,
झालें लाल विलेपनेंकरुनियां जें मूळचें निर्मळ, ६६

केशां बांधियलें वरीच, पुसली पत्रावळी गालिंची,
मुक्तापंक्ति सुटोनि खालिं सरली कर्णस्थ ताटंकिंची;
कांतांचा मुखवेष यारिति जलक्रीडावशें जाहला,
अस्ताव्यस्त, तथापि शोभत असे हा पूर्ववत् चांगला. ६७

नौकारूप विमान त्यांतुनि नृप क्रीडार्थ पाण्यांत ये,
तेथें केलि[3] करी वधूंसह, गळां तें हार झाले स्वयें;
ज्याच्या हस्तिणिशीं जळीं विहरतां स्कंधास गुंतोनियां,
लोंबे पद्मिनि, त्या अरण्यकरिची शोभा दिसे राजयां. ६८

[शि.] मुळीं शुभ्रा मुक्ता[4] मग जंवतया पाच मिळतो,
तयानें तो मेळा बहुतचि मनोहारि दिसतो;
तसा येवोनी तो नृपति अपुल्या स्त्रीगणिं मिळे,
तईं त्यांचें वृंद प्रकट बहु शोभाढ्य दिसलें. ६९

[शा.वि.] सोन्याच्या पिचकारिया तव वधू घेवोनि राजावर,
रंगा टाकिति, ज्यांत फार असतें कुंकू तसें केशर;
त्यायोगें धरणीपती अतिशयें तैसा तटीं शोभला,
जैसा सुंदर धातुनिर्झरवशें शैलेंद्र शोभे भला. ७०

देवांचा पति इंद्र उत्सवभरें आकाशगंगाजलीं,
ऐश्वर्यें बहुतें अनेक विध तो क्रीडा करीतां भली;
जैसा शोभतसे, तसाच कुश ही भूमीपती क्रीडतां,
उत्साहें सरयूजलामधि पहा तो जाहला शोभता. ७१

पूर्वी भूषण[5] कुंभसंभवमुनीपासोनि रामा मिळे,
राज्याच्या सम जें[6] उदार मतिनें रामें कुशाला दिलें;
संग्रामीं जयदायि तें नृपतिचे दंडीं असे रोकडें,
क्रीडेच्या समयीं जळीं न कळतां हातांतुनी तें पडे. ७२

---

१ सरळकेशद्वारानें. २ (अशा प्रकारें अस्ताव्यस्त झाला असा अन्वय). ३ क्रीडा. ४ मोत्यें. ५ हें भूषण अगस्तिऋषीनें रामाला दिलें होतें; याविषयीं पंधराव्या सर्गाच्या पंचावन्नाव्या श्लोकांत सांगितलें आहे तेथें पाहावें. ६ (राज्याबरोबर कुशाला दिलें).

कांतांशीं सह भूमिपाळ विविध क्रीडाविधी साधुनी,
तीरींच्या पटमंदिरीं नदितुनी तो भूप येतांक्षणीं;
वेषातें करणार, तोंचि न दिसे तीं जैत्रभूषा[1] भुजीं,
त्यायोगें मनि त्याचिया निपजली तेव्हां बहू काळजी. ७३

[भु.प्र.] नसे लोभ चित्तीं, असे धैर्य त्याला, गणी तुच्छ पुष्पापरी भूषणाला,
तरी तातें[2] त्याला धरी स्वीयहस्तें, तयाच्या वशें लक्ष्मि ही प्राप्त होते,
अशा हेतुनें मात्र भूमीपतीला, तयाच्या विनाशें बहू खेद झाला. ७४

[शा.वि.] जे कां पाणबुडे प्रसिद्ध असती कैवर्त लोक-व्रजीं,
त्यांना सांगतसे क्षितीश्वर, "तुह्मी शोधा अलंकार जी;"
ऐसें ऐकुनि कोळि सिंधुसलिलीं[3] शोधून त्या, जाहले
व्यर्थोद्योग,[4] परंतु हर्षितमनें भूपास हें बोलले. ७५

"राजा[5] भूषण तें जळांत पडलें, त्याचें अह्मी शोधन
केलें फार, परंतु तें गवसलें नाहीं अह्मांलागुन;
त्याचा शोध असा असे, कुमुद या नावें अही[6] या जलीं
राहे एथ, तयेंचि जाण नृपते, भूपा तुझी हारिली." ७६

कोळ्याच्या वचनास ऐकुनि विभू भारींच रागावला,
डोळे होउनि लाल शीघ्रगतिनें तीरावरी पातला;
सर्पाच्या हननार्थ योग्य जगतीं तार्क्ष्यास्त्र[7] हें जाणुनी,
घेई सत्वर तो शरासन करीं दोरी तया लावुनी. ७७

चापीं अस्त्र नियोजितांच ह्रद[8] तो ऐशापरी क्षोभला,[9]
ऊर्मीरूप-करीं[10] तटास जणुं तो पाडावया लागला;
गर्तेमाजि वनांत सांपडुनियां घोरा निनादा[11] करी[12]
जैसा कां करितो, तसा, ह्रद तई विक्राळ शब्दा करी. ७८

[उ.जा.] [13]भेणें बहू धांवति नक्र पोटीं, गर्दी बहू होय जलांत मोठी,
सरित्पती[14] मंथनकालि जैसा, आतां दिसे हा ह्रद घोर तैसा;

---

१ जैत्रनामक भूषण. २ रामचंद्र. ३ नदीच्या पाण्यांत. ४ व्यर्थ गेला उद्योग ज्यांचा असे. ५ हें संबोधन. ६ सर्प. ७ गरुडास्त्र. ८ पाण्याचा डोह. ९ खळमळला. १० लाटारूप हातांनीं. ११ शब्दा. १२ हत्ती ( करितो ). १३ भयानें. १४ समुद्र.

[भु.प्र.] समुद्रांतुनी श्रीसवें कल्पवृक्ष, जसा ये तसा हा स्वसेला समक्ष,
करीं घेउनी ये ह्रदाच्या वरी तो, भुजंग स्वयें भूप देखे तया तो. ७९

[शा.वि.] भूषा मागुति द्यावया परत तो घेवोनि आला फणी,
त्याला पाहुनियां दया नृपतिच्या उत्पन्न झाली मनीं;
तेव्हां गारुड अस्त्र भूवरि तयें हातांतुनी ठेविलें,
पाहोनी शरणागतास तजिती तत्काळ कोपा भले. ८०
ज्याचा श्रीजगदीश तात, जगतीं जो शत्रुला अंकुश,
केलासे अभिषेक सन्मुनिगणें ज्याला असा जो कुश;
त्यातें तो कुमुद प्रणाम करुनी बोले नतें मस्तकें,
जो गारुत्मतनामकास्त्र महिम्या जाणे स्वचित्तीं निकें. ८१
"जो कार्यार्थ मनुष्यभाव धरितो, त्या विष्णुची तूं दुजी
पुत्राख्याचि तनू ह्मणूनि मजला आराध्य आहेस जी ?
तूझ्या प्रीतित अंतर प्रकट मी आणीन कैसें बरें ?
याची तूंचि विचारणा करुनियां सांगे नृपाळा खरें. ८२
गेला कंदुक ऊर्ध्व सत्वर कराघातें हिच्या त्या तिनें,
पाहायास्तव संभ्रमें करुनियां केलीं वरी लोचनें;
तेव्हां खालति तारकेपरि पडे व्योमांतुनी भूषण,
हें जैत्राव्हय तूमचें निरखुनी ही घे तया धावुन. ८३
जो भारी बलवान्, तसा अवनिचा विस्तीर्ण रक्षार्गल,
आजानु स्फुट लांब आणिक ऋजू तैसाचि दीर्घांगुळें;
आघातें व्रण फार ज्यास असती, ऐशा भुजालागुन,
जैत्राख्या वलयास [12]संगति घडो, [13]हें घेतसें मागुन. ८४

[इं.व.] कुमुद्वतीनामक देख माझी, बहीण माझ्याहुनि धाकुटी जी,
देतों तुला ही, न करी नकार, प्रेमें करी सत्वरि अंगिकार;

---

१ बहिणीला. २ सर्प. ३ नम्रकेलेल्या. ४ जो कुमुद नाग गरुडास्त्रमहिम्यास निकें जाणे असा अन्वय. ५ नक्षत्राप्रमाणें. ६ जैत्रनामक. ७ ही माझी बहीण ( घेई ). ८ मोठा रक्षण करण्याचा अर्गलच. ९. जानुपर्यंत ( लांब ) असा भुज. १० सरळ. ११ दीर्घ आहेत अंगुली ज्याच्या असा ( भुज ). १२-तूं हें भुजांत घाल असा अर्थ. १३ हें मागणें मागून घेतों.

धरोनि चित्तीं बहु भक्तिभावा, करील ही त्वत्पदयुग्मसेवा,
त्वत्सेवनें मागिल दोप राया, इच्छीतसे, सर्वहि घालवाया."८५

[शा.वि.] ऐसें बोलुनि भूपतीस कुमुदें भूषा दिली आदरें,
ती घेऊनि वदे नृपाळ कुमुदा, कीं, "हे भुजंगा, बरें;
बंधू तूं अमुचा स्वकीय असती," हें ऐकूनी कुंडली,
देई त्या नृपतीस तीस विधिनें तो बंधु बद्धांजली. ८६

अग्नि स्थापुनियां, तिच्या मणगटीं बांधोनियां कंकण,
तत्पाणिग्रहणा यथाविधि करी तो जानकीनंदन,
तैं वाद्यें बहु वाजलीं सुरपुरीं त्यांचे दिगंतीं ध्वनी
गेले आणिक पुष्पवृष्टि गगनांतूनी हि केली घनीं. ८७

ऐसा तो जगदीशपुत्र अणखी तो तक्षकाचा सुत
यांचा आप्तपणा वडोनि जमलें मित्रत्वही शाश्वत;
झाला मुक्त तई भुजंग गरुडोत्पन्ना भयापासुनी,
तैसी पृथ्वि हि मुक्त होय अहिच्या दंशोत्थभीपासुनी.

[उ.व.] कुमुद्वती नाम सुरूप आर्या, यथाविधी यापरि आत्मभार्या
करोनियां नीतिवशें नृपाळ, पाळीतसे भूमिस तो कृपाळ. ८८

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें जें रघुवंश काव्य रचिलें मोठ्या श्रमें प्राकृतीं,
त्याचा पोडश सर्ग हा विबुध हो देखा तुह्मी संमती ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा कुशविवाहवर्णननामक पोडश सर्ग समाप्त झाला असे.

---

१ कुमुद सर्प. २ (कुमुद्वतीचा भाऊ) कुमुद. ३ अमरावतींत. ४ मेघांनीं. ५ कुश.
६ कुमुद सर्प. ७ सर्पांच्या. ८ डसण्याच्या भयापासून. ९ कुश.

## सर्ग सत्रावा.

### आर्या.

प्रातःकालवशानें, प्रसाद बुद्धीस होतसे जेवीं;
अतिथी कुमुद्वतीच्या उदरीं, सुत होय कुशवशें तेवीं. १
मातापितृवंशांतें, पवित्र करि तो महाद्युती तैसा;
उत्तरदक्षिणमार्गा, पूत करी तो प्रभाकरचि जैसा. २
आधीं विद्यार्पण करि, पुत्राला, तत्वजाणता तात;
मग भूपकन्यका त्या, देई रूपें गुणेंहि विख्यात. ३
शूर, कुलीन, जितेंद्रिय, कुश तत्सुत अतिथिही तसाचि असे;
निजगुणयुक्त ह्मणुनि कुश, दुसरा आत्माचि त्यास मानितसे. ४
वडिलांपरि [1]तोहि करुनि, साह्य [2]सुरेशा स्वकीय शस्त्रवरें;
अन्वर्थदुर्जयाख्या,[3] [4]दैत्या मारुनि [5]तदायुधेंचि [6]मरे. ५
कुमुदाख्य नागभगिनी, कुमुद्वती अनुसरे तयास तसी,
कुमुदानंदकविधुला, अनुसरते [7]कौमुदी प्रसिद्ध जसी. ६
सिंहासनार्द्धभागी, इंद्राचा जाहला तई कुश हा;
कल्पद्रुमकुसुमांची, भागी शचिची कुमुद्वतीहि पहा. ७
समरा जातांना जी, आज्ञा केली कुशें स्वमंत्रिजनां;
सिंहासनीं ह्मणुनियां तत्पुत्रा स्थापिलें तिहीं जाणा. ८
उन्नत [10]ज्यांच्या वेदी, चोहीं खांबांवरी उभा केला,
ऐसा नूतन मंडप, अभिषेकासाठिं त्याचिया केला. ९
त्या मंडपांत मोठें, भद्रासन मांडुनी तयावरतीं,
सादर भूमीपतिच्या, पुत्राला मंत्रिवृद्ध बैसविती;
आणवुनी बहुपावन, तीर्थांपासुनि जलें पवित्र शुभें,
स्वर्णाच्या कुंभांनीं, घेउनि ते राहिले समीप उभे. १०
नानापरिच्या मंगलवाद्यांचे थोर चालिले बाजे,
त्यांचे तेव्हां उठती, मोठे गंभीर गोडही स्वर जे;

१ (तो कुशही). २ इंद्राला. ३ यथार्थ आहे दुर्जय ही आख्या म्ह० नाम ज्याचें अशा. ४ असुराला. ५ त्या दैत्याच्याच शस्त्रानें. ६ मरण पावता झाला. ७ चांदिणें. ८ अर्धा सिंहासनाचा वांटेकरी. ९ कल्पद्रुमाच्या फुलांची वांटेकरीण. १० ज्या मंडपाच्या.

त्या मंगल स्वरांनीं, ऐसें झालें जनांत अनुमान,
कीं, या अतिथिनृपाचें, होइल आतां अखंड कल्याण. ११
श्लक्ष्णत्वचा, यवांकुर, दूर्वा, कमळें, अशा पदार्थीहीं,
नीराजनाविधी तैं, केला त्यालागिं जातिवृद्धांहीं. १२
विप्र पुरोहितमुख त्या, अभिषेकोपक्रमा करिति आधीं,
आथर्वण मंत्रगणें, जो कां विजयास निश्चयें साधी. १३
पडतां शिरीं तयाच्या, सशब्द शोभे विशाल उदकौघ;
शिवमस्तकीं जसी कां, गंगा जी हारिते समस्त अघ. १४
स्तुतिपाठक करिति स्तव, त्याचा तंव शोभला कुमार तसा;
चातक शब्दा करिती, ज्याभंवतीं तो सतोय मेघ जसा. १५
मंत्रोदकाभिषेकें, अधिकाचि तो कांतिमान् दिसे कुमर;
वृष्टिवशानें वैद्युत, वन्हि जसा गगनिं चमकतो फार. १६
अभिषेकांतीं त्यानें, दिधलीं इतुकीं धनें गृहस्थांस;
कीं, बहुदक्षिण यागहि, त्यांचे जावे तिहीं समाप्तीस. १७
त्यांनीं दिधल्या आशी, सफला होण्यास संधि तैं नव्हती;
कां जे प्राक्कर्में त्या सर्वैश्वर्येंहि पातली होतीं. १८
बंद्यां सोडा, वध्यां मारूं नका, गाइनां न दोहा रे;
बैलां लादुं नका हो, ऐसी आज्ञा दिली तईं कुमरें. १९
क्रीडेचे देखिल तैं, राघू मैना व पांखरें दुसरीं;
बंधांतोनि सुटुन तीं, उडती गगनीं यथेच्छ खालिंवरी. २०

---

१ वडाची त्वचा. २ नीराजनाविधि म्हणून एक मंगलकारक कर्म आहे. त्यांत दूर्वादिक शुभ औषधी कमलादि फुलें अक्षता इत्यादि शुभ पदार्थ मिळवून आणि सुंदर दीप पाजळून आरतीसारिखें ओंवाळतात. एणेंकरून अशुभाचा निरास होऊन अभ्युदय होतो अशी समजूत आहे. ३ उपाध्यायप्रमुख (हें विप्र याचें विशेपण). ४ (जो अथर्व मंत्रगण). ५ शिवाच्या मस्तकीं गंगा आहे अशी पुराणप्रसिद्धि आहे तीस अनुलक्षून ही उपमा आहे. ६ विजेसंबंधी अशी. ७ साग्निक ब्राह्मणांस. ८ त्या धनांच्या योगें. ९ आशीर्वाद. १० मोठमोठ्या राजांस राज्याभिषेक होऊं लागला असतां तसेंच त्यांना पुत्र झाला असतां त्यावेळीं आनंदप्रदर्शनार्थ बंदिवान सोडणें,* वधार्हांस जीवदान देणें. इत्यादि दयाळूपणाचीं लोकांवर मेहेरबानीचीं कृत्यें प्राचीनकाळीं करण्याचा संप्रदाय होता त्यास अनुलक्षून हीं दोन पद्यें ( १९ वें व २० वें ) केलीं आहेत.

मग अन्य मंदिरीं शुचि[1] गजदंती[2] आसनावरी नृपती;
बैसे जाउनि, तेथें, भूषादिक घालण्या तनूवरती. २१
सद्गंधद्रव्यांनीं धूपउनी वाळवोनियां केंस,
प्रक्षालून करांतें, सेवकजन वेष करविती त्यास. २२
मुक्तासारिं आवळुनी, माळा घालोनि केशपाशांत,
त्यांनीं घट्ट बसविला, अतिभासुर पद्मरागमणि आंत. २३
कस्तूरीयुत चंदन, यांची लावोनियां उटी तनुला,
मग गोरोचनयोगें, करिती त्याला सुपत्ररचनेला. २४
नानालंकार असे, शोभति जडले अमूल्य मणि ज्यांला[3],
घालुनि त्यां[4] हंसांनीं[5], चित्रितें तो शालजोडि पांघरला;
अतिदर्शनीय झाला, वरशोभा अतिथिला बहू आली,
राज्यश्री हीच वधू, त्याची योग्या तईं जना गमली. २५
स्वर्णादर्शामध्यें, शोभे त्याचा सुवेष तें तैसा,
मेरुस्थित[6] कल्पतरू, उदितीं रविमंडलीं दिसे जैसा. २६
छत्रादिक नृपचिन्हें, धरुनि करीं जयरवा[7] करिति लोक,
ऐसा सभेस तो ये, होती जी[8] सुरसभासमा[9] देख. २७
यत्पादपीठ[10] झिजलें, नृपमुकुटीं छत हि शोभलें ज्याला,
सिंहासनीं पित्याच्या, ऐशा तो अतिथि आदरें बसला. २८
मांगल्यागार[11] अशी, अतिथीनें ती सभा बहू विलसे,
श्रीवत्सलक्षण[12] तईं, विष्णूचें वक्ष कौस्तुभेंचि जसें. २९
अर्ध्याचा सगळा जो, होतो विधु त्यापरी कुमार भला,
तो सार्वभौम होउनि, पूर्वीहुनि शोभमान तें दिसला. ३०

---

१ शुभ्र. २ हस्तिदंताच्या (आसनावर). ३ ज्या अलंकारांला. ४ त्या अलंकारांस ( घालून ). ५ जीच्यावर हंस काढले आहेत अशी. ६ मेरुपर्वतावर कल्पवृक्ष आहेत, त्यांचें प्रतिबिंब उदय पावणाऱ्या स्वच्छ सूर्यबिंबांत जसें सुंदर दिसतें तसें (अशी उपमा होय ). ७ जयशब्दा. ८ जी सभा. ९ देवसभेसमान. १० ज्या सिंहासनाचें पादपीठ. ११ मांगल्याचें घरच (अशी सभा)पक्षीं विष्णूचें वक्षस्थल. १२ श्रीवत्स म्हणून राजवाड्याचा एक प्रकार आहे तल्लक्षण म्हणजे तद्रूप. (अशी सभा ) पक्षीं, श्रीवत्स म्हणजे एक चिन्ह विष्णूच्यां उरस्थलीं प्रसिद्ध आहे तल्लक्षण म्हणजे त्या चिन्हानें लक्षित अथवा चिन्हित ( असें विष्णूचें वक्षस्थल ).

सतत प्रसन्नमुख, तो स्मितपूर्वक भाषणा करी नृपती,
हा साक्षात् विश्वासचि, ऐसें अनुजीवि लोक त्या गणिती. ३१
इंद्रसमश्री राजा, ऐरावतसम करीवरी बसला,
वाजतगाजत मोठ्या, थाटानें निजपुरीमधें फिरला;
कल्पतरूपरि विलसति, शोभाशाली ध्वजा जिथें नाना,
ऐसी नगरी त्याच्या, संक्रमणें स्वर्ग भासली जाणा. ३२
जेव्हां छत्र विमलरुचि, त्या एकाच्या शिरावरी धरिलें,
पूर्वक्षितिपतिविरहज औष्ण्य सकल भूमिचें तंई हरलें. ३३
अग्नीचा धूर अधीं, ज्वाळा मागूनि त्याचिया निघती,
तैसे किरण रवीचे, उदयामागूनि भूवरी पडती;
तेजःस्थिती असी परि, तत्क्रम सोडोनि अतिथि हा देख,
गुणसमुदायासह तो, उदयातें पावला जनीं एक! ३४
प्रेम प्रसन्ननयनीं वेढिति, तैशा नृपास पुरयुवती,
शारदनिर्मलउडुनीं, ध्रुवाप्रती रात्रि जेंवि आकलिती. ३५
सन्मंदिरीं सुपूजित, साकेतग देवताहि पावुनियां,
सान्निध्य मूर्तिमाजी, अनुग्रहा करिति भूपतीवर या. ३६
यावत् सुकलि न वेदी, अभिषेकें आर्द्र जाहली जी कां,
तावत् प्रताप दुःसह, त्याचा वेलांत पावला देखा. ३७
मंत्र वसिष्ठगुरूचे, शर याचे हे मिळोनि दोघे ही,
न शकति साधाया जें, वस्तु असें त्रिभुवनीं असे [11]कांहीं? ३८

---

१ राज्याभिषेक झाल्यावर राजास हत्तीवर बसवून नगरांत फिरवीत असत या गोष्टीस लक्षून हें वर्णन आहे. यांत या राजाला इंद्राचें साम्य वर्णिलें आहे. कारण हा राजा इंद्राप्रमाणें व याचा हत्ती ऐरावताप्रमाणें व याची नगरी स्वर्गाप्रमाणें शोभायमान होती. २ पूर्वील राजाच्या वियोगानें झालेलें. ३ उष्णत्व. ४ ( एकाच्या डोक्यावर छत्र धरिल्यानें सर्व लोकांच्या उष्णाचें निवारण झालें हा एक चमत्कार ). ५ शरत्कालीन स्वच्छ नक्षत्रांच्या योगें. ६ ( हें कर्तृपद ). ७ अयोध्येंतील ( देवता ). ८ ( देवता मूर्तीमाजी सान्निध्य पावून या भूपतीवर अनुग्रहा करिती असा अन्वय ). ९ समुद्रमर्यादेपर्यंत. १० ( मंत्र व बाण मिळून त्यांस साध्य नव्हे असें कांहीं वस्तू होतें काय अशी काकू ). ११ एथें प्रश्नरूप काकू न केली तर ( वस्तु असें त्रिभुवनीं नसे कांहीं ) असा पाठ समजावा.

धर्मज्ञांसह निरलस, नित्य जनांचे [1]विवाद तो पाही,
संशय दूर करोनी, न्याय तयांना यथार्थ तो देई. ३९
[2]निजसौमनस्ययोगें, प्राप्ति जयांची मना अधींच कळे,
पाकाभिमुखें ऐसीं, देती तरुवर जनास इष्ट फळें;
त्याच रितीनें सारें, आटोपोनी सभेंतलें काम,
निजभृत्यांनीं [3]प्रार्थित पुरवितसे तो प्रसन्नमुख काम. ४०
श्रावणमासीं जैशा, नद्या सकल पावताति वृद्धीतें,
कुशभूपाच्या काळीं, प्रजा तशा पावल्या समृद्धीतें;
त्याच नद्यांना भाद्रीं, मासीं येतो जसा महापूर,
[4]यांच्या काळिं जनाची, संपत्ती वाढली तसी थोर. ४१
बोले तें सत्य करी, जें देई तें न घेइ माघारें,
हें व्रत रिपु उपट्टुनि त्यां, स्थापि पुन्हा ह्मणुनि भग्न होय खरें. ४२
ऐश्वर्य, रूप, यौवन, यांतुन एकेक हेतु माजास,
आंगीं सर्व असुनि हीं, मदलेशहि येइना कधीं ज्यास. ४३
फार प्रजांस अवडे ह्मणुनि, नवा जरि तथापि त्या राया,
दृढमूला वृक्षापरि, शकति न अरिचे समूह उपडाया. ४४
[5]बाह्यप्रतिपक्षिव्रज, दूर वसे तो न सर्वदा बाधी,
यास्तव अंतर्गत, [6]षड्रिपुवर्गालागिं तो जिणी आधीं. ४५
चंचल जरीं स्वभावें, लक्ष्मी तरि याचिया घरीं [7]पाहे,
[8]निकषीं [9]कांचनरेखा जशी, तशी [10]ती सदा स्थिरा राहे. ४६
केवल नीति न बरवी, तिजला भितरेपणा जनीं ह्मणती,
नीतिविवर्जित शौर्या श्वापदवत् क्रूरताचि ते गणिती;
यास्तव नीतिसमेता, शौर्या अवलंबुनीच विजयातें,
साधाया हा नृपती, पाहे जिंकोनि सर्व [11]अरिजातें. ४७

---

१ फिर्यादी कज्ये. २ आपल्या पुष्पोद्गमानें राजपक्षीं आपल्या चांगल्या उदार मनाचे योगें. ३ इच्छिलेले ( काम ). ४ या राजाच्या समयीं. ५ बाह्य वैरिसमुदाय. ६ कामक्रोधादिक. ७ देख ( हें पादपूरणार्थक अव्यय एथें जाणावें, मुख्य क्रियापद राहे हें आर्येच्या उत्तरार्धाच्या अंतीं आहे). ८ सोन्याची कसोटी पाहण्याचा दगड ( त्याचे ठायीं). ९ सुवर्णाची रेघ. १० लक्ष्मी. ११ वैरिसमुदाय.

सेवकरूपी किरणां, स्वमंडळीं[1] फेंकुनी नृपाळ पहा,
अभ्ररहित सूर्यापरि, लोकव्यवहार पाहि भूमिप हा[2]. ४८
ज्या ज्या काळीं जें जें, विहित असे कार्य शास्त्रिं भूपास,
त्या त्या काळीं तें तें, करि नियमें सोडुनी विकल्पास. ४९
मंत्र्यांसह नित्य करी, विचार तरि तो न ये उघडकीस,
राखी गुप्तद्वारें, जीं[3] कां लोकांत सुचविती त्यास. ५०
निजपरमंत्र्यादिकृती[4], जाणाया योजि गुप्त अनुचर जे,
तद्योगें सतत असे, जागा जरि तो स्वकालिं नित्य निजे. ५१
जरि बलशाली राजा, हा जिंकी सर्व शत्रुच्या वर्गा,
निर्भय चित्तीं तरि दृढ, राखी तो आपुल्या सकल दुर्गां[5];
करिवरहंता बलवान्, सिंह जरी तो गुहोदरीं निजतो;
तरि काय त्यास ह्मणतिल, कोणि तरी हा[6] खरा मृगांस भितो. ५२
लोकहितावह[7] संतत, निरीक्षिता बाधवर्जिता साच्या;
गर्भस्थितशालीपरि[8], फलती लोकांत गूढ कृति याच्या. ५३
अतिसंपन्न तथापी, कुपथें नृपती कधीं न वागे तो;
भरती आली जरि तरि, सागर नदिच्या मुखेंचि वर येतो. ५४
लोकांची अप्रीती, दूर कराया समर्थ भूमिपती
होता, तरि तीचें[9] तो, कारण होऊं न दे मुळींच कृती[10]. ५५
जरि बलशाली तरि तो, न्यूनबला रिपुवरी करी स्वारी;
वायू सहाय जरि तरि, वणवा जाळूं न पाहि तो वारी[11]. ५६

---

१ आपल्या राष्ट्रांत पक्षी मंडळांत. २ हा भूमिप. ३ (जीं द्वारें त्या मसलतीस लोकांत प्रकट करिती तीं गुप्त राखी असा अन्वय). ४ आपल्या व दुसऱ्या राजाच्या प्रधानादिकांचीं आचरणें. ५ किल्ले. ६ हा सिंह खरेंच मृगांस भितो असें कोणी तरी म्हणतील काय? असा अन्वय. ७ लोकांस हितकारी नेहेमी ज्याची देखरेख केली, ज्यांना कशाची पीडा झाली नाहीं अशा त्याच्या गुप्तकृती सफल होत असत जशा गर्भयुक्त शाली ज्या लोक हितकर व नेहेमी देखरेख केलेल्या व निर्बाध असतात त्या फलित होतात. ८ गर्भीं म्हणजे अभ्यंतरीं परिपाक पावणाऱ्या शाली त्यांचेपरी. ९ त्या अप्रीतीचें. १० कुशल. ११ उदकाला.

* लोकप्रसिद्ध जे कां, धर्म तसा काम आणखी अर्थ;
न्यूनाधिकता सोडुनि, सेवी तो तुल्य तीन पुरुपार्थ. ५७
न्यूनबल न उपयोगी, अधिकबल तरी करीति अपकार;
यास्तव मध्यमबळ तो, मित्रां ठेवी सदैव नरवीर. ५८
शक्ति बलाबल देखुनि, आपण अरिहुनि बलाढ्य हें वाटे;
तरि तो जाय तयावरि, अधिक बलाच्या न जाय तो वाटे. ५९
[1]आश्रयितेला [2]अर्थचि, मूल ह्मणुनि अर्थ सांचवी नृपती;
स[3]जल पयोधर जाणुनि, चा[4]तक सादरपणें तया भजती. ६०
शत्रूंच्या उद्योगां, विफल करुनि आपु[5]ले करी पार;
स्वच्छिद्र गुप्त राखुनि, पररंध्रा शोधुनी करी मार. ६१
[6]वाढविलें बापानें, अभ्यासहि करवि [7]तोचि युद्धाचा;
ऐसें भूपतिचें बल, तसेंचि वपु, भेद तो नसे त्यांचा. ६२
सर्व शिरोरत्नापरि, त्याच्या [8]शक्तित्रया न वैरि हरी;
चुंबक लोहास तसा, रिपुच्या शक्तित्रयास तोचि हरी. ६३
वापीपरी नद्यांते, राना बागापरीच [9]गतभीती;
जाणुनि गिरी घरापरि, व्यापारी पाहिजेतसे फिरती. ६४
विघ्नांपासुनि तो तप, चोरांपासोनि राखि अर्थास;
यास्तव आश्रम वर्णहि, देति तया [10]निजतपोर्थषष्ठांश. ६५
रत्नें खाणींत, वनीं गज, धान्यें विपुल शेति, पसवूनी;
निजरक्षणानुरूपचि, दे वेतन या नरेश्वरा धरणी. ६६

---

* अथवा ( वरील अर्थाचीच दुसरी आर्या )—
धर्मीं, अर्थीं, आणिक कामीं, तो नीतिमंत भूमिपती;
तीनहि पुरुपार्थीं, ह्या ठेवितसे सारखीच निजवृत्ती. ५७

१ आश्रयित्वाला. २ द्रव्य. ३ जलयुक्त मेघ. ४ चातक म्हणून एक पक्षी आहे तो मेघांतून जे थेंब त्याच्या तोंडांत पडतील ते मात्र पितो त्याखेरीज दुसरें पाणी तो पीत नाहीं अशी कविप्रसिद्धि आहे. ५ आपुले उद्योग पार करी असा अन्वय. ६ हें बल व वपू यांचें विशेपण. ७ बापच. ८ प्रभावशक्ति, उत्साहशक्ति, मंत्रशक्ति अशा राजांच्या तीन शक्ति सांगितल्या आहेत त्यांचें त्रय. ९ निर्भय. १० आपल्या तपाचा षष्ठांश ब्राह्मण व अर्थाचा षष्ठांश व्यापारी यास देती.

गुण[1]षट्क व [2]बलषट्कहि, यांचा विनियोग कार्य साधाया;
कैसा करिजे, याचें, ज्ञान असे [3]गुहसमा यया राया. ६७
सामाद्युपाय चारहि, निजपर राष्ट्रांत योजुनी ऐसे;
सद्राजनीतिचें तो, फल निर्बाध क्षितीश भोगितसे. ६८
जाणे कपट करूं परि, सन्मार्गे करि रणा[4]स भूपाळ;
वीरें[5]प्रिया जयश्री, आपण होवोनि घालि त्या माळ. ६९
तेजेंचि भग्न अवघे, वैरि ह्मणुनि ये न योग युद्धाचा;
गंधेंचि इतर करि जो, हरि त्या वनकरिचियापरी साचा. ७०
चंद्र[6]समुद्रापरि तो, वृद्धिस पावे परंतु हानि कधीं;
त्या दोषांच्या परि हा, पावेना भूपती समृद्ध सुधी. ७१
विद्वान् याचक त्याच्या, दानानें दानशूर ते झाले !
अब्धिवशें मेघ जसे, जनिं दातृत्वास पावती वहिले. ७२
स्तुत्याचरण करी परि, पावे स्तुतिनेंचि लाज तो राय;
स्ताव[7]कवैरि असें, तंव यश हें त्याचें दिगंतरीं जाय. ७३
दुरिता[8] दर्शनमात्रें, तत्त्वार्थे दवडुनी तमा[9]स दुरी;
उदिता[10]दित्य तसा, तो प्रजांस अपुल्या अधीन भूप करी. ७४
[11]विधुचे कमलीं तैसे, रविचे कुमुदीं प्रवेशति न किरण,
परि या भूमिपतीचे, विपक्षहृदयीं प्रवेशती सुगुण. ७५
हा भूप अश्वमेधासाठीं, जिंकावया निघे देख,
रिपुवंचना घडे तैं, धर्म्यचि ती कांकि, हेतु तीस मख. ७६

---

१ राजाचे साहा गुण. २ राजाचीं साहा बलें ( शास्त्रांत उक्त आहेत ). ३ षडाननासमान जो हा राजा त्यास. ४ युद्धास. ५ वीरच जिला प्रिय अशी ( विजयश्री ). ६ चंद्र आणि समुद्र यांच्या प्रमाणें. ७ स्तुती करणाराचा हा शत्रु होय ( हें यश ). ८ पापास. ९ अंधकारास पक्षीं अज्ञानास. १० उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें. ११ चंद्रोदय झाला असतां कमळें आणि सूर्योदय झाला असतां कुमुदें मिटतात अशी प्रसिद्धी आहे तीस लक्षून हें वर्णन आहे. तात्पर्य याचे उत्तम गुण पाहून याच्या द्वेष्ट्यांस देखील विस्मय वाटून ते माना डोलवीत असत. कमलांत जसे चंद्रकिरण व कुमुदांत जसे सूर्यकिरण प्रवेश करित नाहींत तसा याच्या गुणाचा प्रवेश शत्रूच्या हृदयांत झाला नाहीं असें नव्हे तर ते शत्रुहृदयांत प्रविष्ट झाले आणि त्यांसही तोषकारक झाले.

शास्त्रविहित मार्गांनें, निजप्रभावें समृद्ध होउनि हा,
देवांचा देव जसा, इंद्र तसा राजराज होय महा! ७७
पंचम लोकपती कीं, षष्ठ महाभूत होय हा सुमती,
तसा साधर्म्यवशें, कुलपर्वत आठवा असें ह्मणती. ७८
आज्ञापत्र ययाचें छत्र, विरहितीं शिरीं धरिति राजे,
इंद्राचें शासन सुर, मान्य करिति जेंवि मस्तकेंचि निजें.७९
अश्वमखि दक्षिणा तो, अशा रिती देई ऋत्विजांस महा,
कीं ज्यातें पाहुनि जन, ह्मणती प्रत्यक्ष होय धनदचि हा.८०

श्लोक.

[५५.] काळीं पर्जन्य पाडी सुरपति, यम ही रोगबाधा निवारी,
नावाड्यां योग्य ऐसा वरुण, करि जलीं मार्ग तें सौख्यकारी;
कोशाची वृद्धि त्याच्या, धनदें करितसे पूर्वजांच्या प्रमाणें,
ऐसे या पातले तें शरणचि, अवघे लोकपाल क्रमानें. ८१

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,
त्यानें ज्या रघुवंशनाम रुचिरा काव्यास यत्नें महा
केलें प्राकृत त्यामधील सतरावा सर्ग हाही पहा. ॥ १ ॥

या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील अतिथिवर्णननामक सतरावा सर्ग समाप्त झाला असे.

---

१ इंद्रादिक जे चार लोकपाल, त्यांच्या सारिखा हा लोकसंरक्षक होता म्हणून हा पांचवा लोकपालच, व आकाशादि पंच महाभूतांप्रमाणें लोकोपकारक होता म्हणून साहावें महाभूतच, व महेंद्र मलयादिक जे सात कुलपर्वत त्यांच्या सारिखा हा भूमीचें धारण करणारा होता म्हणून हा आठवा कुलपर्वतच होय असा अर्थ या पद्यांत वर्णिला आहे. २ कुबेर. ३ इंद्र. ४ कुबेर.

# सर्ग अठरावा.

## श्लोक.

[द्रु.वि.] निषधराज[1]सुतोदरिं चांगला, अतिथिभूपतिला सुत जाहला;
निषधशैलसमान[2]चि जो बळें, निषध हें अभिधान तया दिलें. १

[शा.वि.] पाहोनी सुतविक्रमास[3] अतिथी चित्तीं ह्मणे कीं भला,
हा पाळील जनास निश्चित, असें जाणून तो तोषला;
शेतामाजि पडोनि वृष्टि पिकती धान्यें मनाजोगतीं,
तीं देखोनि समस्तलोक हृदयीं तोषा जसे पावती. २

[शा.] नाना भोगां भोगुनी दीर्घकाळ, राज्यीं पुत्रा स्थापुनी तो नृपाळ;
सत्कर्मांनीं प्राप्य जो स्वर्गलोक, तेथें गेला अंतिं भूपाळ देख. ३

[शा.वि.] चित्तीं सागरसा गंभीर[4], नयनीं पद्मापरी सुंदर,
बाहूंच्या युगुलीं पुरार्गल[5] तसा, युद्धीं परां[6] दुर्धर;
ऐसा तो कुशपौत्र[7] सिंधुवलयें संवेष्टिल्या भूतळा[8],
एकच्छत्रपणेंचि पाळि निषध[9] क्षोणीपती एकला. ४
तेजें पावकसा नळ[10] स्वजनक[11] स्वर्गास गेल्या वरी,
राज्याचा अधिकार सर्व अपुल्या तो घेइ माथ्यावरी;
जो पद्मानन कांतिमान् निजबळें युद्धांत मारी अरी,
जैसा शार्दूलदेश[12] पादगमनें नाशी पदांनीं करी[13]. ५
ज्याची किन्नर कीर्ति गाति भुवनीं त्याही नळाला सुत,
झाला श्रावणनाम[14] मासच जसा लोकां रुचे संतत;
ज्याची सुंदर अंगकांति गगना ऐसी सुनीला[15] दिसे,
त्याचें नांव महीतळीं नभ[16] असें प्रख्यात झालें असे. ६
तेव्हां उत्तरकोसलाख्यविषयीं[17] पुत्रा नभाला नळ,

---

१ निषधराजाच्या कन्येच्या पोटीं. २ निषधनामक पर्वताप्रमाणें. ३ पुत्राच्या पराक्रमास. ४ गंभीर. ५ पुरद्वाराच्या अडसराप्रमाणें. ६ शत्रूंस. ७ कुशाचा नातू. ८ समुद्रवलयांकित पृथ्वीला. ९ निषधनामक राजा. १० नल नांवाचा ( हें कर्तृपद ). ११ आपला बाप. १२ हिरव्या चारीनें युक्त प्रदेश. १३ हत्ती. १४ श्रावणमासासारिखा. १५ नीलवर्ण. १६ नभ हें त्या राजपुत्राचें नांव व श्रावणमासाचेंही नांव होय. १७ देशांत.

स्थापी राज्यपदीं स्वधर्मरत जो चित्तीं सदा निर्मळ;
हें झाल्यावर मुक्तिसाठिं नृपती वृद्धापकाळीं मनीं,
होवोनी सुविरक्त जाउनि वसे ऐणांसवें तो वनीं. ७

[रथो.] पुंडरीक ह्मणुनी तया सुत, जाहला अतिशयें बलान्वित,
पुंडरीकगज अन्य हत्तिला, तेंवि हा रणिं अजिक्य शत्रुला;
स्वर्गलोकगत तात जाहला, पुंडरीक सुत राज्यि बैसला,
सेवि विष्णुस सदा रमा जशी, याहि भूमिपतिला भजे तसी. ८

[शा.वि.] झाला त्या क्षितिपालकास सुगुणी तो क्षेमधन्वा सुत,
जो कां शांत असोनि दक्ष अवनीं पृथ्वीचिया निश्चित;
ऐसें जाणुनि राज्य देउनि तया भूपाळ तो सत्वर,
जावोनी गहना वनांमधिं तपश्चर्या करी दुस्तर. ९

[शा.] देवानीक ख्यात नामा तयास, झाला पुत्र श्रेष्ठ भूमीपतीस,
सेनांचा जो अग्रगामी रणांत देवांशीं जो तुल्य होता जगांत. १०
केलें ऐसें नंदनें सेवनाला, कीं त्यायोगें पुत्रवान् तात झाला;
भारी प्रेमा नंदनीं त्याच योगें, झाला सूनू तातवान् तत्प्रसंगें. ११

[उ.जा.] जनावनाचा मग सर्वभार, टाकोनि पुत्रावरि त्या नृवीर;
यज्ञादि कर्मा करुनी स्वलोकीं, गेला कृती तो यजमानलोकीं. १२

[शा.वि.] देवानीकतनूज जो मधुरवाक् विख्यात लोकीं असे,
त्यायोगें स्वजनापरी रिपुगुणीं मैत्री तयाची वसे;
जीं कां पावुनियां भयास हरिणें रानामधें धांवती,
तींही मंजुळ वाणिनें वश नरा होताति हो निश्चिती. १३

---

१ मृगांबरोबर. २ पुंडरीक म्हणून एक दिग्गज आहे तो जसा इतर हत्तींना अजिक्य आहे तसा हा शत्रूला अजिक्य असा अन्वय. ३ लक्ष्मी. ४ रक्षणीं ( पृथ्वीच्या ). ५ देवानीकनामक. ६ बाप. ७ पुत्र. ८ जनरक्षणाचा. ९ यज्ञ करणारे ज्या लोकीं जातात त्या लोकीं (स्वर्गास). १० देवानीकाचा पुत्र. ११ शत्रुसमुदायांत त्याची मैत्री वसे म्हणजे त्याच्या मधुर भाषणानें शत्रूही त्याला प्रेमानें वश झाले होते. ही गोष्ट ठीकच आहे, कारण जीं हरिणें मनुष्याला पाहून रानांत भयानें पळतात तींच हरिणें त्याच्या मंजुळ व गोड शब्दाच्या योगानें त्याला वश होतात असा अनुभव आहे तस्मात् या राजाच्या मधुर भाषणानें त्याचे शत्रू त्यावर प्रेम करूं लागले हें योग्यच होय.

त्याचें नाम अहीनगू ह्मणुनियां होतें जगा ठावकें,
तो पाळी सकळा महीस, बळही बाहूंत ज्याच्या निकें;
नीचाचा न करीच संग ह्मणुनी होता युवा ही तरी,
त्याला दुर्व्यसनें न बाधिति, वसे सद्वासना अंतरीं. १४
चित्तज्ञ क्षितिपाल हा चतुर ही सिंहासनीं जैं बसे,
बापानंतर, लोक मानिति जया प्रत्यक्ष विष्णू असें;
जे सामादि उपाय चार असती, तींहींच चाऱ्ही दिशा,
जिंकोनी नरपाळ हा मिळविता झाला विशुद्धा यशा. १५
तो गेल्यावरि पारियात्र ह्मणुनी विख्यात त्याचा सुत,
उच्चत्वें जगिं पारियात्रगिरिला जो हाटवी निश्चित;
संग्रामीं रिपु जिंकिले सकळही ज्याणें, तया तत्वतां,
चित्तामाजि धरोनि भाव भजली ती राज्यलक्ष्मी स्वतां. १६
ज्याचा ऊर विशाल, तेंवि दृढ ही पाषाणपट्टापरी,
जो अत्यंत उदारशील, शिलि तो शोभे धरित्रीवरी;
ज्यानें बाणगणीं अरातिनिचया आयोधनीं जिंकिलें,
होई लज्जित तो तरी जर तया कोणीं नरीं वर्णिलें. १७
ज्याचें चित्त उदार फारचि असे, त्यापारियात्राव्हयें,
पुत्रा देवुनि यौवराज्यपदवी झाला सुखी तो स्वयें;
कां कीं भूप जनाऽवनास करितां कार्यांमुळें आडती,
त्यायोगें सुखसाधनें असुनिही क्लेशा बहू पावती. १८
[स्र.] * मोठा सौंदर्यशाली ह्मणुनि अतिशयें भोग्य नारीजनाला,
भोगोनी इंद्रियार्थी नरपति जरि तो तृप्त नाहींच झाला;

१ तरुण असूनही. २ परहृद्गतार्थ जाणणारा. ३ साम, दान, भेद व दंड असे चार उपाय शत्रूस वश करण्याविषयीं राजाला सांगितले आहेत. ४ पारियात्रनामक पर्वतासारिखा. ५ शिलनामक. ६ शत्रुसमूहा. ७ रणांत. ८ ( कोणी मनुष्यानें त्याची स्तुती केली तर तो लज्जित होई ). ९ जनाचें पालन करीत असतां.

* अथवा ( वरील अर्थाचाच दुसरा श्लोक)—

[शा.वि.] रूपें सुंदर देखुनीच युवती भोगूं जया इच्छिती,
ज्याच्या मानसवृत्ति सर्व विषयां रात्रंदिनीं वांछिती;
ऐसा जो नृपती तयासहि जरा हारीतसे सत्वर,
रत्यर्हा नसतां स्वयें, करितसे जी कां वृथा मत्सर. १९.

तों त्या हारी जरा जे रतिसे जरि नसे योग्य तत्रापि साची,
रत्यर्हा[2] स्त्रीजनातें निरखुनि करिती होय ईर्ष्या वृथाची[3]. १९

[इं.व.] उन्नाभ[4] झाला सुत त्यास पाहे, नाभी जयाची बहु खोल राहे,
विष्णूपरी जो बहु शोभमान, भूपांचिया मंडळित प्रधान[5]. २०

[शा.] त्याला झाला वज्रनाभाख्य पुत्र, इंद्रा ऐसें तेज जाचें विचित्र,
युद्धीं ज्याचा नाद विद्युद्रवाशीं[6], साम्या पावे पाळि तो भूमिकेशीं. २१
गेला जेव्हां भूप हा स्वर्गलोका, त्याचा सूनू[7] बैसला राज्यि देखा;
सेवी ज्याला भूमि ही रत्नजातें[8], ज्याणें युद्धीं मारिलें शात्रवातें[9]. २२

[शा.वि.] तोही शंखणनामधेय नृपती प्रारब्धयोगें [10]दिवीं
गेल्यानंतर राज्यकार्य करिता झाला महा वैभवी;
भूपाळ व्युषिताश्वनामक विभू, नासत्यतुल्याकृती[11],
जो ठेवी हयंयुक्त[12] सैन्य उदधीपाशीं स्वयें निश्चितीं. २३

[व.ति.] विश्वेश्वरास[13] पुजुनी बहुभक्तिभावें,
भूपाल तो तनय विश्वसहाख्य पावे,
जो क्षोणिच्या अवनिंफारचि दक्ष झाला,
लोकीं सुताकृति धरोनि पिताच आला. २४

[शा.वि.] सन्नीतिज्ञ नृपाळ विश्वसह हा जो अर्थिचिंतामणी[14],
त्याला पुत्र हिरण्यनाभ ह्मणुनी विष्णुंश[15] झाला जनीं;
ते दोघे मिळुनी रणीं निजबळें शत्रुप्रती मारिती,
जैसे वायु अणीक अग्नि मिळुनी वृक्षां वनीं नाशिती. २५

---

१ क्रीडेस (योग्य नसे). २ रती करण्यास ज्या योग्य त्या स्त्रियां निरखून वृथा ईर्ष्या करिती झाली असा अन्वय. ३ या राजाला जरा आली म्हणजे तो म्हातारा झाला. एथें जरेवर स्त्रीत्वाचा आरोप करून इतर स्त्रियांच्या ईर्ष्येनेंच जसें काय तिनें त्यास स्ववश केलें स्वतां पाहिलें तर ती रत्यर्हाही नव्हती. अशा चमत्कारानें हें वर्णन केलें आहे. ४ या नांवाचा. ५ मुख्य. ६ विजेच्या शब्दाशीं (साम्या पावे). ७ शंखणनामक. ८ रत्नसमुदायाच्या योगें. ८ शत्रूंतें. १० स्वर्गास. ११ अश्विनीकुमारांसारिखा आकार ज्याचा. १२ ( घोड्यांचें सैन्य समुद्रतीरीं ठेवी ). १३ शिवाचीं प्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगें वेगवेगळ्या ठिकाणीं आहेत, त्यांत जें काशीक्षेत्रांत आहे, त्याला विश्वेश्वर असें म्हणतात. त्या विश्वेश्वराची आराधना या राजानें केली होती. १४ याचकांस इष्ट देण्याविषयीं चिंतामणीसारिखा. १५ विष्णूचा अंश.

होवोनी जनि मुक्त संततिवशें पित्र्या ऋणापासुनी,
अंतीं विश्वसहाख्य भूमिपति तो मोक्षास इच्छी मनीं;
येई वार्धक तों सुतास अपुल्या सिंहासनीं स्थापुनी,
देहा वल्कल वेढुनी नरपती तत्काळ गेला वनीं. २६
ज्यानें यज्ञ विधानयुक्त भुवनीं सोमादि संपादिले,
ज्यानें उत्तरकोसलाख्य विषयां सन्नीतिनें पाळिलें;
ऐशा त्याहि हिरण्यनाभविभुला कौशल्यनामा सुत
झाला, जो नयनांस उत्सव करी चंद्रापरी अद्भुत. २७
ज्याची कीर्ति समस्त वेढुनि मही ती ब्रह्मलोकावधी
गेली, तो विदित क्षितीश्वर असे कौशल्यनामा सुधी,
ज्यानें ब्रह्मविदें विरक्तमतिनें ब्रह्मिष्ठनाम्या सुता,
राज्यीं स्थापुनि अंतकालिं अपुल्या संपादिली ब्रह्मता. २८
वंशा भूषणभूत भूमिपति तो ब्रह्मिष्ठनामा असे,
ज्याची संतति ही जगांत अवघ्या स्तुत्यर्ह झाली असे;
तो राजा असतां, अणूहि महिला बाधा नसे; या गुणें,
आनंदें जनलोचनें भरुनियां येती सदा अश्रुनें. २९
भक्तीनें पितृसेवनें सुबहुलें जो पूज्य झाला असे,
ज्याची आकृति फार सुंदर महा विष्णूप्रमाणें दिसे;
ज्याचे लोचन पंकजच्छदजसे, त्यानेंचि पुत्राभिधें
केला बापहि अग्रगण्य अवघ्या तें पुत्रवंतांमधें. ३०
टाकोनी विषयांस तो सकळिकां येई विरक्तीप्रती,
स्वर्गालागिंच गंतुकाम असता झाला तई भूपती;
संपादूनि नृपाळ आत्मजवशें वंशास्थिती सादर,
न्हावोनी नियमें त्रिपुष्करजलीं झाला स्वयें [13]निर्जर. ३१

१ संततिवशेंकरून पितरांच्या ऋणापासून मुक्त होऊन. २ ज्यानें सोमादि यज्ञ विधानयुक्त (यथाविधि) संपादिले असा अन्वय. ३ देशांस. ४ ब्रह्मलोक म्हणजे ब्रह्मदेवाचा लोक, ज्यास सत्यलोक असें ही म्हणतात. भूमीच्या वरील भागास जे सात लोक आहेत त्यांत हा सर्वांहून वरचा होय. ५ ब्रह्मवेत्त्यानें. ६ ह्या गुणामुळें (हा त्याचा गुण पाहून). ७ कमलपत्राप्रमाणें. ८ अवघ्या पुत्रवंतांमध्यें हाच पुत्रवंत खरा असें यानें बापास केलें. ९ वैराग्य. १० स्वर्गाप्रत (गंतुकाम असता झाला). ११ पुत्रांच्या योगानें. १२ पुष्कर या नांवाचीं जीं तीन तीर्थें त्यांमध्यें ( स्नान करून ). १३ देव.

पुत्रस्त्री[१] तनया पुसीं[२] प्रसवली ती पूर्णिमेच्या दिनीं,
ज्याचा वर्णहि पुष्परागमणिला आत्मीय तेजें जिणी;
बारावे दिवसींच पुष्य[३] अभिधा ज्याला जनें अर्पिली,
तारा[४] ती दुसरी जणूं उगवली पुष्याख्य भूमंडळीं. ३२
तो पुत्राव्हय भूपती स्वतनया पुष्याभिधा तें धरा[५],
देवोनी मुनिजैमिनीस[६] विनयें अर्पोनियां स्वांतरा[७];
त्यापासोनि शिकोनि योग मग तो जन्मूं नये मागुती,
ऐसा हेतु धरोनि योग करुनी मुक्तीस गेला कृती. ३३
पुष्याचा मुलगा ध्रुवोपमितिला[८] पावे जनीं तो सुधी,
जे कां शत्रु नमूनि राहति तयां पीडा न देई कधीं;
त्यांशीं संधि[९] करूनि मोडितें[१०] नसे सत्यप्रतिज्ञ प्रभू,
बापानंतर भूमिपाळ बसला राज्यावरी तो विभू. ३४
एणांच्या[११] नयनासमान नयनें ज्याचीं बहू आयतें[१२],
तो भूमीपतिवर्य[१३] फार मृगयेमाजी असे जो रत;
त्याचा पुत्र सुदर्शनाख्य असतां लाहान चंद्रापरी[१४],
चारू, त्या ध्रुवसंधिलागिं गहनीं मारी जिवें केसरी[१५]. ३५
ऐसा तो ध्रुवसंधिनाम नृपती स्वर्गास गेल्यावरी,
ज्यांना नाथ नसे अशा निरखुनी दीना प्रजा नागरी[१६];
मंत्र्यांनीं तंव एकचित्त करुनी त्या राजपुत्रा त्वरें,
साकेतांत[१७] सुदर्शना बसविलें सिंहासनीं आदरें. ३६
[शा.] बालेंदूनें व्योमिं[१८] शोभे नितांतें[१९], किंवा शोभे बालसिंहें वनांत[२०];
किंवा वारी[२१] पद्मकोशें[२२] विराजे, तैसा हा या बालकें वंश[२३] राजे[२४]. ३७

१ पुत्रनामक राजाची स्त्री. २ पौप मासांत. ३ पुष्य नक्षत्र हें मोठें पुष्टिकारक (वृद्धिकारक) होय असें फलज्योतिषकार म्हणतात. त्या नक्षत्राप्रमाणें हा राजा होता म्हणजे याच्या काळीं सर्व प्रजा सुखसमृद्धीनें युक्त होत्या. ४ नक्षत्र. ५ धरा म्हणजे पृथ्वी हिला देवून. ६ व्यासानें चार वेदांचे चार वेगळे वेगळे शिष्य केले त्यांत ज्याला सामवेद सांगितला तो जैमिनि होय. ७ आपल्या मनाला. ८ ध्रुवाची उपमा. ९ तह. १० शत्रूबरोबर केलेला संधि मोडीत नसे म्हणून त्याचें नांव ध्रुवसंधि होतें. ११ हरिणाप्रमाणें. १२ दीर्घ. १३ श्रेष्ठ राजा. १४ चंद्रापरी चारू (सुंदर). १५ सिंह. १६ नगरवासी. १७ अयोध्येंत. १८ आकाश. १९ अत्यंत. २० वनाचा मध्य. २१ उदक. २२ कमलकोशानें. २३ ( हा वंश म्हणजे रामाचा वंश ). २४ शोभे.

[शा.वि.] त्यानें मस्तकिं रम्य मौलिं[1] धरिला तस्मात् पित्याशीं सम
होईल प्रभु हा, असें निजमनीं तें मानिती सत्तम[2];
जैसा अल्पहि वारिवाह[3] गगनीं वायूप्रती पाउनी,
आशा[4] सर्वाहि वेढितो बहु [5]जवें, हें पाहिलेंसे जनीं. ३८
तेव्हां दिव्य करोनि वेष बसुनी तो बाळ[6] हत्तीवरी,
माहोतीं धरिला जपूनि मिरवे जें[7] राजमार्गीतरीं;
वर्षें पांचसहाच[8] त्यास असती तत्रापि राजा असें,
जाणोनी सकळ प्रजागण तया तैं गौरवी बापसें[9]. ३९
ज्याकालीं नरपाळबाळ अपुल्या सिंहासनीं तो बसे,
तें[10] मोठें, व लघूच हा ह्मणुनियां जागा रिकामी असे;
तत्रापी बहुतेज हेमसंभ[11] तें फांके तनूचें[12] जईं,
तें व्यापूनि[13] उरे तईं सकलही सिंहासनाला तईं. ४०
[व.ति.] सिंहासनावरि बसे जंव तो कुमार,
भेटीस येति नृपती तंव थोरथोर,
लाक्षारसें अरुण वर्ण पदें तयाचीं,
पीठीं[14] न पोंचति अंखूड ह्मणोनि साचीं;
तेव्हां तया मुकुट उंच करोनि [15]चोजें,
ते वंदिती बहुत नम्रपणेंचि राजे,
होते मनीं बहुत नम्र तरी शिरांतें,
उंचाविल्याविण उपाय नसेचि त्यांतें. ४१
[शा.वि.] आहे हो लघु इंद्रनीळ तरिही पाहोनि तेजस्विता,
लोकीं त्यास महामणी ह्मणति हें मिथ्या नसे पाहतां;
तैसा हा नरपाळ बाळ दिसला तेव्हां वयें अल्पही,

---

१ मुकुट. २ साधु पुरुष. ३ मेघ. ४ दिशा. ५ वेगें. ६ राजकुमर. ७ राज्याभिषेकसमयीं हत्तीवर बसवून राजाला नगरांत मिरविण्याचा विधि उक्त आहे त्याला लक्षून हें वर्णन आहे. ८ पांच सहा वर्षांचें वय होतें तरी. ९ अल्पवयी असतांही त्याला बापाप्रमाणें गौरविलें. १० सिंहासन. ११ सुवर्णाप्रमाणें. १२ देहाचें (तेज). १३ त्याच्या देहानें सिंहासन व्याप्त झालें नाहीं परंत त्याच्या तेजानें सर्व सिंहासन व्यापून आणखी पसरलें. १४ राजा सिंहासनावर बसला म्हणजे पाय टेंकावयास पीठ मांडिलें असतें त्या पीठाला त्याचे पाय पोंचत नव्हते. म्हणून राजे लोकांस त्याच्या पायां पडण्याकरितां मस्तकें उंच करावीं लागत. १५ कौतुकें.

त्यालागीं पदवी मृषा नचि असे तेंवी महाराज ही. ४२
ज्याच्या बाजुस सर्वकाळ विमळें सच्चामरें ऊडती,
ज्याच्या सुंदर चंचलेंहि झुलुपें गालावरी शोभती;
ऐसा तो नरपाळबाळ हि वदे आज्ञा स्वकीयें मुखें,
ती [1]आसागरतीर [2]भूमिवलयीं कोणी न मोडूं शके ! ४३
[मा.] क[3]नकघटितपट्टें रम्य यद्भाळ देख,
विमल तिलक जेथें शोभलासे सुरेख;
निजरिपु[4]वनितांचीं भालपट्टें विशालें,
ति[5]लकरहित केलीं याचि भूमीशबाळें. ४४
[शा.वि.] ज्याची कोमल अं[6]गयष्टि ह्मणुनी जो भूषणानींच रे !
भारीं पावतसे सुदर्शनविभू क्लेशास, हें तों खरें;
तत्रापी क्षिति[7]कार्यभार अवघा तो वेइ माथ्यावरी,
ऐसा भूमिपती नसेचि दुसरा साऱ्याहि भूमीवरी. ४५
हा पाटीवर अक्षरें शिकतसे तों थोर विद्वज्जन,
याचे सान्निध राहती सतत जे तद्योग या होउन;
आली नाहिं लिपी तरीहि सकला सन्नीतिच्याही फला,
भूमीपाळकबाळ हा सुमतिमान् अल्पश्रमें पावला. ४६
[इं.व.] "हा भूपती संप्रति बाल आहे, मातें बसाया [8]उर दीर्घ नोहे,
पावेल हा प्रौढ दशेस जेव्हां, आलिंगण्या योग्य दिसेल तेव्हां;"
[शा.] लाजोनीयां श्री असें ती मनानें, छत्राचीया [9]साउलीच्या मिषानें,
आलिंगी त्या बालभूमीपतीला, ऐसी वाटे कल्पना तें जनाला. ४७
[पृ.] [10]युगोपम जरी नसे भुज अजून त्याचा स्वतां,
न ज्यास पडले वण प्रकट [11]मौर्विचे तत्वतां;
न खड्ग धरिला असे, तरिहि पालन क्षोणिचें,
[12]भुजें करि तयेंचि हा शिशु ह्मणोनि लोकां [13]रुचे. ४८

१ समुद्रतीरापर्यंत. २ सर्व पृथ्वीत. ३ सोन्याच्या पट्यानें. ४ शत्रूंच्या स्त्रियांचीं. ५ ( अर्थात् विधवा केल्या ). ६ आंगकाठी. ७ पृथ्वीचा कारभार ( याचें ओझें ). ८ वक्षस्थळ. ९ राजछत्राची छाया लक्ष्मीच असते असी प्रसिद्धि आहे. ( असें टीकेंत आहे). १० जुगासारिखा (भुज). ११ मनुष्याच्या दोरीचे (वण). १२ त्याच भुजानें. १३ आवडे.

न केवल शरीर त्या नृपतिचें तई वाढलें,
परी गुण कुलक्रमागतहि वृद्धि[1]ला पावले;
मुळीं बहुत सूक्ष्म तद्वपु तसेचि त्याचे गुण,
बरोबर अशा रिती सहज पावले वर्धन. ४९

[शा.वि.] केला मागिल जन्मि फार नियमें अभ्यास ज्यांचा पुरा,
त्या विद्या स्मरणा[2]सवें गुरुमुखें येती धरा[3]धीश्वरा;
वेदांचें त्रय जें त्रिवर्ग[4]फलद, प्रख्यात शास्त्रें भलीं,
तैशा[5] तो निज तीव्रबुद्धिविभवें साऱ्या प्रजा आकळी. ५०
विस्तारी[6] वरचा विभाग तनुचा तो मानसें निर्भयें,
केशांचा बुचडा कसोनि उजव्या जानूस दाबी स्वयें;
डाव्या हातिं धनू धरोनि नृपती आकर्ण ओढी शर,
ऐसा शोभतसे[7], शिके जंव धनुर्विद्येस तो सादर. ५१

[स्र.] नेत्रांना पेय ऐसें मधुच युवतिंच्या, तेंवि कामस्वरूप,
वृक्षाचें पुष्प शोभे, अनुरति[8]लतिकेलागिं जें पत्ररूप;
सर्वांगव्यापि भूषा रुचिरतर अशी होय जें कां स्वभावें,
भूपाळाचा कुमार प्रथितगुण अशा यौवनालागिं पावे. ५२

[शा.वि.] राजांच्या मुलिंच्या अर्धी तसबिरी [10]दूतिव्रजें दाविल्या,
त्यांपेक्षांहि सुरूप भूपतनया तैं मंत्रिनीं आणिल्या;
लक्ष्मी आणि धरा[11] अशा उभयतां होत्या जरी त्या स्त्रिया,
संतानार्थचि बायका करुनियां त्यांनीं दिल्या त्या तया. ५३

---

**या प्रकारें श्रीकालिदासकृत रघुवंशनामक महाकाव्याच्या गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत प्राकृतपद्यात्मक भाषांतरांतील हा वंशानुक्रमवर्णननामक अठरावा सर्ग समाप्त झाला असे.**

---

१ वृद्धि. २ स्मरण होतांच. ३ राजाला. ४ धर्मार्थ कामरूप फल देणारें. ५ वेदत्रय व शास्त्रें यांतें जसा आकळी त्याच प्रकारें प्रजाही आकळी म्हणजे स्वाधीन करी असा अन्वय. ६ विस्तारयुक्त करी. ७ धनुर्विद्या शिकतांना त्याच्या शरीराची स्थिती जसी होतसे त्या स्थितीचें या श्लोकांत वर्णन केलें आहे. ८ अनुरागरूपवल्लीला. ९ ( युवतिनेत्रपेय असें मधूच, कामरूप वृक्षाचें पुष्पच अनुरागवल्लीचें पत्रच, सर्वांगव्यापी असा अलंकारच असें जें यौवन त्या यौवनातें राजपुत्र पावता झाला ). १० दूतींच्या समुदायानें. ११ पृथ्वी.

## सर्ग एकोणिसावा.

श्लोक.

[शा.वि.] जो तेजें ज्वलनासमान गमला त्या अग्निवर्णा सुता,
ज्ञानिश्रेष्ठ सुदर्शनक्षितिपती स्थापूनि राज्यीं स्वतां;
साधाया परमार्थ वार्धक दशेमध्यें भवांच्या भयें,
गेला सर्व ममत्व सोडुनि वनीं तो नैमिषाख्यीं स्वयें. १

क्रीडेच्या विहिरी तिथें विसरला तो पूततीर्थोदकें,
दर्भाच्छादित भूमिनीं विसरला मोठे बिछाने निके;
पर्णाच्या उटजांप्रती समजला तो राजसद्मापरी,
टाकोनी फलवासना, नरपती ऐशा तपाला करी. २

[पृ.] रिपुव्रज जिणूनियां सकलभूवधू आयती,
प्रसाधितचि देतसे नृपति आत्मपुत्राप्रती;
ह्मणोनि सहजें तिच्या करुनि पालना संतत,
यथेष्ट नृपपुत्र तो तिस सुखें असे भोगित. ३

[शा.वि.] मोठा कामुक अग्निवर्ण नृपती बैसोनि गादीवरी,
कांहीं काळ करोनि राज्य, मग दे मंत्र्यांचिया तें करीं;
होता तो तरणा ह्मणोनि विविधक्रीडा स्त्रियांच्या सवें
कीजे, यापरि वासना दृढ मनीं त्याच्या तईं उद्भवे. ४

त्यानें मेळविली विलास करण्यासाठीं वधूमंडळी,
सारंग्या तबले तशींच दुसरीं वाद्यें सुरू जाहलीं;
तेव्हां उत्सव उत्तरोत्तर असा सर्वप्रकारें चढे,
कीं जो थाट अजी तयाहुनि उद्यां जास्ती घमंडी उडे. ५

---

१ अग्नीसारखा. २ संसाराच्या ( भयानें ). ३ कुरुदेशाजवळ एक मोठें नामांकित अरण्य आहे त्यास नैमिषारण्य असें म्हणतात. याच अरण्यांत सूतानें शौनकादिक ऋषींप्रत पुराणें सांगितलीं. हें स्थळ मोठें पवित्र आणि येथें कलिकालाची बाधा होत नाहीं असें पुराणांत वर्णिलें आहे. हें स्थळ सांप्रत लखनौ प्रांतांत आहे असें सांगतात. ४ स्वकीय राजधानींत असतां जशा क्रीडेच्या विहिरी तशीं अरण्यांत तीर्थें, घरीं जसे बिछाने तसी वनांत दर्भाच्छादित भूमी, नगरांत असतां जसे राजवाडे तशी एथें पानाची झोंपडी, याप्रमाणें तपश्चर्या करीत असतां या राजाला झालें. ५ पवित्र तीर्थांच्या उदकानें. ६ वैरिगण. ७ पृथ्वीरूप स्त्रीच. ८ ( निष्कंटक केलेली पक्षीं अलंकृत ).

राजाला विषयाविणें क्षणभरी ही राहवेना तदा,
एकांतीं वनितागणासह रमे तो भूपती सर्वदा;
व्हावें दर्शन आपणा नृपतिचें ऐसी जरी वासना
होती पौरजना, तरी नरपती तो त्यास भेटेचिना. ६

[रथो.] मंत्रिवर्ग वळवी जरी तया, आत्मदर्शन जनास द्यावया,
बारितून[1] पद मात्र दाखवी हेंचि दर्शन ह्मणोनि सूचवी. ७

[शा.] प्रातःकालीं बालसूर्यप्रकाशें, होवोनीयां स्पष्ट जें का विकासे,
शोभेचें ज्या मानिती मुख्य सद्म, जें नेत्रांतें सौख्य दे रम्य पद्म;
त्या पद्माचें पावला साम्य साचें, आरुण्यानें आपुल्या जो[2] नखाचे,
त्या पादाला वंदुनी भृत्यलोक[3] पृथ्वीनाथा सेविती सर्व देख. ८

[इं.व.] स्तनावघातें[4] तरुणीजनाच्या, पंक्ती जिथें हालति पंकजांच्या,
तैशाचि ज्याच्या रतिगेहपंक्ती[5], यत्तोययोगें[6] बहु गुप्त होती;
त्या वापिकेमाजि शिरोनि भूप, स्त्रियांसवें केलि[7] करी अमूप[8],
त्या केलियोगें निजमानसाला, आनंद त्याच्या बहुसाल झाला. ९

[शा.वि.] गेलें काजळ नेत्रिचें जळवशें, लाली तशी ओष्ठिची,
गेली सर्व धुपून, गर्दि जंव ती चाले बहू केलिची;
तें औपाधिक[9] कांति गेलि मुखिची, स्वाभाविकी राहिली,
त्या योगेंहि नृपाळवृत्ति वधुंनीं[10] पूर्वींहुनी मोहिली. १०

ज्यांना फार सुगंध येइ असलीं मद्यें जिथें शोभती,
त्या पानस्थलिं शीघ्र जाइ वनिता घेऊनि तो भूपती;
रम्या पुष्पित पद्मिनीप्रति वशा[11] घेऊन जातो करी[12],
त्याची[13] या नरपाळकास उपमा तें योग्य वाटे खरी. ११

भूपानें दिधला मुखासव पिती त्या अंगना हौसिनें,
तोही प्रीतमनेंचि पान करि तें जो त्या दिला स्त्रीजनें;
जैसा कां बकुलाख्यवृक्ष वनितादत्ताऽऽसवा वांछितो,
तैसा भूप वधूगणा[14] र्पित अशा मद्या तईं इच्छितो. १२

---

१ खिडकींतून. २ (जो पाद आपल्या स्वकीय नखांचे आरुण्यानें ह्म० लालीनें पद्माचें साम्य पावला) असा अन्वय. ३ चाकर लोक. ४ स्तनाच्या आघातानें. ५ क्रीडागृहांची पंक्ती. ६ ज्या वापिकांच्या पाण्यानें. ७ क्रीडा. ८ पुष्कळ. ९ अस्वाभाविक. १० स्त्रियांनीं. ११ हत्तीणीला. १२ हत्ती. १३ त्या हत्तीची. १४ स्त्रियांनीं दिलेल्या सुरेला.

उत्संगावरि बैसुनी नृपतिच्या क्रीडावयालागुनी,
त्याकाळीं नृपतीस योग्य गमल्या या मात्र दोघीजणी;
वीणा चित्तहरस्वरा व वनिता मंजुस्वना तत्वतां,
या अंकीं बसती सदा नृपतिच्या, राहो न देती रितीं. १३
सोन्याचीं कटकें करांत हलती, माळा फुलांच्या गळीं,
वाद्यें वाजवितां स्वयें नरपती तालावरी चांगलीं;
नृत्याच्या समयीं अणूहि चुकतां भावामधें नर्तकी,
त्यांतें शिक्षक सन्निधानि असतां तो लाजवी भूप कीं. १४
नृत्याच्या बहुत श्रमें निपजल्या घर्मांबुनें तत्क्षणीं,
भालींचा तिलकांक नर्तकिचिया गेला असें पाहुनी;
प्रेमें फुंकुनि आननास नृपती चुंबीतसे सादर,
या सौभाग्यवशें तयें हटविले यक्षेशदेवेश्वर. १५
कांहीं देखुनि वस्तु नूतन जरी तो सेवि तीतें पती,
"झाला तृप्त तरी न इच्छिल अम्हां," घेवोनि ऐसी भिती;
अर्धा भोगहि जाहला न, तंव त्या तत्काळ वेगें स्त्रिया,
तेथूनी अपुल्याकडे वळवुनी त्या आणिती राजया. १६
जातां आवडत्या त्यजोनि दयिता वंचूनि त्या भूपती,
शिक्षा तत्क्षणिं कोपुनी करिति त्या भूपास ऐशा रिती;
अग्रीं अंगुलिच्या तिरस्कृति, तसें वक्रेक्षणें वीक्षणें,
वारंवार धरोनि त्यास करिती त्या मेखलीं बंधन. १७

१ विलासी पुरुष स्त्रियांबरोबर क्रीडा करीत असतां मद्यपान करितात तेव्हां पुरुषानें मद्याचा प्याला आपले मुखाला लावून थोडें मद्य आपण पिऊन अवशिष्ट स्त्रियांस पिण्यास द्यावें, स्त्रियांनीं ही आपलें उच्छिष्ट मद्य आपल्या प्रियास द्यावें असा संप्रदाय काव्यादिकांत आढळतो त्याला अनुसरून हें आसवपानाचें म्हणजे मद्यपानाचें वर्णन आहे. आणि तरुण स्त्रीनें मद्याचा चूळ तोंडांत घेऊन तो बकुल वृक्षाच्या बुंधावर टाकिला असतां त्याला तत्काळ फुलें येऊन तो प्रफुल्लित होतो, असा कविवर्णनसंप्रदाय आहे; त्याला अनुलक्षून या श्लोकांत राजाला बकुलवृक्षाचा दृष्टांत दिला आहे. २ मनोहरस्वरा (वीणा ही एक). ३ मंजुलस्वरा (वनिता ही दुसरी). ४ रिकामा (अंक न राहों देती). ५ कडीं. ६ नाचाच्या. ७ नाचणारिणींच्या. ८ त्या राजानें. ९ मागें टाकले. १० कुबेर व इंद्र. ११ त्या आवडत्या स्त्रियांस वंचून जातां राजाला. १२ यापुढें सांगीतलेल्या शिक्षा करीत असत. १३ बोटांनीं तिरस्कार. १४ भिवया चढवून वक्रदृष्टीनें. १५ अवलोकन. १६ वारंवार मेखलांनीं बंधन.

बुद्ध्या आडवसे नृपाळ रतिच्या रात्रीं तईं त्याचिया,
दूतीशीं विरहातुरा वदति त्या काकूळतीनें स्त्रिया;
कीं त्यां[1] भेटवुनी प्रियास अमुचें रक्षा गडे जीवेन[2],
ऐसी ऐकुनि दीनवाणि, विभुचें संतोष पावे मन. १८

राण्यांच्या सह संगमांत असतां भूमीपती निश्चित,
झाल्या दुर्लभ नर्तकी ह्मणुनि तो होवोनि उत्कंठित;
स्वेदें[3] अंगुलितूनि खालिं निसरे काडी, तरी काढुन,
त्यांचें चित्र जसें तसें करितसे तो जीवसंधारण. १९

प्रेमें गर्वित जाहल्या सवति त्या तो द्वेष वागे मनीं,
झाला कामहि दीप्त फार, असल्या या दोनही हेतुंनीं;
ऐसा टाकुनि त्यांस[4] नेउनि घरीं कामोत्सवाचे मिसें,
राण्या साधुनि घेति कार्य अपुलें जें धारिलें मानसें. २०

प्रातःकाळिं नृपाळ येउनि घरीं भेटे स्त्रियांलागुनी,
होती खिन्न मनीं तनूस रतिचीं चिन्हें बहू देखुनी;
सांत्वी सादर त्यांस तो पडुनियां त्यां[5] नर्तकींची स्मृती
सोडी सांत्वन, ही कृती बघुन त्यां[6] तापा पुन्हा पावती. २१

स्वप्नीं वृत्त वदे जईं नृप सपत्नींचें तईं त्याप्रती,
तोंडानें नच्चि बोलतां कृतिवशें धिक्कारिती यांरिती[7];
अश्रू गाळुनि चादरीवरि वधू त्या बांगड्या फोडिती,
क्रोधें पाठ नृपाकडे करुनियां तें दूरही नीजती. २२

दूती भूमिपतीप्रती सविनया नेती लतामंदिरीं,
पुष्पांचीं शयनें जिथें रचियलीं उत्तुंग[8] मंचांवरी[9];
स्वीयांतःपुरिच्या जनास भिउनी कांपे जरीं अंतरीं,
भोगी भूप यथेष्ट रात्रि नटकी बोलाउनी सत्वरी. २३

"जी कां इष्ट तुह्मा, तिचीच अभिधा मातें मिळाली तरीं,
तीचें भाग्य मिळो ह्मणोनि निपजे वांछा मला अंतरीं;

१ त्या प्रियास. २ जीव. ३ घाम आल्यामुळें बोटांतून काडी निसरे तरी त्या काडीनें त्यांची तसबीर जसी तसी कष्टानें काढून तो आपला प्राण वांचवी असा अर्थ. ४ राजास. ५ त्या राजाला. ६ ज्यांचें सांत्वन राजानें आरंभिलें होतें त्या स्त्रिया. ७ पुढें सांगितल्याप्रमाणें. ८ उंच. ९ पलंगांवर.

लोभाविष्टपणा मना किति बरें माझ्या[1] !" असें भूपती,
नांवातें चुकतां स्त्रिया नरपतीलागीं तईं बोलती. २४

आली चादरिला गुलाल शिरिंचा लागोनि लाली भली,
माळा ही चुरडोनि गेलि, कटिची सन्मेखला मोडली;
लाखेचा रसही तिथें दिसतसे; या व्यक्त चिन्हामुळें,
भूपें भोगियल्या स्त्रिया परिपरी[2] हें स्पष्टतेनें कळे. २५

पायांला अलिता स्वतां नरपती लावी स्त्रियांच्या जईं,
त्याचें व्यग्र बहूत होय मन तें न स्वस्थ राहे तईं;
कां कीं, रम्य नितंबयुक्त जघनें जेथील वस्त्रें ढिलीं,
झालेलीं निरखून तें नृपतिची दृष्टी बहू वेधली. २६

जाई[3] चुंबन द्यावयास तंव त्यां मागें मुखा सारिती,
[4]नीवीला कर घालितांचि हिसका त्याला बळें मारिती;
ऐसे सर्व निवृत्ति हेतु असतां स्त्रीसंगवांछा तया,
त्याकाळीं उलटी प्रवृत्त करिती झाली बहू राजया. २७

[5]एकांतीं प्रियकामिनी बसुनियां अंगावरी रम्य तीं,
चिन्हें जीं रतिचीं सुदर्पणतलीं पाहावया लागती;
तेंव्हां मस्करिसाठिं पाठिसि उभा राहोनि हास्या करी,
त्याचें तें प्रतिबिंब देखुनि वधू त्या लाजती अंतरीं. २८

* रात्रीच्या अवसानिं[6] भूप शयनांतूनीं उठे तो जईं,
नारींचा समुदाय भूमिपतिला प्रार्थी असें तो तईं;
कीं, "हे नाथ पदद्वयास अमुच्या ठेवोनि पायांवरी,
कंठा वेष्टुनि बाहुनीं दृढ अम्हां द्या चुंबना सत्वरी." २९

राजा यौवनशालि तो तनुवरी[7] भूपालवेषा[8] धरी,
आदर्शांत विलोकि जों स्वतनु ती इंद्राहुनी गोजिरी;

---

१ माझ्या मनाला हा केवढा लोभाविष्टपणा बरें. ( असा अन्वय ). २ नानाप्रकारांनीं ( हे प्रकार टीकेंत स्पष्ट केले आहेत ). ३ स्त्रिया. ४ लुगड्याच्या गांठीला. ५ ( प्रिय स्त्रिया एकांतीं बसून अंगावर उठलेलीं चिन्हें दर्पणांत पाहावया लागती, तेव्हां आरशांत राजाचें प्रतिबिंब पाहून लाजती असा अर्थ). * "प्रातःकाळिंच भूमिपाळ" असें पाठांतर. ६ अंतीं. ७ अंगावर. ८ राजवेषा.

तैसा तोष न होय चित्तकमलीं तैं भूपतीला तया,
जैसा होय वपूवरील रतिच्या चिन्हांस देखोनियां. ३०

मित्राच्या करितां ह्मणोनि नृपती बाहेर तो जावया,
होई सिद्ध, तई तयास वदती नारी त्यजोनी भया;
"हे अत्यंत शठा, अह्मी समजलों जाशी पळोनी खरें,"
ऐसें बोलुनि त्या कचीं धरुनियां आकर्षिती त्या करें. ३१

भूपाच्या बलवद्रतिश्रमवशें जैं ग्लान होती स्त्रिया,
विश्रांत्यर्थ भुजांतरीं निजुनियां आलिंगिती त्या प्रिया;
जी, शोभे विभुच्या विशाल सुभगा वक्षस्थलाच्या तटीं,
ती जाई कुचघर्षणें निघुनियां तैं चंदनाची उटी. ३२

रात्रीं गुप्त फिरे जना न कळतां रत्यर्थ भूमीपती,
दूती शोधुनियां तई नृपतिला नारीप्रती दाविती;
त्याला होउनि आडव्या पथि वधू, "हे कामुका यापरी,
चोरोनी फिरसी कुठें" वदुनि हें ओढून नेती करीं. ३३

[शा.] नारीस्पर्शें सौख्य पावे नितांत, ज्योत्स्नायोगासारिखें भूमिकांत,
रात्रीं जागे वासरीं घेई झोंप, ऐसा पावे कैरवौपम्य भूप. ३४

[शा.वि.] झाले सक्षत ओष्ठ अग्ररदनीं, मांड्या नखांनीं तशा,
पावे आणिक तंबुऱ्या मग तयां दुःखा न देती कशा?
ऐसें आत्मविलोकनें सुचविती राजास गाणारिणी,
नेत्रांची छवि तीहि मोहित करी भूमीपतीलागुनी. ३५

गाणें नृत्य व भाव ही शिकवुनी वारांगनातें स्वतां,

---

१ अंगावरील रतिचिन्हें आरशांत पाहून राजाला जसा आनंद झाला तसा इंद्रापेक्षांही सुंदर असें आपलें रूप पाहून झाला नाहीं असें श्लोकतात्पर्य. २ मित्रकार्यार्थ म्हणून तो बाहेर जावयास लागला असतां अरे शठा, तूं पळून जातोस असें म्हणून त्या त्याला केश धरून ओढिती असा भाव. ३ वक्षस्थलीं. ४ अत्यंत. ५ चांदिण्यानें सुख होतें तसें. ६ राजा. ७ रात्रीं जागरण व दिवसा निद्रा यामुळें चंद्रविकासी कमलांची उपमा भूप पावे असा अर्थ. ८ क्षतयुक्त. ९ पुढल्या दांतांनीं. १० ओष्ठाप्रमाणें सक्षत. ११ सनईसारिखीं तोंडानें वाजविण्याचीं वाद्यें ( आलगुजी ). १२ ओठांला ( पांवे ) आणि मांड्यांना ( तंबुऱ्या ).

एकांतस्थळिं त्यां सुशिक्षित करी कौतूहलें[1] तत्वतां;
मित्रांसन्निध आणवोनि मग त्यां दावोनि त्यांचा गुण,
एणें इच्छि पराभवूं सुकुशलां तो शिक्षकांलागुन. ३६

[भु.प्र.] कुड्यांच्या फुलांच्या सुमाळा गळ्यांत, कळंबागॅजानें[2] तनू ज्याचि कांत
असा वृष्टिकाळीं करी तो विहार, कृतीच्या नगीं[3] नाचती जेथ मोर. ३७

[शा.वि.] प्रेमाच्या कलहें रुसूनि निजल्या जैं पाठमोऱ्या स्त्रिया,
त्यांची तैं समजाविशी न करणें हें योग्य वाटे तया;
तो मानी मनिं कीं, 'अतां भिउनियां मेघांचिया गर्जिता,
आपोआप मिठ्या गळ्यांत मम हो या घालतील स्वतां.' ३८

[भु.प्र.] हिमाची व्यथा ती न व्हावी ह्मणोनी, गृहें झांकिलीं नूतनां चांदव्यांनीं,
शरद्रात्रि तो स्त्रीरतीच्या श्रमाला, हरी भूपती सेवुनी चांदिण्याला. ३९

[शा.वि.] हंसाली[4] रशना[5] जिला[6], पुलिन[7] ही जीचें नितंबस्थल,
ऐसी ती सरयू मनोहर जिचें वारीच वस्त्रांचल;
कांतेचा अनुकार[8] ती करितसे, जाणोनि ऐसें मनीं,
* सौधाच्या खिडकींतुनी नृप तिला पाहे उभा राहुनी. ४०

हेमंतीं उपयुक्त वस्त्रनिवहीं, शब्देंहि वस्त्रांचिया,
पट्टयांनीं कटिच्या, तसा परिमळें कस्तूरिधूपाचिया[9];
आकर्षी वनितासमूह सुभग क्षोणीपतीला त्वरें,
[10]जो सोडोनि निऱ्या बहू अवडिनें बांधी स्वकीयें करें. ४१

ज्यांच्या अंतरिं वायुचा लव नसे ऐशा गृहाभ्यंतरीं,
ज्यांचीं निश्चल दीपरूप नयनें तेजें बहू साजरीं;
यावन्मैथुनभेद[11] सेवन करायाला सुयोग्या तशा,
त्या झाल्या शिशिरीं[12], नृपाळरतिच्या[13] साक्षी प्रशस्ता निशा. ४२

* आम्राला मलयानिलें नवदलें[14] मोहोरही नूतन,

---

१ कौतुकानें. २ कळंबाच्या फुलांतील रजानें. ३ कृतीनें केलेल्या डोंगरावर. ४ हंसाची पंक्ती. ५ मेखला. ६ ज्या सरयूला. ७ वाळवंट. ८ अनुकरण. * 'वाड्याच्या' असें पाठांतर. ९ कस्तूरीच्या धूपाच्या ( परिमळें). १० जो क्षोणीपती ( राजा ) जो राजा आवडीनें स्त्रियांच्या निऱ्या आपल्या हातानें सोडून बांधीतसे असा अर्थ. ११ मैथुनाचे सर्व भेद. १२ शिशिर ऋतूंत. १३ राजाच्या क्रीडेच्या ( साक्षी ). * 'आंब्याला' असें पाठांतर. १४ नवीं पानें.

आला, देखुनियां [1]वसंतसमयीं रोषास त्या टाकुन;
सोसेना [2]प्रियविप्रयोग म्हणुनी होवोनि अत्यातुरा,
भूपाला स्वयमेव त्या विनविती जोडोनि दोनी करा. ४३

अंकीं घेउनियां प्रिया नरपती [3]दोलेवरी बैसुनी,
घे झोंके जंव रज्जु सोडुनि बहू तो सेवकाहातुनी;
भीतीचेनि मिषें बळें कवळिती भूपास त्या बाहुंनीं,
ऐसें तो [4]वनितास्वयंकृतभुजाश्लेपास भोगी जनीं. ४४

उंचा चंदन घांसुनी स्तनयुगालागीं उन्हा लाविती,
मोत्यें गुंफुनि भूषणें सुरुचिरें आंगावरी घालिती;
रत्नांनीं युत मेखला स्वजघनीं, सौख्यावहा बांधिती,
ऐसा वेप करोनि कामिनि तया [5]ग्रीष्मीं नृपा सेविती. ४५

[भु.प्र.] [6]फुलें पाटलाचीं नवीं आम्रपानें, करीं घालुनी तो करी मद्यपानें;
कमी काम जो ग्रीष्मकालीं स्वभावें, अशानें नृपाचा बहू वृद्धि पावे. ४६

[शा.वि.] कामाधीन असा नृपाळ असतां कामें दुजीं सोडुनी,
झाला इंद्रियलालनीं रत सदा तो भूपचूडामणी;
एकैका ऋतुचे विलास असती जे वेगळे वेगळे,
ते भोगोनि नरेश्वरें ऋतु सहाही या रिती काढिले. ४७

कामें मत्त असा *तरी न नृपती त्याच्या वरी ऊठले,
कां कीं हा बलवान् असें समजुनी ते भीतिला पावले;
झाला ग्लान परंतु भूपति [7]गदें [8]स्त्रीसंगजन्यें तसा,
होई क्षीण [9]कलानिधी अतिशयें तो [10]दक्षशापें जसा. ४८

स्त्रीमद्यादि कुपथ्य वैद्य जरि त्या सोडावया सांगती,
होई त्या अपकार दृष्ट, तरि तो ऐकेचिना भूपती;
संसारांत मनुष्य [11]गोडविषयीं जो आकळीला असे,
[12]त्यांपासोनि तया पुन्हा वळविणें हें कृत्य सोपें नसे. ४९

---

१ वसंत ऋतूंत. २ प्रियांचा वियोग. ३ हिंदोळ्यावर ( बसून झोंके घेई ). ४ स्त्रियांनीं आपण होवोन दिलेलें आलिंगन यास ( भोगी ). ५ ग्रीष्मकालीं. ६ पाटलाचीं फुलें आंब्याचीं पानें हातानें मद्यांत घालून तो पान करी. * 'तथापि न अरी' असें पाठांतर. ७ रोगानें. ८ स्त्रीसंगापासून झालेल्या ( गदें ). ९ चंद्र. १० दक्षाच्या शापानें. ११ स्वादू विषयांनीं. १२ त्या दुष्ट विषयांपासून.

झालें तोंड फिकें, तसा स्वर निघे तें [1]क्षीण कंठांतुनी,
घाली अल्पचि भूषणें, गमनही यष्ट्याेदि[2] आलंबुनी;
होती स्त्रीविरही नरास असलीं जीं कां जनीं लक्षणें,
तीं झालीं तंव अग्निवर्णनृपतीलागीं क्षयव्याधिनें. ९०

दर्शाचे समयीं क्षयिष्णुविधुनें आकाश तें कीं जसें,
ग्रीष्मीं तोय सुकूनि पंकचि उरे ज्यांचा[3] तळें तें जसें;
ज्योती फारचि सूक्ष्म होउनि पहा चाडें दिव्याचें जसें,
तैसा राघववंश या नृपतिच्या योगें जनाला दिसे. ९१

[मा.] गडबड जंव कांहीं भूपतीची दिसेना,
प्रकृतिविषयिं त्याच्या येइ शंका प्रजांना;
"करि जपतप गुप्तस्थानिं पुत्रार्थ थोर,"
करिति कथुनि ऐसें मंत्रि शंकेस दूर. ९२

[शा.वि.] त्या भूमीपतिला अनेक वनिता[4] होत्या तरी संतती,
लोकीं तो नृप विद्यमान असतां झाली न एकीप्रती;
वैद्याचें बळ खुंटलें क्षयगदें ऐसी तनू व्यापिली,
कीं, दीपा[5] पवनें तशी नृपतिला तेणें अवस्था दिली. ९३

[शि.] असा स्वर्गीं गेल्यावरि नृपति रोगोपशमनीं[6],
असे कांहीं शांती, प्रकट असि वार्ता उठउनी;
गृहाऽरामीं[7] मंत्री दहन तनुचें गुप्तरितिनें,
पुरोध्याच्या[8] हस्तें करिति तंव अंत्येष्टिविधिनें. ९४

[शा.वि.] ज्ञाते पौर व मंत्रिवर्ग अवघे एकत्र ते जाहले,
आहे गर्भवती नृपाळमहिषी चिन्हीं तिहीं जाणिलें;
तेव्हां ती शुभगर्भलक्षणवती भूमीपतीची प्रिया,
राज्यश्रीप्रति पावली झटकरी त्या सार्वभौमाचिया.[9] ९५

१ ( हें स्वराचें विशेषण ). २ काठीवगैरे. ३ ज्या तळ्याचा. ( पंक म्ह० चिखल मात्र उरतो तें तळें जसें ). ४ स्त्रिया. ५ दिव्याला वारा जशी अवस्था देतो ह्मणजे मालवून टाकितो तसें क्षयरोगानें त्यास केलें ( नाहींसें केलें ). ६ ( रोगाचें शमन करणारी असी कांहीं शांती आहे म्हणून वार्ता उठवून वाड्यांतल्या बागांतच त्याचें दहन केलें असा भाव). ७ वाड्यांतील बागांत. ८ उपाध्यायाच्या. ९ सार्वभौम राजाच्या राज्यश्रीप्रत पावली असा अन्वय.

भर्त्याच्या विरहामुळें अतिशयें शोकार्त झाली प्रिया,
तन्नेत्रोष्णजळें बहूत निपजे संताप गर्भा तया;
स्वर्णाचे घट शीतवारियुत जे तींहीं महा उत्सवें,
झाला जैं अभिषेक, तैं सकळ तो संताप त्याचा निवे. ५६

[मं.क्रां.] होवो काळीं प्रसव ह्मणुनी इच्छिती लोक सारे,
[1]त्यांतें श्रेयस्कर बहु असें बीज पोटांमधें रे;
वर्षाकाळीं जसि वसुमती, त्यापरी राजपत्नी,
गर्भा दिव्या उदरिं धरि, ज्या रक्षिती सर्व यत्नीं. ५७

[शा.वि.] शोभे [2]श्रीयुत ती नृपाळ[3]महिषी तैं [4]भर्तृसिंहासनीं,
मोटे वृद्ध व [5]बुद्धिवंतें असल्या युक्ता सदा मंत्रिनीं;
पाळोनी अवघ्या प्रजा [6]नयवशें ठेवी तयां तोषित,
चाले [7]शासनही तिचें सकल भू गोलांत [8]अव्याहत. ५८

---

ज्याचा तात असे सदाशिव कृती माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें गणेश अभिधा लेले उपाख्याहि ती,
त्यानें ज्या रघुवंश नाम रुचिरा काव्यास यत्नें महा
केलें प्राकृत सर्ग त्यांतिलच हा एकूणिसावा पहा. ॥ १ ॥

**इति कालिदासकृत रघुवंश नामक महाकाव्याचा गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत मराठी पद्यात्मक भाषांतरांतील अग्निवर्णशृंगारवर्णनात्मक एकूणिसावा सर्ग समाप्त झाला असे.**

---

१ पृथ्वी पोटामध्यें लोकहितकर जसें बीज धारण करते तसी राणी दिव्य गर्भ उदरांत धरती झाली. २ लक्ष्मीयुक्त. ( ग्रंथाच्या शेवटल्या सर्गाचें हें शेवटील पद्य ह्मणून हा श्रीशब्द एथें मंगलार्थही होय असें जाणावें. ) ३ राजपत्नी. ४ नवऱ्याच्या सिंहासनावर. ५ ह्मातान्या व बुद्धिमान अशा मंत्र्यांनीं युक्त. ६ नीतीच्या योगानें. ७ आज्ञा. ८ अकुंठित.

## ग्रंथकर्त्याची प्रार्थना.

### श्लोक.

[स्र.] आर्यावर्तांत झाला, कवि मुकुटमणी कालिदासाख्य ज्याची,
सत्कीर्ती भूमिगोलावरि फडफडते, जेंवि शुभ्रा ध्वजाची;
त्यानें वंश क्रमानें रघुनरपतिचा वर्णिला संस्कृतांत,
त्या काव्यालागिं लोकीं बुधजन गणिती श्रेष्ठ काव्यव्रजांत. १

[शा.वि.] ज्याचा तात असे सदाशिव सुधी माता सती पार्वती,
गांव त्र्यंबक हें गणेश अभिधा लेले उपाख्याहि ती;
त्यानें संस्कृत काव्य तें उतरिलें भाषांतरीं प्राकृती,
दोषां टाकुनि याचिया गुणलवा घेवोत ते जे कृती. २

[व.ति.] दोषांकडे नचि विलोकुनि मत्कृतीस,
स्वीकारितील जरि पंडितवर्य तीस;
जावोनि शीण अणखीहि असेच कार्य,
कीजे असें मम मनीं निपजेल धैर्य. ३

### आर्या.

सतराशें अठ्याण्णव शककालीं चैत्र शुद्ध नवमीला;
गेला श्रीशदयेनें निर्विघ्न ग्रंथ हा समाप्तीला. ४

---

### आर्या.

अठराशें पांच शकीं प्राकृत रघुवंश रामनवमीला;
निर्णयसागरमुद्रणयंत्रेंशें छापवून संपविला.



श्री

# दशरथमृगया.

ह्या नांवाचा रघुवंशांतील नवम सर्ग

ह्याचें

समश्लोकी प्राकृत भाषांतर

## गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर

ह्यांनीं केलें.

तें

मुंबईत

" निर्णयसागर " छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

ह्यांत यमकालंकार आणि वृत्तवैचित्र्य हीं मुळांतल्याप्रमाणें साधण्याविषयीं प्रयत्न केला आहे.

# प्र स्ता व ना.



कांहीं दिवसांपूर्वी आह्मी **रघुवंश** नामक प्रसिद्ध संस्कृत काव्याचें दक्षिणा प्रैझ् कमिटीच्या सूचनेवरून मराठी पद्यात्मक भाषांतर केलें ही गोष्ट पुष्कळांस कळली आहेच. आतां कोणत्याही ग्रंथाचें भाषांतर ह्मटलें ह्मणजे त्यांतील अर्थ एके भाषेंतून दुसऱ्या भाषेंत उतरणें होय. आह्मी रघुवंशाचें भाषांतरच केलें, तेव्हां तें अर्थात् या नियमाप्रमाणेंच झालें. आणि ज्यापेक्षां त्या समग्र काव्याचें भाषांतर केलें, त्यापेक्षां त्यांतल्या नवव्या सर्गाचेंही भाषांतर तसेंच झालें ह्मणजे त्याचा अर्थ मात्र संस्कृतांतून मराठींत उतरला गेला ही गोष्ट अर्थसिद्धच आहे.

आलीकडे आह्मी त्या नवव्या सर्गाचें आणखी समश्लोकी भाषांतर रसिकजनांच्या प्रीत्यर्थ तयार केलें आहे, त्याविषयीं कांहीं माहिती देणें आणि सूचना करणें अवश्य वाटल्यावरून त्या पुढें देतों:—

संस्कृत पंडितांनीं काव्याचे तीन भेद कल्पिले आहेत. १ **ध्वनि**, २ **गुणीभूत व्यंग्य** आणि ३ **चित्र**. यांसच अनुक्रमें उत्तम, मध्यम, व कनिष्ठ असें ह्मणतात. त्यांत **ध्वनि** ह्मणजे ज्यांत वाच्यार्थापेक्षां व्यंग्यार्थाला प्राधान्य असतें तें. **गुणीभूत व्यंग्य** ह्मणजे ज्यांत व्यंग्यार्थ गौण किंवा अप्रधान असतो तें. आणि **चित्र** ह्मणजे ज्यांत व्यंग्यार्थ असून अलंकारांचा मात्र चमत्कार असतो तें. चित्रनामक काव्याचे दोन भेद आहेत, १ अर्थचित्र आणि २ शब्दचित्र. यांतून पहिल्या भेदांत **उपमा, रूपक** इत्यादि अर्थालंकाराचा, आणि दुसऱ्या भेदांत **अनुप्रास, यमक** इत्यादि शब्दालंकाराचा चमत्कार असतो. जें काव्य व्यंग्यप्रधान असून त्यांत आणखी अर्थालंकार आणि शब्दालंकार यांचा चमत्कार असतो तें काव्य फारच उत्कृष्ट होय असें जाणावें.

काव्य कितीही चांगलें असलें तरी त्याच्या श्रवणसमकाल ह्मणजे तें ऐकण्याबरोबर जो आनंद होतो, तो त्याच्या शब्दरचनेच्या योगानेंच होतो. अर्थाच्या योगानें जो आनंद होतो, तो त्याच्या मागून विचाराअंतीं होतो यांत संशय नाहीं. फार तर काय पण काव्य नीरस असलें तरी त्यांत शब्दलालित्य असलें तर तें देखील श्रवणसमकाल लो-

कांच्या मनास संतोष देतें. मग तें सरस असलें तर संतोष देईल हें सांगायास नकोच. स्त्रीच्या अवलोकनानें तरुण पुरुषाच्या मनाला जो मोह होतो, तो तारुण्यलावण्यादिक जे तिचे बाह्य ह्मणजे देहसंबंधी गुण, त्यांच्याच दर्शनसमकाल होतो; मग तिचे चातुर्य रसिकत्वादिक जे अभ्यंतरचे ह्मणजे आत्मसंबंधी गुण ह्यांच्या योगानें संतोष होणें, तो दर्शनानंतर सहवासादि योगानें त्या गुणांचा अनुभव आल्यावर होतो. तसाच काव्यापासून श्रवणसमकाल जो आनंद होणें, तो त्याचा देहरूप जो शब्दसंघात त्याच्या योगानेंच होतो; आत्मरूप जो रस त्याच्या योगानें आनंद होतो तो त्याच्या मागून होतो, ही गोष्ट उघड आहे.

अनुप्रास ( वर्णावृत्ति ), यमक ( वर्णसंघातावृत्ति ), पद्मबंध छत्रबंध वगैरे बंधरचना, इत्यादि शब्दालंकार प्रसिद्धच आहेत त्याप्रमाणेंच छंद ह्मणजे पद्याच्या चाली ज्यांस वृत्त असें ह्मणतात, हाही नियताऽक्षरगणघटित किंवा नियतमात्रागणघटित शब्दरचनेचाच एक मनोहर प्रकार आहे. या छंदाची योग्यता वेदामध्यें देखिल वर्णिली आहे ही गोष्ट वेदवेत्त्या पंडितांस विदित आहेच. प्रस्तुत लोकांमध्येंहि छंदाचें माहात्म्य फारच आहे, इतकें कीं एखादें वाक्य केवळ छंदोबद्ध असलें ह्मणजे त्यास कविता ह्मणतात! गद्यरचना सुंदर असली तरी तीस कविता ह्मणत नाहींत! संस्कृत आणि प्राकृत परमार्थसंबंधी ग्रंथ देखील छंदोबद्ध आढळतात. सर्व ऋग्वेद छंदोबद्ध आहे. **मुकुंदराज, ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम,** यांचे ग्रंथ छंदोबद्धच आढळतात. सारांश शब्दचमत्कार असण्याचें जेथें तादृश अगत्य किंवा प्रयोजन दिसत नाहीं, त्या पारमार्थिक ग्रंथांत जर हे चमत्कार आढळतात, तर केवळ लोकरंजनार्थच केलेले जे **नाटकादि** ग्रंथ त्यांत हा चमत्कार असणें आवश्यक होय हें उघडच आहे.

पुराणें छंदोबद्धच आहेत. त्यांतही शब्दचमत्काराकडे लक्ष्य असल्याचें दिसून येतें. श्रीमद्भागवतांत रासोत्सवप्रसंगीं

जयति तेऽधिकं जन्मना व्रजः श्रयत इन्दिरा शश्वदत्र हि ॥

दयित दृश्यतां दिक्षु तावकास्त्वयि धृतासवस्त्वां विचिन्वते ॥ १ ॥

इत्यादि गोपीगीत ह्मणून प्रसिद्ध अध्याय आहे तो एके मनोहर छंदांत निबद्ध असून प्रत्येक चरणांत पहिलें व सातवें हीं अक्षरें समान

आणून अनुप्रास साधला आहे. तसेंच यांत कांहीं बंधरचनाही साधली असल्याचें ऐकण्यांत आहे. असेंच,

श्रुत्वा गुणान्भुवनसुंदर शृण्वतां ते ।
निर्विश्य कर्णविवरैर्हरतोऽङ्गतापम् ॥

इत्यादि श्रीकृष्णाप्रत रुक्मिणीनें लिहिलेली पत्रिका ( पत्र ) ही एके प्रकारच्या सुंदर वृत्तामध्यें निबद्ध आहे.

याप्रमाणें पुराणामध्येंही कोठें **रस**, कोठें **वक्ता**, कोठें **वाच्य**, कोठें **प्रबंध**, यांच्या संबंधानें अनुगुण व उचित अशी सुंदर शब्दरचना असल्याचें दिसून येतें.

अर्थ साधारण असला तरी **छंद** व **अनुप्रास** इत्यादि शब्दरचनाचमत्काराच्या योगानें त्याला फार शोभा येते. जसें:—

" हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं,"
" मठाची उठाठेव कां तरी." ( रामजोशी ).

या वाक्याचा अर्थ ह्मटला ह्मणजे ' बळेंच जोग घेऊन गोसावी बैरागी व्हावें, मग प्रपंचाची खटपट कशास करावी ?' इतकाच आहे. परंतु ह्याच साधारण अर्थाला जेव्हां जोशीबावांनीं **लावणी**च्या मनोहर **छंदानें** आणि **'टा'** व **'ठा'** ह्या वर्णांच्या आवृत्तिरूप शब्दालंकाराच्या भूषणांनीं भूषित केलें, तेव्हां तोच अर्थ श्रोत्यांच्या मनाला मोह करणारा झाला !

याप्रमाणेंच **वामनपंडित**, **मोरोपंत**, **अमृतरायजी** इत्यादि कवींच्या काव्यांत शब्दालंकार बहुत आढळण्यांत येतात.

" कठिण सख्या लश्करची वार्ता, यइल यखादा हरीप मार्ता,"
" शुद जाते मग बंदुक धर्ता, हात कांपतो दारू भर्ता."

इत्यादि अनंतफंदीचे चुटके जे लोकांस इतके भुलवितात, ते शब्दालंकारानेंच भुलवितात, ही गोष्ट लोकानुभवसिद्धच आहे !

श्रीहर्षनामक कवि अत्यंत बुद्धिमान् होता. तो लहानपणीं कांहीं उडदांचा पदार्थ खात बसला असतां त्यास कोणी एकानें संस्कृतांत विचारिलें, " अरे, किं जक्षसि ?" त्यावर त्यानें उत्तर दिलें, " शेमुषीमुषमाषान्नम् !" आतां हें लहानसेंच वाक्य, पण तें अनुप्रासाचे योगानें किती गोड झालें आहे ! असो.

अनुप्रास, यमक, नाना प्रकारचीं वृत्तें, हीं जशीं कानास गोड लागणारीं आहेत, तशी बंधरचना कानास गोड लागणारी नव्हे हें स्पष्टच आहे.

भारवी-कवीनें किरातार्जुनीय काव्यांत, आणि माघ कवीनें शिशुपालवध काव्यांत हा बंधरचनेचा प्रकार दाखवून आपलें शब्द-रचना चातुर्य प्रकट केलें आहे. रघुवंशनामक काव्यांत कालिदासानें बंधरचना दाखविली नाहीं; परंतु अनुप्रासाकडे त्या कवीचें पुष्कळ लक्ष्य होतें, असें दिसून येतें. ही गोष्ट तें काव्य साद्यंत पाहिलें असतां अनुभवास येईल. आतां तें साद्यंत काव्य पाहण्यास बहुत वेळ पाहिजे, ह्मणून त्याचा दुसराच सर्ग, जो यावत् संस्कृत विद्यार्थ्यांच्या प्रायः पाहण्यांत येतो, तोच त्या दृष्टीनें पाहिला असतां याविषयींचा नमुना समजण्यांत येईल. त्याचा पहिलाच श्लोक असाः—

" अथ प्रजानामधिपः प्रभाते जायाप्रतिग्राहितगन्धमाल्याम् "
" वनाय पीतप्रतिबद्धवत्सां यशोधनो धेनुमृषेर्मुमोच ॥"

यांत प्रथम प्र या अक्षराची व शेवटीं ध, न, म या अक्षरांची आवृत्ति आली आहे तेणेंकरून हा श्लोक कानास गोड लागतो !

( श्लोक ३ रा याचें पूर्वार्ध ).

" निवर्त्य राजा दयितां दयालुस्तां सौरभेयीं सुरभिर्यशोभिः"

यांत य, द, स, र, भ, या अक्षरांची आवृत्ति आली आहे ! तसेंच विसृष्टपार्श्वानुचरस्य तस्य पार्श्वद्रुमाः पाशभृता समस्य " (श्लो० ९पू.) यांत पा आणि स्य या अक्षरांची आवृत्ति साधली आहे.

" ततो मृगेन्द्रस्य मृगेन्द्रगामी वधाय वध्यस्य शरं शरण्यः"
" जाताभिषङ्गोनृपतिर्निषङ्गादुद्धर्तुमैच्छत्प्रसभोद्धृतारिः ॥"

सनन्दिनीस्तन्यमनिन्दितात्मा सद्वत्सलो वत्सहुतावशेषम् ।(श्लो. ६९पू.)

" गौरीगुरोर्गव्हरमाविवेश " (श्लो० २६ चतुर्थ चरण).
" प्रजाः प्रजानाथ पितेव पासि " ( ,, ४८ चतुर्थ चरण).
" प्रस्थापयामास वशी वशिष्ठः " ( ,, ७० च. च.).
" पुरंदरश्रीः पुरमुत्पताकम् " ( ,, ७४ प्रथम चरण).

ह्या आणि असल्या आणखीही बहुत ठिकाणीं वर्णावृत्ति आणि

शब्दावृत्ति साधिली आहे तिच्या योगानें तीं तीं पद्यें फार श्रोत्रमधुर झालीं आहेत.

हा अनुप्रासाचा प्रकार रघुवंशाच्या सर्वही सर्गांत साधारणपणें आढळतो. परंतु विशेषेंकरून **यमकाचा** व **वृत्तवैचित्र्याचा** जो चमत्कार, तो **नवव्या** सर्गांतच दिसून येतो. यावरून तो सर्ग अर्थरचनाचतुर जो **कालिदासकवि** त्यानें **यमक** आणि **वृत्तवैचित्र्य** हीं हीं दाखविण्याच्या उद्देशानें केला असावा असें अनुमान होतें.

**रघुवंशाचें** मराठी पद्यात्मक भाषांतर आह्मी केलें, त्यांतही असा अनुप्रास साधण्याकडे ठेववेल तितकें लक्ष्य ठेविलें आहे ही गोष्ट जे कोणी ग्राह्यबुद्धीनें व ऋजुपणानें तें भाषांतर पाहतील त्यांच्या ध्यानांत येईल. त्यांतील दुसऱ्या सर्गाचा पहिलाच श्लोक असा आहे:—

प्रातःकालीं सुगंधाक्षत विमलफुलें वाहिलीं धेनुकेला,
भार्येनें भूपतीच्या मुनिवरहवनासाठिं तद्दोह केला;
वत्सातें आंखडोनी नरपति तिजला सोडि रानांत जाया,
सत्कीर्ती हेंचि ज्याचें धन, नृपति असा तीस लागे भजाया. १

एथें प्रथमार्धांत ल, भ, या अक्षरांची, व उत्तरार्धांत ज, य, या अक्षरांची आवृत्ति आली आहे. तसेंच,

( श्लोक तिसरा ).

वाटेंत कांटे वनि गार वारा तसा कसा सोशिलही उबारा,
अशी दया फार मनांत वागे ह्मणोनि धाडी नृप तीस मागें;

यांत ट आणि र या अक्षरांची आवृत्ति आली आहे. याप्रमाणें भाषांतरांत मध्यें मध्यें थोडीं थोडीं अनुप्रासाचीं स्थलें वाचकांचे आढळण्यांत येतील.

सकल रघुवंशाच्या भाषांतरांत नवव्या सर्गाचें भाषांतर आलें आहे, तें केवळ अर्थाचेंच आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. **यमकादिक** शब्दालंकाराचें भाषांतर होत नाहीं ही गोष्ट उघडच आहे.

आतां त्या नवव्या सर्गांत कवीनें जशीं यमकें साधिलीं आहेत, व जसें वृत्तवैचित्र्य दाखविलें आहे, तसें प्राकृतभाषेंतही आपणास साधलें तर आपण करून पाहवें असें आलीकडे मनांत आल्यावरून त्या सर्गाचें हें समश्लोकी भाषांतर पुढें केलें आहे.

मूळ संस्कृत सर्गाचीं पद्यें ८२ आहेत. आणि द्रुतविलंबित, वसंततिलका, शालिनी, प्रहर्षणीय, औपच्छंदसिक, मालिनी, रथोद्धता, मंजुभाषिणी, पुष्पिताग्रा, स्वागता, वैतालीय, आणि मत्तमयूर, अशीं एकंदर वृत्तें ह्मणजे छंदाच्या चाली बारा आहेत.

भाषांतरांत एके पद्यास एक पद्य याप्रमाणें केल्यामुळें पद्यसंख्या ब्यायशींच असावी, परंतु पांच सात ठिकाणीं एके पद्यास अनेक पद्यें करण्यांत आल्यामुळें पद्यसंख्या ८२ पेक्षां अधिक ह्मणजे सरासरी एकुणनव्वद नव्वद झाली आहे. मूळ पद्याचें जें वृत्त तेंच भाषांतर पद्यांत योजिलें आहे, आणि जेथें एके पद्याचीं अनेक पद्यें केलीं आहेत, तेथेंही मूळ पद्याचें जें वृत्त तेंच त्याच्या भाषांतराच्या अनेक पद्यांसही योजिलें आहे, ह्मणून मूळांतल्याप्रमाणें भाषांतरांतील वृत्तांची संख्या बाराच झाली आहे.

मूळ संस्कृतांतील आरंभीचे ५४ श्लोक द्रुतविलंबित वृत्ताचे असून त्यांत प्रत्येक श्लोकाच्या चतुर्थ चरणाचें पहिलें एक अक्षर सोडून त्या पुढील तीन अक्षरांची आवृत्ति साधली आहे. आणि पंचावन्न श्लोकापासून पुढील भागांत तसली अक्षरावृत्ति न साधितां केवळ वृत्तवैचित्र्य दाखविलें आहे.

भाषांतरांतही पहिल्या चोपन्न श्लोकांचें भाषांतर द्रुतविलंबित वृत्तांतच करून ३९ वा व ४४ वा हे दोन खेरीज करून बाकीच्या प्रत्येक श्लोकाच्या चतुर्थ चरणांत पहिलें अक्षर सोडून पुढील तीन अक्षरांची आवृत्ति साधिली आहे. मूळ संस्कृतांतील ही अक्षरावृत्ति सर्वत्र यमकालंकाररूप आहे. भाषांतरांतील अक्षरावृत्ति कोठें कोठें यमकरूप आणि कोठें कोठें लाटानुप्रासरूप झाली आहे ही गोष्ट जे कोणी अलंकारशास्त्र जाणते असतील त्यांच्या ध्यानांत येईलच. यमक कोणास ह्मणावें आणि लाटानुप्रास कोणास ह्मणावें हा प्रकार विस्तरभयास्तव एथें सांगवत नाहीं.

चोपन्न श्लोकापासून पुढें भाषांतरांतही मूळांतील श्लोकाचें जें वृत्त त्याच वृत्तांत त्याचें भाषांतर करून वृत्तवैचित्र्य दाखविलें आहे.

---

१ एकुण चाळिसाव्या श्लोकांत तर 'शाकर' या तीन अक्षरांची आवृत्ति न साधतां निरुपायास्तव 'साकर' असेंच रूप करण्यांत आलें आहे.

या सर्गांत मुख्यत्वेंकरून प्रतिपाद्य विषय ह्मटला ह्मणजे दशरथ राजाची मृगया होय. ह्मणून यास **दशरथमृगया** असें नांव आहे. यांत अजराजा मरण पावल्यानंतर त्याचा पुत्र दशरथ हा राज्यपदारूढ झाला, एथून उपक्रम करून, त्याचे शौर्यौदार्यादिक गुण, त्याचे विवाह, त्यानें केलेलें देवेंद्रास साहाय्य, त्याचा शत्रुपराजय, त्याची प्रजापालनदक्षता, त्याचें यज्ञकर्मानुष्ठान, त्याची उद्योगशीलता, इत्यादिकांचें संक्षिप्त कथन करून वसंतऋतूचा प्रादुर्भाव वर्णिला आहे. पुढें वसंतोत्सवसंबंधानें तरुण स्त्रीपुरुषांच्या वासंतिक विहाराचें अत्यंत सुरस व सविस्तर वर्णन करून पुढें त्याची मृगया चमत्कारिक व सुंदर रीतीनें वर्णिली आहे. पुढें एक्या अंध व वृद्ध अशा तापसाच्या पुत्राचा वध दशरथाच्या हातून चुकून घडला, तेव्हां वृद्धावस्थेंत पुत्रशोकानें मरण पावण्याचा शाप त्यानें राजास दिल्यामुळें व आपल्या हातून हें फार वाईट कर्म घडलें असें वाटल्यामुळें राजास उपरति होऊन तो मृगया करणें सोडून आपल्या अयोध्यानगरीप्रत परत येता झाला, ही कथा शेवटीं सांगून कवीनें या सर्गाची समाप्ति केली आहे.

भाषांतरांतही अर्थात् ह्याच क्रमानें हाच कथाभाग आला आहे. मूळ पद्याचा अर्थ छंदाच्या निर्बंधामुळें भाषांतरपद्यांत साकल्येंकरून साधणें फार कठिण; त्यांतही पहिल्या चोपन्न पद्यांत मूळचें वृत्त साधून आणखी चतुर्थ चरणांतील तीन अक्षरांची आवृत्ति साधावी लागली ह्मणून तेथें तर निदान कथासंदर्भाचें सूत्र तरी न तुटतां तें कायम रहावें ह्मणून त्याविषयीं ठेववेल तितकी सावधगिरी ठेविली आहे. आणि संदर्भसूत्र कायम राहून आणखी मूळांतील विवक्षितार्थ जेथें जितका बांधायास साधला तेथें तितका बांधण्याविषयीं यत्न करण्यांत कसर केली नाहीं!

या सर्गांत मूळकवीनें (कालिदासानें) अनेक रस दाखविले आहेत; त्यांत प्रथम दानोत्साह, धर्मोत्साह, ह्या उत्साहसंबंधानें दानवीर धर्मवीर असे वीररसाचे अनेक प्रकार दर्शित करून पुढें वसंतोत्सवाच्या प्रसंगानें शृंगाररसाची पुष्टि उत्कृष्ट रीतीनें व्यक्त केली आहे. नंतर मृगयेच्या प्रसंगानें शृंगार, वीर, अद्भुत, अशा रसांचे थोडे थोडे मासले दाखवून पुढें पुत्रमरणामुळें वृद्ध तापसास झालेल्या

शोकाच्या संबंधानें करुणरस प्रकट करून, नंतर पुत्रवधानें अत्यंत कोपायमान होऊन तापसानें राजास शाप दिला यासंबंधानें रौद्ररसाची लपेट दाखवून शेवटीं मुनिपुत्रवधरूप अत्यंत गर्हित कर्म स्वहस्तें घडल्यामुळें राजास मृगयेविषयीं उपरति होऊन झालेल्या निर्वेदाच्या संबंधानें शांतरसाची झाक दाखवून सर्गाची समाप्ति केली आहे.

भाषांतरांत हे रस कितपत उतरले आहेत किंवा मुळींच उतरले नाहींत याचा निर्णय करणें हें काम सहृदय वाचकाचें आहे, भाषांतरकर्त्याचें नव्हे, हें उघड आहे.

वृत्त व यमक यांच्या निर्बंधामुळें, व योग्य शब्द न सुचल्यामुळें, जे अप्रसिद्ध व कठिण शब्द घालावे लागले त्यांचा बोध होण्याकरितां, व दूरान्वयादि कारणानें जेथें दुर्बोधता आली आहे असें वाटलें तेथें त्यांचा ही बोध होण्याकरितां, पृष्ठाखालीं टीपा दिल्या आहेत.

याप्रमाणें हें रघुवंशांतील दशरथमृगया नामक नवम सर्गाचें प्राकृत समश्लोकी ह्मणजे ( मूळपद्य ज्या वृत्तामध्यें असेल त्याच वृत्तामध्यें त्याचें ) भाषांतर मोठ्या श्रमानें तयार करून तें रसज्ञ व मार्मिक अशा विद्वज्जनांस परमादरपूर्वक समर्पण केलें आहे. तर यांत जे दोष व न्यूनता असतील त्यांविषयीं क्षमा करून कृपाळुपणें याचा त्यांनीं अंगीकार करावा अशी त्यांस विनयपूर्वक प्रार्थना आहे.

गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर.

# रघुवंश नवमसर्गाचें समश्लोकी

## प्राकृत भाषांतर.

[द्रु.वि.] अमरलोकिं[1] करी गमना अजें[2], मग[3] धरापति[4] होय[5] तदात्मज[6];
*जनतती[7] तंव त्यां[8] बहु मानि[9] ती[10] नृपतिला[11]; पतिला[12] जशि कां सती.
सकलदेशगणा नगरा वना, नृपति पाळितसे सुनयें[13] जना;
ह्मणुनि जाहलि यासचि हे क्षिती[14], वसुमती[15], सुमती जगिं बोलती. २
दशरथप्रभु[16] आणि शचीपती[17], जगिं यथासमयीं[18] वसु[19] अर्पिती;
ह्मणुनि भूमितलीं न समान यां[20], वसु जना सुजना बहु द्यावया. ३

---

१ स्वर्गास. २ अजनामक राजा (दशरथाचा बाप). ३ अज स्वर्गास गेल्यावर म्ह० मरण पावल्यावर. ४ पृथ्वीचा धनी. ५ होता झाला. ६ अजाचा पुत्र (दशरथ). * 'पृथिविला सुख दे निजलेंकरा जनकसा; न कसा नृप तो बरा' हें पाठांतर. ७ जनसमुदाय (रयत). ८ त्या नृपतिला. ९ फार मानिती झाली. १० (हें जनततीचें दर्शक). ११ भर्त्याला. १२ पतिव्रता स्त्री. एथें 'पतिला' या अक्षरसमुदायाची आवृत्ती साधली आहे. आणि हा अक्षरसमुदाय अर्थयुक्त असून प्रथम उच्चारणीं व आवृत्तिकालीं ही एकेच भर्तृरूप अर्थी प्रयुक्त असल्यानें हा लाटानुप्रासनामक शब्दालंकार झाला. पाठांतरीं निजलेंकरा जन कसा म्ह० बाप जसा तसा पृथिविला सुख दे, तो नृप बरा कसा न ? असा अन्वय. एथें न कसा या तीन अक्षरांच्या समुदायाची आवृत्ति साधली आहे. आणि हा अक्षरसमुदाय प्रथम उच्चारणकालीं अर्थशून्य असून आवृत्तिकालीं अर्थयुक्तपणें योजिला आहे म्हणून हा यमकनामक शब्दालंकार झाला. असेंच पुढेंही जाणावें. १३ चांगल्या नीतिमार्गानें. (जना पाळी). १४ पृथिवी. १५ वसुमती हें पृथ्वीचें नांव आहे. याचा अर्थ वसु म्ह० रत्नें धन तद्युक्त असा आहे, परंतु अन्यायी राजांस ती नांवाचीच वसुमती असते. पण हा राजा उत्तम नीतीनें जनपालन करी म्हणून ती खरी म्हणजे यथार्थ वसुमती वसु (रत्नें धन यांनीं) युक्त अर्थात् रत्नें धन यांतें प्रसवणारी अशी याच राजाला झाली असें सुमती म्ह० जाणते लोक बोलूं लागले असा अर्थ. एथें सुमती या अक्षरसमुदायाची आवृत्ति साधली आहे. १६ दशरथ राजा. १७ इंद्र. १८ यथाकालीं (वक्तावर). १९ दशरथपक्षीं धन व इंद्रपक्षीं जळ. २० या राजासारिखा सुजना म्हणजे साधु अशा जनाप्रति वसु म्ह० धन देणारा भूमीवर नव्हता असें तात्पर्य. प्रतिशब्द जना याच्या पुढें असणें चांगलें म्हणून बहु हें पाठांतर कल्पिलें आहे. तसेंच सुजना हें जना याचें विशेषण

न रिपुचें भय भूमितलीं वसे, न विपदा कवणा शिणवीतसे;
जगिं उपद्रवलेशहि देतसे, न [1]गद [2]हा [3]गदहानि करीतसे. ४
[4]रघुं तसाचि [5]अज [6]प्रभु जें असे, बहु सुशोभित भूमि तईं दिसे;
क्रम तसा नृप दाखवि [7]हा गुणी, धरणिला; रणिं [8]लाघव दाउनी. ५
बहुत दुष्ट जनाप्रति दंडि तो, सुजन त्यां धन देउनि रक्षि तो;
यम तसाच कुबेर, उणा [9]ययां, न च, ह्मणूंच ह्मणूं सम हा [10]तयां. ६
न [11]मृगयारति वा नचि सोंगटीं, नचि [12]मधू नचि नारहि [13]गोमटी;
व्यसन एकहि [14]यां वश ना करी, सुमतिला; मतिला जनिं [15]जें हरी. ७
नचि [16]शचीपतिशीं कधिं दीनसें, नचि असत्य [17]कुंचाळितही तसें;
न रिपुलाहि वदे [18]कटु निश्चित, नृपति तो [19]पतितोद्धरणीं रत. ८

---

शोभत नाही कारण सुष्ठु (चांगला) जो जन तो सुजन असा याच पदांत जन या पदाचा अर्थ उक्त होतो. परंतु सुजन हा शब्द साधु याच्या पर्यायरूपानें ही कोशांत प्रणीत आहे म्हणून एथें त्या अर्थीच योजिला आहे. या श्लोकांत सुजना या तीन अक्षरांच्या समुदायाची आवृत्ति आली आहे.

१ रोग (उपद्रवलेश ही न देतसे असा अन्वय). २ हा राजा. ३ रोगाचा नाश (करीतसे). या श्लोकांत गदहा या अक्षरत्रयाची आवृत्ति साधली आहे. ४ दशरथाचा आजा. ५ दशरथाचा बाप. ६ राजा (जेव्हां होता तेव्हां जशी पृथ्वी शोभली तशीच यानेंही पराक्रमानें शोभविली असें तात्पर्य). ७ हा दशरथ नृप. धरणिला म्ह० पृथ्वीला आजा व बाप यांच्याप्रमाणेंच रणांत. ८ लाघव म्ह० कौशल्य दाखवून क्रम दाखवी असा अन्वय. एथें रणिला या अक्षरत्रयाची आवृत्ति आली आहे. आवृत्तींतील णीवर अनुस्वार एथें अधिक झाला परंतु अनुस्वाराचा दोष यमकादिकांत तादृश कविजन मानीत नाहींत. ९ ययां यमकुबेरांस (हा उणा न च). १० तयां यमकुबेरांस हा सम म्ह० तुल्य असें म्हणूंच म्हणूं असा अर्थ. कारण दंड करणें व धन देणें हीं कामें यथाक्रमें यम व कुबेर यांचीं आहेत. तीं दोन्हीं या राजांत वसत होतीं म्हणून तो त्यांशीं समान होता. या श्लोकांत च म्हणूं या अक्षरत्रयाची आवृत्ति साधली आहे. ११ शिकार. १२ मद्य. १३ सुंदर स्त्री. १४ या सुमतिला (राजाला). १५ जें व्यसन मतिला हरि म्ह० बुद्धि नष्ट करितें तें एकही व्यसन त्यास नव्हतें असा अर्थ. एथें मतिला या अक्षरत्रयाची आवृत्ति आली आहे. १६ इंद्राशीं ही (दीन भाषण नव्हतें). १७ विनोदांतही (असत्य भाषण करीत नसे). १८ कठोर (भाषण शत्रूलाही बोलत नसे). १९ हें नृपति याचें विशेषण. याचा अर्थ पतितोद्धरण म्हणजे ईश्वर त्याचे ठायीं रत. किंवा दारिद्र्यादिकेंकरून सुखापासून च्युत झालेल्यांस उद्धरण म्हणजे हात देऊन वर काढणें त्याविषयीं सक्त, असा जाणावा. एथें पतितो या अक्षरत्रयाची आवृत्ति आली आहे.

दशरथा नमुनी नृप वागती, जगतिं पावति ते उदयाप्रति;
अनत जे नृप होति, तयांवरी, न करुणा करुणा[1]ऽवश तो करी.९
सकलही पृथिवी रघुच्या[2] समें, दशरथें जिंकिली स्वपराक्रमें;
अति दुरासद[3] यच्चमु[4] तत्वतां, गजवती[5] जवतीव्रहया[6] स्वतां.१०
क्षितिस आजलधी[7] जंव जिंकिलें, जलधि[8] ते जयदुंदुभि[9] जाहले;
सुरहि[10] वानिति[11] ऐकुनि ज्यांचिया[12], घनरवा[13]; नर[14] वानि कसा न यां?[15] ११
अमरनाथ[16] जसा कुलिशा[17] करीं, धरुनि पर्वतपक्ष[18] जवें[19] चुरी[20];
नरपतीहि तसा रिपुच्यां[21] बळें[22], निज[23] शिरें जशि रे खुडि [24]तो फुलें.
अखिल देव जसे सुरनायका[25], नमिति ठेवुनियां पदिं मस्तका;
नमिति याहि नृपाळवरा अरी[26], सकलही[27] कलहीं[28] जितें[29] सत्वरी.१३
रिपुचिया विधवा तशिं लेंकुरें, निजपदीं पडतां निरखूनि रे;
करि सुरक्षित हारुनि तद्दरां[30], विजयसा[31] जय साधुनि[32] ये घरा.१४

---

१ करुणेला अवश म्हणजे जेथें करुणा योग्य नव्हे तेथें करुणा न करणारा. एथें करुणा या अक्षरत्रयाची आवृत्ति साधली आहे. २ रघुशीं समान म्ह० तुल्य असा जो दशरथ तेणें. ३ आकळण्यास अशक्य हेंही यच्चमू याचें विशेषण. ४ ज्या दशरथाची चमू म्हणजे सेना. ५ गजयुक्त. ६ वेगानें सत्वर चालणारे आहेत असे हय म्ह० घोडे जीच्या ठायीं. ( गजवती आणि जवतीव्रहया हीं दोनही यच्चमू याचीं विशेषणें आहेत ) एथें 'जवती' या अक्षरत्रयाची आवृत्ति आली आहे व हा अक्षरसमुदाय प्रथम उच्चारणीं व आवृत्तिकाळींही अर्थशून्य आहे. ७ समुद्रापर्यंत. ८ समुद्र. ९ ज्याचे नगारे. १०देवहि. ११वाणिति. १२ज्या जलधिरूप जयदुंदुभीच्या (घनरवा). १३घनरवा गंभीर शब्दास. १४ मनुष्य या (घनरवाला) नर कसा न वानी ? असा अन्वय. १५ एथें नरवा या अक्षरत्रयाची आवृत्ति आली आहे. १६ इंद्र. १७ वज्राला. १८ पर्वतांचे पक्ष म्ह० पंख. (पूर्वी पर्वतांस पंख असून ते उडून लोकांस त्रास देत असत म्हणून इंद्रानें वज्रें-करून त्यांचे पंख तोडून टाकिले अशी पुराणांत कथा आहे तिजकडे एथें लक्ष्य आहे). १९ वेगानें. २० चुरडी. २१ या षष्ठीचा संबंध शिरें याशीं होय. २२ बळानें. २३ निज हें रिपुचीं याचें किंवा बळें याचें विशेषण. २४ तो नरपतीहि जशीं फुलें तशीं निज रिपुचीं शिरें खुडी असा अर्थ. एथें जशिरे या अक्षरत्रयाची आवृत्ति साधली आहे. २५ इंद्राला. २६ शत्रू. २७ सर्वेही (अरी). २८ युद्धांत. २९ जिंकिलेले (हें अरी याचें विशेषण ) एथें कलही या अक्षरत्रयाची आवृत्ति आली आहे. ३० त्या विधवा आणि लेंकरें याच्या दरा म्हणजे भयास हारुनि सुरक्षित करी असा अन्वय. ३१ अर्जुनासारिखा. ३२ संपादून. एथें जयसा याची आवृत्ति आली आहे.

पृथिविचा सकलाहि धनी जरी नृप अहर्निश[1] उद्यम[2] हा करी,
'निघुनि जाय' ह्मणे 'चल[3] चाकशी[4] निज रमा[5] जर मानव आळशी.' १५
जशि भजे दनुजारिस[6] सर्वदा[7] नचि तया[8] त्यजि ते कधिं सर्वदा[9],
तशि यथाहि उदार नृपास ती सकमला[10] कमला[11] त्यजिना सती[12]. १६
मगध कोसल केकय देशाचे अधिपती[13] अतिनिर्मलबुद्धिचे,
बहुत सादर अर्पिति राजया[14] सुतनुजा[15][16] तनुजा[17] तरुणी ह्या[18]. १७
तिनहि शक्तिसवें[19] नृपती जसा विलसला क्षितिराज्यपदीं तसा,
विलसला तिन घेउनियां स्त्रिया सुचतुरा[20] चतुरानन[21] भूप यों[22]. १८
मग नरेश[23] सुरेशसहायता[24] करुनियां बनला विजयी स्वतां,
नृपतिचें यश वर्णिति गायनीं स्वरबला[25] स्वरलाघव[26] दाउनी. १९
विपुल यज्ञ करी नृप निश्चयें अमित दान करोनि धन स्वयें,
पुरुनि यूप[27] बहू सरयूवरी[28] नरमणी[29] रमणीय[30] तिला[31] करी. २०

---

१ सर्वकाल. २ उद्योग. ३ चंचळ. ४ चाकासारिखी ( चंचळ ). ५ स्वकीय लक्ष्मी 'लक्ष्मी चाकासारिखी चंचळ आहे म्हणून मनुष्य आळशी राहिला तर तो त्याची लक्ष्मी निघून जाते' असें दशरथाचें म्हणणें असून तो पृथ्वीचा सार्वभौम असतां सर्वकाळ उद्योगी असे आळशी नसे असा अर्थ. ६ विष्णूस. ७ निरंतर. ८ तया विष्णूस. ९ सर्व देणारा अशा हें तया याचें विशेषण. १० कमल धारण करणारी. ११ लक्ष्मी. १२ पतिव्रता. ( एथें कमला याची आवृत्ति आली आहे). १३ राजे. १४ दशरथाला. १५ सुंदरांगी. १६ (हें संबंधीसर्वनाम याचा संबंध तनुजा याशीं). १७ कन्या. १८ ह्या ( राजया ). आपल्या सुंदरांगी आणि तरुणी अशा ज्या तनुजा त्या या राजाला म्ह० दशरथाला ते राजे सादर अर्पिते झाले. दशरथाचें लग्न झालें असें तात्पर्य. १९ प्रभाव उत्साह आणि मंत्र अशा राजाच्या ठायीं तीन शक्ति असतात असें शास्त्रांत वर्णिलें आहे या गोष्टीस लक्षून हें वर्णन आहे. तीन शक्तीप्रमाणें तीन स्त्रियांनी ही हा राजा शोभला असा अर्थ. २० फार चतुर (अशा स्त्रिया). २१ हें विशेपण भूप आणि स्त्रिया या दोहोंकडे ही लागू पडण्याजोगें आहे. ( चतुर म्ह० सुंदर आहे आनन ज्यांचें किंवा ज्याचें असा त्या पदाचा विग्रह जाणावा). २२ एथें चतुरा याची आवृत्ति आली आहे. २३ दशरथ राजा. २४ इंद्राचें साहाय्य ( करून ). २५ स्वर्गीच्या अबला म्ह० स्त्रिया अर्थात् अप्सरा. २६ स्वरकौशल्य ( दाउनी ). एथें रबला याची आवृत्ति आली आहे आणि घ आणि ब यांचें सावर्ण्य विवक्षित आहे. २७ यज्ञस्तंभ. २८ सरयूनामक नदी अयोध्येजवळ आहे तिच्या तीरीं. २९ दशरथ. ३० सुशोभित ( करी ). ३१ सरयूला. एथें रमणी याची आवृत्ति आली आहे.

[1]अजिन दंड तशी [2]कुशमेखला धरुनि हा जंव [3]दीक्षित जाहला,
तंव यया बहु मानिति सज्जन [4]शुभवहा [5]भव हा मनिं जाणुन.२१
सुर[6]समाजहि मानितसे भला [7]अवभृथें [8]प्रयत प्रभु जाहला,
नमवि मस्तक भूमिपती पहा [9]वनमुचीं [10]नमुचिद्विषि मात्र हा.२२
बहुत माजुनियां [11]दनुजव्रजें [12]त्रिदश पीडियले कृतिनें [13]निजें,
गमन [14]नाकिं करोनि करी स्वतां [15]प्रबल हा [16]बलहास सहायता;
रविस झांकित धूळ नभामधीं दबवि ती रिपुरक्तवशें सुधी,
अशिच [17]अग्रग युद्धि करी स्वतां [18]प्रबल हा बलहास [19]सहायता.२३
मग [20]सुरेशसमा अजनंदना [21]जणुं फुलांसह ये तव वंदना,
ऋतु वसंत जनां सुखदायक [22]रुचिर तोचि [23]रतोत्सवकारक.२४
तंव [24]उदीचि दिशेप्रति जावया अरुण तो फिरवी अपुल्या [25]हयां,
ह्मणुनियां रथिं संस्थित तो [26]निजीं,[27]विमल या [28]मलयास रवी त्यजी.२५
प्रथम मोहर ये मग पल्लव, मग [29]पिकभ्रमरावलिचे [30]रव,
क्रम असा बहु दे जनतुष्टिला नवनवी वन वी [31]ऋतुसृष्टिला.२६

---

१ कातडें (मृगाचें). २ दर्भाची मेखला. ३ यज्ञाची दीक्षा घेतलेला. ४ कल्याणकारक ऐसा हें यया याचें विशेषण. ५ शिव. यज्ञदीक्षा घेतली म्ह० अजिनादिक धारण करावीं लागतात. व यज्ञ करणारा यजमान हा शिवाची अष्टमूर्तींपैकीं एक मूर्ती होय या शास्त्रप्रसिद्धीस अनुसरून हें वर्णन आहे. ६ देवसमुदाय. ७ यज्ञांतस्नानास अवभृथ म्हणतात तें महापावन गणलें आहे. ८ शुद्ध. ९ जल देणारा (हें सप्तम्यंत विशेषण). १० नमुचि या नांवाच्या दैत्याचा द्विट् म्ह० शत्रु अर्थात् इंद्र त्या इंद्राविषयीं मात्र हा दशरथ राजा मस्तक नमवीत असे. इंद्राहून दुसऱ्या कोणासही तो नमस्कार करीत नसे असा भाव. ११ दैत्यसमुदायानें. १२ देव. १३ आपुल्या ( कृतीनें म्ह० कृत्यानें अर्थात दांडगाईनें). १४ स्वर्गास. १५ बलाढ्य. १६ बलहा म्ह० इंद्र त्यास (सहायता करी). १७ अग्रभागीं म्ह० इंद्राच्याही पुढें होऊन युद्ध करी असा अर्थ. १८ हा चरण वरील चरणाप्रमाणेंच जाणावा. १९ मूळ संस्कृत २३व्या पद्याचे हे दोन श्लोक केले आहेत परंतु वृत्त तेंच आहे. २० इंद्रतुल्या (अजनंदना). २१ दशरथाला वंदन करण्याकरितांच जणुं वसंत फुलांसहित आला अशी उत्प्रेक्षा. २२ मनोहर. २३ सुरताविषयीं उत्सव देणारा (असा वसंत ऋतु). २४ उत्तर दिशेप्रत. २५ घोड्यांस. २६ आपुल्या हें रथाचें विशेषण. २७ (हें रथाचें विशेषण). २८ मलयनामक पर्वतास. हा पर्वत दक्षिणेकडे आहे त्याकडून सूर्य उत्तरेस फिरतो तेव्हां उत्तरायण होतें या गोष्टीस लक्षून हें वर्णन आहे.

कोकिल व भ्रमर यांच्या समुदायाचे (रव). ३० शब्द. ३१ सृष्टिला ऋतु हा वरील,

[1]दशरथाप्रति याचकमंडळी तशि सरोवरिं ज्या भ्रमरावली,
तदभिवेष्टित होउनियां भली कमलिनी मलिनीकृत दीसली. २७
नचि अशोकभवें सुमनेंचि तीं युवमनाप्रति [2]मादक भासती,
रुचिर पल्लव ही तंव निश्चित मद[3]यिता दयिता[4]श्रुतिसंस्थित. २८
कुर[5]बकोद्भव पीउनि [6]सन्मधू भ्रमर गुंगति, येइ जईं [7]मधू,
बघुनि हें ह्मणती "भ्रमरीं दिली [8]कुरबका [9]रवकारणता भली." २९
[10]बकुलशाखिस येउनियां फुलें [11]अलि पिती [12]मधु [13]तद्भव चांगलें,
उपवनांत मिळे तरुला जंव [14]सुवदनावदनार्पित [15]आसव. ३०
[16]मधुरमार्पित [17]किंशुकिं चांगलें मुकुल[18]जाल तईं बहु शोभलें,
क्षत जसें [19]वधुनें पति[20]च्या [21]नखें त[22]नुस तें नुसतें दिधलें निकें. ३१

मोहर पल्लवादिकांच्या क्रमानें नवनवी बनवी असा अन्वय. तरुसृष्टिला असें पाठांतर या पाठीं ऋतु हा कर्ता अध्याहृत जाणावा. रुचि सृष्टिला या पाठीं शोभा बनवी असा अन्वय या पाठीं वन वी अशीं पदें करून वन हें सृष्टीला नवनवी रुची वी असा अन्वय जाणावा.

१ दशरथ राजाच्या भोंवतीं जशी याचक मंडळी मिळे तशी सरोवरांत भ्रमरावली मिळून त्यांनीं वेष्टित अशी कमलिनी म्हणजे पद्मिनी ही होऊन मलिनीकृत म्हणजे काळी दिसूं लागली. असा अन्वयार्थ जाणावा. २ मद करणारीं यांचा संबंध अशोकभवें सुमनें याजकडे. ३ मदकारक हें पल्लव याचें विशेषण. ४ स्त्रियांच्या कानावर ठेवलेला. अशोक वृक्षाचा पल्लव वसंत ऋतूंत तरुण स्त्रिया कानावर खोंवितात या गोष्टीस लक्षून हें वर्णन आहे. अशोक वृक्षाच्या फुलांनींच युव्याच्या म्ह० तरुणाच्या मनाला मद होऊं लागला इतकेंच नव्हे तर स्त्रीकर्णस्थित असा अशोकपल्लवही पाहून त्याच्या मनाला मद होता झाला असा श्लोकार्थ. ५ कुरबकनामक वृक्षाचें ( सन्मधु ). ६ चांगला मकरंद. ७ वसंत ऋतु. ८ कुरबक वृक्षास. ९ शब्द करण्याची हेतुता. (कुरबकाला दिली असा अन्वय). एथें रबका या अक्षरत्रयाची आवृत्ति असून व आणि ब यांचें सावर्ण्य विवक्षित आहे. १० बकुळ वृक्षास. ११ भ्रमर. १२ मकरंद. १३ बकुळाच्या फुलांतील ( मधु ). १४ सुवदना म्ह० स्त्रिया यांच्या तोंडांतून पडलेलें असें ( आसव ). १५ मद्य. स्त्रियांनीं तोंडांत मद्याचा चूळ घेऊन तो बकुळ वृक्षावर टाकिला असतां त्याला तत्काल फुलें येतात अशी कविप्रसिद्धि आहे. तदनुसार हें वर्णन आहे. १६ मधु म्हणजे वसंत तत्संबंधी रमा म्ह० लक्ष्मी तिनें अर्पिलेलें असें (मुकुलजाल). १७ पळसाच्या वृक्षावर. १८ कळ्यांचा झुबका. १९ स्त्रीनें. २० पतिच्या या पदाचा संबंध तनुस या शब्दाकडे जाणावा. नखें याजकडे नव्हे. २१ नखाच्या योगानें. २२ शरीरास. वसंत लक्ष्मीनें पळसाच्या वृक्षास

क्षत रदीं[1] अधरास[2] वधूचिया बहुत पीडितसे हिम[3] जें तया,
निजकरीं[4] करि दूर, अशी बरी रविकृती[5] विकृती[6] हिमजा[7] हरी[8]. ३२
मलयमारुतकम्पितपल्लवीं[9] उपवनीं[10] जणुं भावचि[11] दाखवी,
मदकरी[12] सहकारलता[13] जनां सकलिकां[14] कलिकासहिता[15] मना. ३३
बसुनियां सहकारलतेवरी[16] धरुनि पल्लव चंचुपुटांतरीं,
युवजनां[17] मदनोदय[18] सत्वरी पिक[19] मनीं कमनीयरवें[20] करी. ३४
गमति वन्यलता[21] तंव नर्तकी[22] विमल दंतरुची[23] सुमनें[24] निकीं,
भ्रमरझंकृति[25] गायन तेंचि रे किसलयें[26] सलयें कर ते बरे. ३५
बहुत शुभ्र विधूपरि[27] जें मधू[28] पिति व पाजिति तें पतितें वधू,
मदनदीपन त्या करिती मनीं सुनयना[29] नयनान्तविलोकनीं[30]. ३६
विलसती ऋतुमाजि यया तशा स्मितमुखी[31] कलकांचि[32] वधू जशा,
विकचतामरसा[33] गृहवापिका[34] मदकलोदकलोलविहंगिका[35]. ३७

---

आलेल्या तांबड्या कळ्यांचा झुबका स्त्रीनें नखेंकरून पतीच्या तनूस केलेल्या क्षताप्रमाणें दिसूं लागला असा भावार्थ.

१ दातांनीं. २ अधरोष्ठास. ३ शैत्य. ४ आपल्या किरणांनीं. ५ सूर्याचें करणें. ६ विकार. ७ शैत्यानें झालेली हें विकृतीचें विशेषण. ८ दूर करी. ९ मलयपर्वतसंबंधी वायूनें कांपणारे जे पल्लव तीहींकरून. १० बागांत. ११ हावभाव. १२ मद करणारी. १३ आंब्याची लता. १४ सकलांस. १५ कलिकायुक्त अशी हें सहकारलता हिचें विशेषण. मलयपर्वतावर चंदन वृक्ष असतात त्या योगानें तत्संबंधी वायु सुगंध असतो याकडेही एथें पहिल्याच पदांत लक्ष्य आहे. १६ आम्रलतेवर. १७ तरुणजनाला. १८ कामोद्भव. १९ कोकिल. २० मनोहर शब्देंकरून. २१ वनांतील वेली. २२ नाचणाऱ्या (कळवंतिणी). २३ दंतकांति. २४ फुलें. २५ भ्रमरांचे गुंजारव. २६ पल्लव एथें वन्यलता ह्याच नर्तकी, सुमनें हींच त्यांची दंतकांति भ्रमरशब्द हेंच गायन किसलयें हेच कर म्ह० हात गमती असें सावयवरूपक बांधिलें आहे. २७ चंद्रासारिखें. २८मद्य. २९ स्त्रिया. ३० नयनांतेंकरून जीं अवलोकनें तीहींकरून मदनदीपन करिती असा अन्वय. एथें स्त्रियांचें स्वतः मद्यपान करून आपलें उष्टें मद्य पतीस पाजावें अशी जी पानक्रीडा तिजकडे लक्ष्य आहे. ३१ किंचित् हास्ययुक्त मुखें ज्यांचीं (अशा वधू). ३२ अव्यक्त मधुर शब्दयुक्त आहेत कांची म्हणजे मेखला ज्यांच्या (अशा वधू). ३३ विकसित झालीं आहेत कमलें ज्यांचे ठायीं (अशा गृहवापिका). ३४ घरांतील विहिरी. ३५ मदेंकरून कलकल शब्द करणारे उदकसंबंधीं चंचल पक्षी ज्यांच्या ठायीं अशा (गृहवापिका) गृहवापिकेंमध्यें कमलें विकसित झालीं होतीं व जलसंबंधी

वदन पांडु दिसे विधुदर्शनीं बहुत कार्श्यहि ये तनुलागुनी,
वधुच खंडित[1] ही तव यारिती रजनि[2]ते जनि ते बुध मानिती.३८
विमलें[3] शुभ्र पडे शुभ्र चंद्रिका नर तशा सुख पावति बायका.
श्रम हरोनि तयां बहु दे रती तंव निशाकर साकर जेवि ती.३९
वन[4]रमाकनकाभरणें शुभें बहुत रक्त[5] हुताशन[6]सन्निभें,
दयित[7]दत्त अशीं कुसुमें, तयां[8] धरिति यारिति या स्वशिरीं स्त्रिया.
बहुत कृष्ण अशा अलिसंहती जंव फुलांवर येउनि बैसती,
तंव वनस्थलि रम्य दिसे कशी न तिलकें[10]? तिलकें प्रमदा जशी.४१
कुसुमिता[11] विलसे नव[12]मल्लिका मदसुगंधि व पल्लवयुक्तका,
निरखितां युवतीपरि सत्वरी नर तिला[13] रतिला धरि अंतरीं.४२

---

किंवा जलप्रिय पक्षी त्यांच्या तीरीं मदेंकरून मंजुल शब्द करीत होते म्हणून त्या गृहवापिका, स्मितमुखी व शब्दयुक्त मेखला ज्यांच्या अशा स्त्रियांप्रमाणें शोभूं लागल्या असा तात्पर्यार्थ.

१–२ वासकसज्जिका अभिसारिका इत्यादि नायिकांचे प्रकार शृंगारप्रकरणीं वर्णिले आहेत त्यांत एक खंडिता नायिका आहे तिचें मुख चंद्रदर्शनीं पांढरें होतें व शरीर कृश होतें. त्या खंडित वधूप्रमाणें वसंत ऋतूच्या रात्रीला बुध म्हणजे जाणते लोक मानिते झाले. कां कीं चंद्रोदयानें रजनीमुख (रात्रीचा आरंभकाळ ह्यालाच रजनीमुख म्हणतात). पांढरें होतें म्हणजे चांदिणें पडून पांढरें दिसतें व तिच्या शरीराला कृशता येते म्हणजे त्याकाळीं रात्री लहान होते. ३ शुभ्र चांदिणें पडूं लागल्यामुळें नरनारी सुख पावूं लागल्या. आणि साकर जशी श्रम दूर करून संतोष देते तसा चंद्र श्रम दूर करून हर्ष देता झाला. या श्लोकांतील चतुर्थचरणीं अक्षरसमुदायाची आवृत्ति साधावी तशी साधली नाहीं. ४ वनलक्ष्मीचीं सोन्याचीं भूषणेंच अशीं. (कर्णिकार वृक्षाचीं कुसुमें म्ह० फुलें). ५ लाल. ६ अग्नीसारिखीं. ७ प्रियपतींनीं दिलेलीं अशीं. ८ फुलांना (अर्थात् कर्णिकार वृक्षाच्या फुलांना, कारण तीं लालजर्द असतात). ९ वनश्रीचीं सुवर्णभूषणेंच व अग्नीसारिखीं लालजर्द अशीं पतींनीं दिलेलीं जीं कर्णिकार वृक्षाचीं फुलें त्यांतें त्याकाळीं स्त्रिया मस्तकीं धारण करित्या झाल्या, असा श्लोकार्थ होय. १० कपाळीं कस्तूरीचा तिलक लावल्याच्या योगानें जशी प्रमदा म्ह० स्त्री शोभते तशी काळ्या भ्रमरसमुदायानें वेष्टित जो तिलक वृक्ष त्याच्या योगानें वनस्थली रम्य कशी दिसणार नाहीं? तर दिसेलच दिसेल असा या श्लोकाचा अर्थ. ११ पुष्पयुक्ता. १२ नवीन मोगरीची वेल. १३ त्या नवमल्लिकेला युवतीपरी म्ह० तरुणीच्या सारिखी निरखितांच नर अंतरीं रतिला धरी असा अन्वय एथें कुसुमिता

बहुत लाल नव्या चुनड्या बऱ्या[1] श्रुतिसमर्पित ज्या यवमंजे[2]ऱ्या,
तशिच ऐकुनि तीं पि[3]ककूजितें [4]नररमणी [5]रमणीजित होति ते.४३
ति[6]लकमंजरि पांढरि ती वरी भ्रमरयोग घडे तव ती करी,
अलकमौक्तिक संगतिसें त्वरें अति चमत्कृतिमत्कृतितिचित्तरे.४४
तरुचिया कुसुमांतिल धूलि ते वनर[7]मामुखशोभन चूर्ण तें,
[8]अलितती तव जाय ते[9]याकडे उपवनीं पवनीं वर [10]जे उडे.४५
बसुनियां [11]सुख हिंदुळियावरी भयमिषें त्यजि रज्जुस सत्वरी,
पतिस आवळि तो [12]अबलाजन भुजलते जलतेप्रति नेऊन. ४६
" न दवडा रुसुनी वय साजणी, नचि मिळे जर जाय हतांतुनी,"
*पि[13]करवें जणुं ऐकुनियां मता स्मरमती रमती तंव योषिता.४७

---

मदसुगंधि इत्यादि विशेषणेंकरून नवमल्लिकेला युवतीचें साम्य व्यंजित झालें आहे.

१ कानावर ठेवलेल्या. २ यवांचे अंकुर. ३ कोकिलांचे शब्द. ४ नरश्रेष्ठ. ५ रमणी म्ह० स्त्रिया त्यांनीं जित म्ह० जिंकिलेले. स्त्रियांनीं यवांकुर कानांत खोंचण्याच्या रीतीस अनुसरून हें वर्णन आहे. ६ तिलक वृक्षाची पांढरी मंजरी आणि भोंवरे यांचा योग पाहून स्त्रियांचे केशपाश आणि मौक्तिकें यांच्या संयोगाच्या दर्शनेंकरून जसें कृती म्ह० धन्य पुरुष यांचें चित्त अत्यंत चमत्कृतियुक्त होतें तसेंच अलि चमत्कृतिमत् होतें झालें असा या श्लोकाचा भावार्थ. एथें मत्कृति या अक्षरत्रयाची आवृत्ति साधिली आहे. परंतु ती चतुर्थ चरणांचें पहिलें अक्षर सोडून पुढल्या तीन अक्षरांची असावी ती पहिलीं तीन अक्षरें सोडून पुढील तीन अक्षरांची आली आहे इतका मागून आलेल्या क्रमांत भेद झाला आहे. ७ वनश्रीच्या मुखाला लावण्याचें सुंदर चूर्णच जें (अशी कुसुमधूली). ८ भ्रमरपंक्ति. ९ त्या वनश्रीमुखचूर्णाकडे. १० जे अलितती. ११ सुखकारक असा टांगलेला झोंपाळा ( त्यावर बसून ). १२ स्त्रियांचा समुदाय. एथें जलते या अक्षरत्रयाची आवृत्ति साधली आहे. आणि ल व ड यांचें सावर्ण्य विवक्षित आहे. उन्हाळ्यांत स्त्रीपुरुषांनीं झोंपाळ्यावर बसून झोंके घ्यावे अशी एक प्रकारची क्रीडा आहे तीस लक्षून हें वर्णन आहे. आणि झोंके घेतांना पडण्याच्या भीतीचें मिष करून पतीच्या गळ्यांत स्त्रिया भुजलता घालून त्यांस आंवळून धरीत असा या श्लोकाचा भावार्थ आहे. * पिकरवें स्मरशासन ऐकुनी विरमती; रमती जणुं कामिनी ( हें पाठांतर ). १३ न दवडा इत्यादि श्लोकपूर्वार्धानें उक्त जी स्मरमती म्हणजे स्मरशासन म्ह० मदनाची आज्ञा हुकूम, पिकरवें म्ह० कोकिलांच्या शब्दावरून जाणून जणूं त्याकाळीं योषिता म्ह० स्त्रिया रमती असा श्लोकार्थ. आणि वसंतकालीं कोकिलाचा शब्द ऐकतांच स्त्रिया अत्यंत कामातुर होऊन पतींशीं रममाण होत्या झाल्या; मानवती होऊन रुसून बसण्याचें धैर्य त्यांस राहिलें नाहीं, इतकें का-

अनुभवोनि मधूत्सवसोहळे[1] पुरवुनी तरुणीजनडोहळे,
मग मृगव्यमनोरथ[2] अंतरीं नरमणी[3] रमणीयें[4] तनू धरी. ४८
"बहु उपद्रव देति वनीं स्वयें तशि अनेकविधें करिती भयें,"
"ह्मणुनि पाप अणूहि विचारितां न मृगये मृग येरिति मारितां;"[5]
"सुख[6] विषाद तशीं पशुचीं भयें परिचयें कळताति सुनिश्चयें,"
"चलहि लक्ष्य हणूं नर शीकती" "सुजन ते जन ते उपदेशिती,"
"निरसते जडता तनुची खरें श्रमसहिष्णुपणा तिरा ये त्वरें,"
"गुण असे मृगयेमधि राहती" "सुजन ते जन ते उपदेशिती;"
जंव अमात्य[7] असे[8] नृपतीप्रती बहु मृगव्यगुणस्थिति[9] वर्णिती;
बसुनि जाय सवेग हयावरी नृप[10] वना पवनापरि[11] सत्वरी. ४९
नृपति चाप गळीं लटकाउनी तनुस वेष वनार्हचि[12] घालुनी,
बसुनि[13] जाय सवेग हयावरी नृपवना पवनापरि सत्वरी;
बहु जवें हय धांववि तो जईं निबिड धूलि उडे गगनीं तईं
निरखुनी ह्मणती जन अंतरीं नृसविता सवितें[14]न नभीं[15] करी. ५०
कुसुममाळ कचांप्रति[16] वेढुनी कवच पत्रसवर्णचि[17] घालुनी,

---

मोद्दीपन झालें असा भावार्थ. एथें स्मरमती या शब्दानें स्मरशासन द्यावें लागतें तें प्रशस्त न वाटल्यामुळें पाठांतर कल्पिलें आहे त्यांत विरमती म्ह० रुसणें फुगणें यापासून विराम पावून म्ह० ते सोडून रमती असा अर्थ अवशिष्ट भाग पूर्ववत् जाणावा.

१ वसंतोत्सवाचे सोहळे. २ मृगव्य म्ह० मृगया त्याविषयींचा मनोरथ म्ह० इच्छा. ३ नरश्रेष्ठ ( राजा दशरथ ). ४ रमणीय असी तनू म्ह० शरीर ज्याचें जसा (नरमणी) ५ वनांत उपद्रव देणारे व भय देणारे या रीतीचे मृग मारिले असतां मृगयेला ( मृगयेंत ) अणुमात्रही पाप नाहीं असा या श्लोकाचा अर्थ. ६ पशूचीं सुखभयादिक कळतात, चंचल लक्ष्य म्हणजे निशाण मारतां येतें असें सुजन म्हणजे मृगयागुण जाणते पुरुष जनता म्ह० जनसमुदाय त्यास उपदेशिती म्ह० सांगतात, असा श्लोकार्थ, एथील सुजन ते इत्यादि चतुर्थ चरण या व पुढील श्लोकांत ध्रुवपदाप्रमाणें घातला आहे. ७ प्रधान. ८ असे म्ह० पूर्वोक्त तीन श्लोकांत सांगितल्याप्रमाणें. ९ मृगयासंबंधी गुण ( वर्णिती ). १० दशरथ राजा. ११ वायूप्रमाणें ( वनाप्रत जाय ). १२ वनांत हिंडण्याच्या सोईचा. १३ हें श्लोकार्ध ध्रुवपदाप्रमाणें मागील व या श्लोकांत घातलें आहे. नरांत सवित्यासारिखा म्ह० सूर्यासारिखा असा दशरथ राजा. १४ आच्छादनयुक्त (असें करी ). १५ आकाशाला. १६ केशांस. १७ पानाप्रमाणें वर्ण ज्यांचा असें (कवच).

धरितसे [1]गतिचंचल कुंडला [2]सुरुचिरा रुचिरा[3]कृति तो भला.५१
तनुच होति [4]जयां वनिच्या लता [5]अलिहि दृष्टि अशा वनदेवता,
नृपतिला बघती [6]हयवाहना [7]सुनयना नयना[8]शितदुर्जना. ५२
उखर पंकिलभूमि असे कुठे करुनि ती निट, मारुनि चोरटे,
नरपती प्रविशे मग *सद्गुणीं [9]मृगवयोगवयोपचितीं वनीं. ५३
चढवुनी नृप सत्वर [10]मौर्विलीं [11]निशितें [12]तूणितुनी शर काढिला,
चिडति ऐकुनि [13]यद्रव [14]केसरी अशि [15]सचापल [16]चापलता धरी.५४

[प्र.ति.] मोठा पुढें हरिण, मागुनि एणि येती,
स्तन्यार्थ पाडस जयां पथिं आडवीती;
तोंडामधें तृण असा मृगयूथ त्याच्या,
झाला पुढें प्रकट तें नरपाळकाच्या. ५५
[18]त्यांच्यावरी करि धरापति चाल जेव्हां,

---

१ गमनाच्या योगानें चंचल अशा कुंडला ( धरितसे ). २ मनोहरा ( हें कुंडलाचें विशेषण ). ३ सुंदराकृति ( हें तो म्ह० राजा याचें विशेषण ). ४ ज्या वनदेवतांच्या (वनलता याच तनू आणि अलि म्ह० भ्रमर हेच दृष्टी). ५ भ्रमर. ६ घोड्यावर बसलेल्या अशा ( नृपतिला ). ७ ( हें नृपतिला याचें विशेषण ). ८ नीतीच्या योगें नाशाप्रत पावविले आहेत दुष्ट जन ज्यानें अशा ( हेंही नृपतिला याचें विशेषण ). दृष्टीला भ्रमर-सादृश्य मानण्याचा कविसंप्रदाय आहे त्याकडेस " अलिहि दृष्टि " या वाक्यांत लक्ष्य आहे. तसाच सुकुमार शरीराला लतासादृश्य कल्पिण्याचाही कविसंप्रदाय आहे त्याकडेस "तनुच होति जयां वनच्या लता " या वाक्यांत लक्ष्य आहे * 'तो तिथें मृगवयां गवयां न उणें जिथें.' असें पाठांतर ९ मृग म्ह० हरिणें, वयस् म्ह० पक्षी आणि गवय म्ह० एके जातीचे पशु यांहींकरून भरलेलें (हें वनीं याचें विशेषण). पाठांतरीं मृग व वय यांना आणि गवय यांना जिथें उणें नव्हतें असा अर्थ. जेथें मृग पक्ष्यादिक विपुल अशा वनांतील उखीरवाखीर चिखलाच्या वगैरे वाईट जागा आधीं नीट करवून व तेथील लुटारू चोरटे वगैरे घालवून देऊन नंतर त्या वनांत राजा मृगयार्थ प्रवेश करिता झाला असा श्लोकार्थ होय. १० धनुष्याच्या दोरीला. ११ तीक्ष्ण. १२ भात्यांतूनि. १३ ज्या चापलतेचा शब्द (ऐकुनी). १४ सिंह. १५ चपलतायुक्त. १६ धनुष्य. १७ मोठा हरिण पुढें आणि एणी म्ह० हरिणी मागें व त्यांचीं पाडसें पिण्याकरितां त्यांच्या पायांत गुंडाळत आहेत, मुखांत तृणें आहेत असे प्रकारचा एक मृगयूथ म्ह० मृगसमुदाय राजाच्या पुढें दृष्टीस पडला. १८ त्याच्यावर राजा धावून गेला असतां हरिणें रानांत चोहींकडे भडकलीं त्यांच्या भयानें चंचळ झालेल्या दृष्टीमुळें, वायूनें कांपणाऱ्या कमलांनीं जसें वन (जल) काळेंभोर दिसतें तसें सारें वन काळेंभोर दिसूं लागलें, असा श्लोकार्थ.

चौंहीकडे भडकती मृग रानिं तेव्हां;
झालें निळेंचि वन तच्चलदृष्टिपातें,
होतें जसें पवनकंपित पंकजीं तें. ५६
तो[1] [2]कृष्णसारहननार्थ शरास घेई,
[3]त्याची त्वरें [4]सहचरी तंव आड येई,
देखोनि [5]कामिनरपाळ दयार्द्र झाला,
[6]आकृष्ट ही शर [7]तयें तंव आवरीला. ५७
नेमी शरा इतर ही हरिणां वधाया,
दृष्टी भयें चपल पाहुनि तो [8]तदीया,
[9]प्रौढांगनानयन आठवुनी मनांत,
होई ढिला [10]सुदृढमुष्टि तथापि हात. ५८
जीं [11]सूकरें बसुनि [12]पल्वलपंकिं होतीं,
[13]मुस्ता मुखांतिल गळे तशि धांवतीं तीं,
मुस्ता व [14]कर्दम तसा निरखोनि त्यांचा,
तो माग लावित धरापति जाय साचा. ५९
आकर्ण ओढुनि शरा जरि भूपती हा,
[15]जंघीं खिळी तरुवरांशिं वनीं वराहां,
फिदारुनी निजसटीं[16] अति कोपुनीया;
[17]नेणोनि [18]विद्धतनु पाहति त्या वधाया. ६०
[19]एकेया अरण्यमहिषास हणोनि नेत्रीं,
बाहेर जाय सहसा प्रविशूनि गात्रीं,

१ राजा. २ कृष्णसार म्ह० मोठा हरिण त्याच्या वधार्थ. ३ त्या हरिणाची. ४ स्त्री. ५ कामुकजनांस वियोगदुःखें कशीं दुःसह असतात हें स्वतां जाणणारा. ६ आकर्ण ओढला होता असा (शर). ७ त्यानें (राजानें). ८ हरिणांच्या. ९ प्रौढ स्त्रियांचे नेत्र (सादृश्यामुळें मनांत आठवून). १० मूठ बळकट वळली होती असा (हात ढिला झाला). ११ डुकरें. १२ डोबकणाच्या चिखलांत (बसून होतीं). १३ लव्हाळे ( रानडुकरें लव्हाळे खात असतात अशी काव्यप्रसिद्धि आहे ). १४ चिखल. १५ डुकरांना जांघेंत बाण मारून झाडांशीं खिळून टाकी. १६ आंगावरील केंस. १७ न जाणून. १८ विद्धशरीर झालेलें. ( आपण विद्धशरीर झालों हें लक्ष्यांतही न येतां तीं डुकरें कोपानें राजासच मारण्यास यत्न करूं लागलीं यावरून डुकरांच्या कोपाचा व राजाच्या शरलाघवाचा अत्युत्कर्ष व्यंजित झाला ). १९ एके रानमहिषाचे डोळ्यांत राजानें बाण मारिला तो त्याच्या शरीरांत शिरून बाहेर निघून गेला तरी त्यास रक्त माखलें नाहीं व

रक्तें अलिप्तचि पडे मग आधिं तोकीं,
पाडी वधोनि महिपा शर तो, विलोकी ! ६१
[1]गेंड्यास तो करि लघू बहुधा विषाणा,
छेदूनियां शरगणीं वनिं भूपराणा,
सोसे न त्यास जनिं शृंगचि उद्धतांचें,
ह्मारी तयास ह्मणुनी नचि जीव त्यांचे. ६२
तेव्हां [2]देरीस्थ चवताळुनि वाघ येती,
[3]शाखाचि [4]सर्जतरुच्या दिसती [5]वनांतीं,
त्यांचीं मुखें त्वरित बाणगणीं भरी कीं,
[6]तूणीच तीं गमति सर्व जनां विलोकी. ६३
[शा.] सिंहालाही मारण्या चापघोपा दावोनी तो पावथी त्यांस रोषा,
जाणों [7]त्यांचा [8]राजशब्दासहिष्णु होवोनीयां जाहला [9]तज्जयिष्णु. ६४
[प्र.] ज्या [10]दुष्टीं [11]करिकुलकुंभ फाडियेले,
त्यां सिंहां [12]शरनिकरीं विदारियेलें,
एणें मी [13]निजकरिंचे [14]रणोपकार,
फेडीले मनिं समजे असें नृवीर. ६५
[औ.] [15]चमरांभंवती फिरोनि त्यानें हरिलें तें [16]सित [17]चामरां तयानें,

---

तो जमीनीवर पडल्यावर मग तो रानमहिप पडला असा श्लोकार्थ आहे. एणेंकरून राजाच्या बाणाची अतितीव्रता व अतिचपलता ध्वनित झाली.

१ गेंड्यांना त्यांचीं विषाणें म्हणजे शिंगेंच तोडून तो लघु म्ह० हलके करी कां कीं उन्मत्तांचें शिंगच त्यास सोसत नसे म्हणून तेंच मात्र तो घेई त्यांचें जीवित घेत नसे असा श्लोकार्थ. २ दरींतले. ३ फांद्याच. ४ सर्जनामक वृक्षाच्या ( शाखाच ). ५ वनांमध्यें. ६ भातें (वाघाचीं वासलेलीं तोंडें बाणांनीं भरल्यामुळें तीं भातेच दिसूं लागलीं असा भाव. ७ त्या सिंहाचा. ८ मी राजा असतां सिंहांस राजा हा शब्द कसा लावितात अशा ईर्ष्येनें. ९ त्या सिंहाच्या जयाविषयीं इच्छा करणारा असा. ( सिंहाला मृगराज असें ह्मणतात म्हणून त्या राजशब्दावरूनच ईर्ष्यायुक्त होऊन सिंहास जिंकूं लागला काय अशी उत्प्रेक्षा केली ). १० ज्या दुष्ट सिंहांनीं. ११ हत्तींच्या समुदायाचीं गंडस्थळें. १२ बाणसमुदायांनीं. १३ आपल्या हत्तींचे. १४ रणांतील उपकार. (मी फेडिले असें राजा मनांत समजला). १५ (चमर ह्मणून मृगविशेष असतात त्यांच्या शेपटाच्या शेवटास गोंडे असतात त्यांच्या चवऱ्या होतात). १६ पांढऱ्या शुभ्र. १७ चवऱ्यांतें. (शत्रूंचीं चामरेंच घेऊन संतुष्ट रहातसे तसा चमरांचींही चामरेंच हरण करून तृप्त राहिला त्यांस ठार मारलें नाहीं असा भाव).

रिपुभूपतिच्याहि चामरातें हरुनी जेंवि सुतुष्ट होय चित्तें. ६६

[मा.] नृपति[1] निज हयाच्या सन्निधानीं मयूरा,
बघुनिहि नचि मारी पाहुनीयां पिसारा,
सुरतिं सुटलि ऐसी आठवोनी सुवेणी,
निजमनिं वनितेची गुंफिलेली फुलांनीं. ६७

[रथो.] तन्मुखा[2] श्रमज घर्म पातला वायुलागुनि तया वनांतला,
मंद[3] शीतल सुगंधि चांगला, सर्व तो त्वरित शुष्क जाहला. ६८

[मंजु.] सचिवांस सांगुनि असें स्वकृत्यरे विपिनीं निरंतर नृपाळ तो फिरे,
चतुरा[4] प्रिया स्वपतिला करी जशी मृगया यया स्ववश ती करी तशी. ६९

[पुष्पि.] शयन[5] सुकुसुमें[6] दलेंहि[7] जेथें ज्वलित महौषधि[8] तेचि दीप जेथें,
तिथें[9] निज परिवार शून्य ऐसा क्रमि नृप रात्र कधीं स्वमंदिरींसा. ७०
निजसदनिं विशाल[10] दुंदुभीचे परिसुनि घोष उठे नृपाळ त्यांचे,
वनिं करिपतिचेचि कर्णतालीं[11] नरपति जागृति ये प्रभातकालीं,
निजसदनिं जसे सुतोष[12] देती दिनमुखिं[13] मंगल[14]वंदिगायनें तीं,
ईथेंहि[15] विपुल हर्ष होय त्यातें परिसुनि मंजुविहंग[16]कूजितातें. ७१

---

१ फुलांनीं गुंफिलेली अशी व सुरतकालीं सुटलेली अशी जी आपल्या स्त्रीची वेणी, त्या वेणीसारिखा मोराचा पिसरा पाहून तो मोर जवळ आला असतांही त्यास राजानें मारिलें नाहीं असा श्लोकार्थ. २ राजाच्या तोंडाला (श्रमामुळें घाम आला). ३ ( हीं वायूचीं विशेषणें ). ४ चतुर स्त्री आपल्या पतीला जशी वश करून टाकिते तशी या राजाला मृगया ही स्ववश करिती झाली (राजा फारच मृगयासक्त झाला असा भाव). ५ आंथरूण बिछाना. ६ चांगलीं कोमल फुलें. ७ पानें. ८ रानांत अशा कांहीं कांहीं वनस्पती आहेत कीं, त्यांचा रात्रीं दिव्याप्रमाणें प्रकाश पडतो तसल्या महौषधी (तेच दीप). ९ तेथें ( तसल्या वनांत). ( कोमल फुलें पानें यांचें आंथरुण; महौषधीचे दीप, अशा वनांत तो कधीं कधीं एकलाच रात्र कमीं असा श्लोकार्थ). १० मोठाल्या नौबदीचे (घोष). ११ हत्तीस मोठमोठे कान असतात ते हालले म्हणजे मोठा शब्द होतो त्या शब्दांच्या योगानें. १२ संतोष. १३ सकाळीं. १४ मंगलसूचक अशीं बंदीजनांचीं गायनें ( राजे लोकांकडे सकाळीं बंदीजन म्ह० भाटलोक मंगलकारक असे स्तुतिपाठ करीत असतात त्याकडे एथें लक्ष्य आहे). १५ या वनांतही. १६ मंजुल अशीं पक्ष्यांचीं कूजितें म्ह० शब्द यातें ( परिसुनि म्ह० ऐकुनी ) निजमंदिरीं मोठाले चुनौबदी ऐकून जसा तो सकाळीं जागा होई तसा एथें हत्तीच्या कर्णतालांनीं जागा होई. आणि घरीं भाट लोकांचीं गायनें ऐकून संतोष पावे तसा एथें प्रातःकाळीं मंजुल पक्षिशब्दांस ऐकून आनंद पावे असा श्लोकार्थ.

मग तो रुरुच्याचि पाठिमागें बसुनीं अश्विहि एकलाचि लागे,
बहु धांवत भूप शीघ्र आला तमसानाम नदीचिया तटाला. ७२

[स्वा.] कुंभनाद निघतां उदकांत हस्तिशब्द समजोनि मनांत,
तेंचि धोरण धरोनि शरा या सोडि वन्यमददंति वधाया. ७३

[वैता.] तंव जें [1]प्रतिषिद्ध राजया नृपती तेंचि करी दिनीं यया,
अतिनिंद्यपथींहि जाणते पद देती भ्रम पावुनीच ते ७४

[मत्त.] 'हा ताता' हें क्रंदित ऐकोनिच भ्याला,
शोधाया त्या [3]वेतसकुंजीं नृप गेला,
बाणें विद्धा पाहुनि तेथें मुनिपुत्रा,
खोंचे चित्तीं शल्यें जणुं तें नृप भित्रा. ७५

[व.ति.] कुंभावरी स्वतनु टेंकुनि जो [4]निदेला,
त्याचे समीप [5]हय सोडुनि भूप गेला,
तूं कोण हें जंव पुसे तंव [6]त्या श्रमानें,
मी शूद्र हें कळवि [7]तो [8]स्खलिताक्षरानें. ७६

त्याचेच [9]सांगिवरुनी [10]सहशल्य त्याला,
नेई [11]तदंधपितरांजवळी [12]सुताला,
जें जाहलें न समजोनिच दैवयोगें,
तें सर्व वृत्त नृप त्यांस [13]यथार्थ सांगे. ७७

ऐकोनि ते बहुत शोक करोनि त्याचे
तें शल्य काढिति करें [14]नृपनायकाचे,
झाला [15]गतासु सुत; [16]अश्रुजळेंच भूपा,
तो वृद्ध तापस वदे बहु उग्र शापा. ७८

---

१ राजानें वनगज मारूं नये असा शास्त्रतः निषेध आहे ह्मणून असें राजास निषिद्ध जें कर्म तें तो करिता झाला असा अर्थ. २ (कधीं कधीं जाणत्याचेंही पाउल भ्रमामुळें वाईट मार्गांत पडतें ). ३ वेताच्या जाळीमध्यें. ४ निजलेला पडलेला. ५ हय सोडून म्ह० घोड्यावरून उतरून त्याच्या समीप गेला असा अन्वय. ६ त्या राजाप्रत. ७ तो मुनिपुत्र. ८ गुंतत गुंतत शब्दानें. ९ माझ्या उरांत बाण खोंचला आहे तो उपटून न काढितां तसाच मला तूं माझ्या अंध व वृद्ध अशा मातापितरांजवळ घेऊन जा असें त्या मुनिपुत्रानें राजास सांगितलें त्यावरून. १० शल्य म्ह० बाण त्यासकट. ११ त्याच्या अंध पितरांजवळ (नेई). १२ त्यांच्या पुत्राला. १३ खरें. १४ राजाच्या हातानेंच पुत्राचें शल्य उपटून काढिते झाले असा अन्वय. १५ गतप्राण (झाला). १६ शाप देणें

रिपुभूपतिच्याहि चामरातें हरुनी जेंवि सुतुष्ट होय चित्तें. ६६

[मा.] नृपति निज हयाच्या सन्निधानीं मयूरा,
बघुनिहि नचि मारी पाहुनीयां पिसारा,
सुरतिं सुटलि ऐसी आठवोनी सुवेणी,
निजमनिं वनितेची गुंफिलेली फुलांनीं[1]. ६७

[रथो.] तन्मुखा[2] श्रमज घर्म पातला वायुलागुनि तया वनांतला,
मंद[3] शीतल सुगंधि चांगला, सर्व तो त्वरित शुष्क जाहला. ६८

[मंजु.] सचिवांस सांगुनि असें स्वकृत्यरें विपिनीं निरंतर नृपाळ तो फिरे,
चतुरा[4] प्रिया स्वपतिला करी जशी मृगया यया स्ववश ती करी तशी. ६९

[पुष्पि.] शयन[5] सुकुसुमें[6] दलेंहि[7] जेथें ज्वलित महौषधि[8] तेचि दीप जेथें,
तिथें[9] निज परिवार शून्य ऐसा क्रमि नृप रात्र कधीं स्वमंदिरांसा. ७०

निजसदनिं विशाल[10] दुंदुभीचे परिसुनि घोष उठे नृपाळ त्यांचे,
वनिं करिपतिचेचि कर्णतालीं[11] नरपति जागृति ये प्रभातकालीं,
निजसदनिं जसे सुतोष[12] देती दिनमुखिं[13] मंगलबंदिगायनें[14] तीं,
इथेंहि[15] विपुल हर्ष होय त्यातें परिसुनि मंजुविहंगकूजितातें[16]. ७१

---

१ फुलांनीं गुंफिलेली अशी व सुरतकालीं सुटलेली अशी जी आपल्या स्त्रीची वेणी, त्या वेणीसारिखा मोराचा पिसारा पाहून तो मोर जवळ आला असतांही त्यास राजानें मारिलें नाहीं असा श्लोकार्थ. २ राजाच्या तोंडाला (श्रमामुळें घाम आला). ३ ( हीं वायूचीं विशेषणें ). ४ चतुर स्त्री आपल्या पतीला जशी वश करून टाकिते तशी या राजाला मृगया ही स्ववश करिती झाली (राजा फारच मृगयासक्त झाला असा भाव). ५ आंथरूण बिछाना. ६ चांगलीं कोमल फुलें. ७ पानें. ८ रानांत अशा कांहीं कांहीं वनस्पती आहेत कीं, त्यांचा रात्रीं दिव्याप्रमाणें प्रकाश पडतो तसल्या महौषधी (तेच दीप). ९ तेथें ( तसल्या वनांत). ( कोमल फुलें पानें यांचें आंथरुण; महौषधीचे दीप, अशा वनांत तो कधीं कधीं एकलाच रात्र कर्मी असा श्लोकार्थ). १० मोठाल्या नौबदीचे (घोष). ११ हत्तीस मोठमोठे कान असतात ते हालले म्हणजे मोठा शब्द होतो त्या शब्दांच्या योगानें. १२ संतोष. १३ सकाळीं. १४ मंगलसूचक अशीं बंदीजनांचीं गायनें ( राजे लोकांकडे सकाळीं बंदीजन म्ह० भाटलोक मंगलकारक असे स्तुतिपाठ करीत असतात त्याकडे एथें लक्ष्य आहे). १५ या वनांतही. १६ मंजुल अशीं पक्ष्यांचीं कूजितें म्ह० शब्द यातें ( परिसुनि म्ह० ऐकुनी ) निजमंदिरीं मोठाले धुनौबदी ऐकून जसा तो सकाळीं जागा होई तसा एथें हत्तीच्या कर्णतालांनीं जागा होई. आणि घरीं भाट लोकांचीं गायनें ऐकून संतोष पावे तसा एथें प्रातःकाळीं मंजुल पक्षिशब्दांस ऐकून आनंद पावे असा श्लोकार्थ.

मग तो रुरुच्याचि पाठिमागें बसुनीं अश्विहि एकलाचि लागे,
बहु धांवत भूप शीघ्र आला तमसानाम नदीचिया तटाला. ७२
[स्वा.] कुंभनाद निघतां उदकांत हस्तिशब्द समजोनि मनांत,
तेंचि धोरण धरोनि शरा या सोडि वन्यमददंति वधाया. ७३
[वैता.] तंव जें [1]प्रतिषिद्ध राजया नृपती तेंचि करी दिनीं यया,
[2]अतिनिद्यपथींहि जाणते पद देती भ्रम पावुनीच ते ७४
[मत्त.] ‘ हा ताता ’ हें क्रंदित ऐकोनिच भ्याला,
शोधाया त्या [3]वेतसकुंजीं नृप गेला,
बाणें विद्धा पाहुनि तेथें मुनिपुत्रा,
खोंचे चित्तीं शल्यें जणुं तें नृप भित्रा. ७५
[व.ति.] कुंभावरी स्वतनु टेंकुनि जो [4]निदेलों,
त्याचे समीप [5]हेय सोडुनि भूप गेला,
तूं कोण हें जंव पुसे तंव [6]त्या श्रमानें,
मी शूद्र हें कळवि [7]तो [8]स्खलिताक्षरानें. ७६
त्याचेच [9]सांगिवरुनी [10]सहशल्य त्याला,
नेई [11]तदंधपितरांजवळी [12]सुताला,
जें जाहलें न समजोनिच दैवयोगें,
तें सर्व वृत्त नृप त्यांस [13]यथार्थ सांगे. ७७
ऐकोनि ते बहुत शोक करोनि त्याचे
तें शल्य काढिति करें [14]नृपनायकाचे,
झाला [15]गतासु सुत; [16]अश्रुजळेंच भूपा,
तो वृद्ध तापस वदे बहु उग्र शापा. ७८

१ राजानें वनगज मारूं नये असा शास्त्रतः निषेध आहे ह्मणून असें राजास निषिद्ध जें कर्म तें तो करिता झाला असा अर्थ. २ (कधीं कधीं जाणत्याचेंही पाउल भ्रमामुळें वाईट मार्गांत पडतें ). ३ वेताच्या जाळीमध्यें. ४ निजलेला पडलेला. ५ हय सोडून म्ह० घोड्यावरून उतरून त्याच्या समीप गेला असा अन्वय. ६ त्या राजाप्रत. ७ तो मुनिपुत्र. ८ गुंतत गुंतत शब्दानें. ९ माझ्या उरांत बाण खोंचला आहे तो उपटून न काढितां तसाच मला तूं माझ्या अंध व वृद्ध अशा मातापितरांजवळ घेऊन जा असें त्या मुनिपुत्रानें राजास सांगितलें त्यावरून. १० शल्य म्ह० बाण त्यासकट. ११ त्याच्या अंध पितरांजवळ (नेई). १२ त्यांच्या पुत्राला. १३ खरें. १४ राजाच्या हातानेंच पुत्राचें शल्य उपटून काढिते झाले असा अन्वय. १५ गतप्राण (झाला). १६ शाप देणें

" तूं अंत पावशिल वृद्धपणीं सुताचे,
शोकामुळेंचि मजसा;" " मम वाक्य साचें,"
डंखोनि शांत अहि होय तसाचि झाला,
तो तापस; क्षितिपतीहि वदे तयाला. ७९
" मी तों निपुत्रिक ह्मणोनिच शाप हाही,
मातें गमे तव अनुग्रहरूप पाही ",
" भू जाळितो ह्मणुनि येइ तयेस पीक,
यासाठीं अग्निसहि मान्य करीति लोक!" ८०
" आज्ञा करी मज मुने अदयासें कांहीं "
ऐकोनि हें मुनि वदे नरनायकाही,
" पुत्रासमेत अमुतें दहनांत जाळ,
ही आमुची पुरवि तूं नरपाळ आळ!" ८१
तों पातले सकल सैनिक भूपतीचे,
साधोनि त्यां करवि वांछित त्या मुनीचें,
तो जावया परत तेथुनियां निघाला,
पापामुळें बहुत जो च्युतधैर्य झाला,
पोटीं जळे अंळधिच्या वडवाग्नि जैसा,

---

झालें म्हणजे हातांत पाणी घेऊन शाप तोंडानें बोलून तें पाणी सोडावें अशी रीत होती तिला लक्षून हें वर्णन आहे. एथें अश्रूचेंच पाणी त्यानें घेऊन शाप दिला. एणें-करून अश्रुजलाची विपुलता आणि तद्द्वारा शोकाचा अतिशय हीं ध्वनित होतात.

१ मजसारिखा ( पुत्रशोकानें तूं मरशील ). २ माझें वाक्य खरें होईल खोटें व्हावयाचें नाहीं. ३ अहि म्ह० सर्प हा डसून शांत होतो तसा हा तापस शाप देऊन शांत झाला; मग क्षितिपती म्ह० राजा त्याला म्हणतो असा अन्वय. ४ अग्नी हा भूमी जाळितो त्यामुळें तिला पीक चांगलें येतें याकरितां लोक अग्नीला उपकारकच मानितात. तसा तुझा शाप मज अपुत्रास पुत्र देणारा असल्यामुळें अनुग्रहरूपच आहे असा भाव. ५ निर्दयास मज कांहीं आज्ञा करीं असा अन्वय. ६ राजाला ही ( वदे ). ७ ( हें संबोधन ). ८ इच्छा मनोरथ. ९ मुनिपुत्राच्या वधजन्य पापामुळें. १० समुद्राच्या पोटांत मोठा अग्नि आहे त्यास वडवानळ म्हणतात तो समुद्रास नेहेमी जाळीत असतो अशी पुराणप्रसिद्धी आहे. (तो वडवाग्नी जसा समुद्राच्या पोटीं जळत असतो

त्याच्याहि अंतकर तो मुनिशाप तैसा,
तो भूपती निजपुराप्रति शीघ्र येई,
स्कंधीं पुन्हा सकलराज्य धुरेस [1]घेई. ८२

**ज्याचा तात असे सदाशिव कृती, माता सती पार्वती,**
**गांव त्र्यंबक हें, गणेश अभिधा, लेले उपाख्याहि ती,**
**त्यानें श्रीरघुवंश नामक महाकाव्यांतला हा सुधा**
**केलासे नववा सुसर्गहि समश्लोकी विलोकी बुधा. ॥ १ ॥**

---

**श्लोक.**

[शि.] विचित्रें सद्वृत्तें अणिक यमकें तोषजनकें,
विलोकोनी व्हावें रसिकमन संतोषित निकें;
अशा उद्देशानें सरस रघुचा सर्ग नववा,
समश्लोकी लोकीं जपुनि करिं मी प्राकृत नवा. १

**आर्या.**

उत्तम संस्कृत असतां प्राकृत कविता अलंकृता यमकीं,
वाटे वाटेल तशी भेव्या भेरीपुढें जशी टिमकी. २
अति गोड जेवणारां होते रोचक कढी जना जेवीं,
संस्कृतकविताभोक्त्यां प्राकृतकविताहि होउ हे तेवीं. ३
अठ्ठाशें पांच शकीं, रचिलासे सर्ग युक्त यमकांनीं,
कष्टा जाणुनि कविच्या, ऐकावा हा गुणज्ञ रसिकांनीं. ४

**याप्रकारें गणेशशास्त्री लेले त्र्यंबककरकृत रघुवंशाचा प्राकृत समश्लोकी नवम सर्ग समाप्त झाला असे.**

---

तसा त्या राजाच्याही पोटांत तो अंतकारक म्ह० मृत्युकारक असा मुनिशाप जळूं लागला म्ह० डांचूं लागला असा भावार्थ ).

१ सकल राज्याची धुर स्कंधीं म्ह० खांद्यावर पुनः घेई म्हणजे मृगयेस जातांना राज्यकारभार अमात्यांकडे सर्व सोंपविला होता तो परत घेता झाला असा भाव.

२ मोठ्या काळजीनें लक्ष्यपूर्वक श्रम करून (मी म्ह० गणेशशास्त्री लेले, करिं म्ह० करिता झालों, असा अन्वय ). ३ यमकालंकारांनीं अलंकृत केली आहे तरी. ४ मोठ्या. ५ नगाऱ्यापुढें. ६ त्याप्रमाणें रोचक होवो असा अन्वय.